# कटु कर्तव्य.

लेखक

**माधव काशिनाथ आगाशे,**

सुपरवायजर, टाटा हायड्रो-इलेक्ट्रिक वर्क्स.







---

१९१३.

---

**किंमत १ रुपया**

# समर्पण.

## गुरुवर्य

**ती. कै. रा. रा. गणेश बळवंत ऊर्फ अण्णासाहेब जोशी,**

बी. ए. एल एल. बी., वकील, कोल्हापूर,

**यांस,**

त्यांनीं आपली अलौकिक बुद्धिमत्ता, थोर विद्वत्ता, असाधारण गुणग्राहकता, करारी स्वभाव, उदार आणि प्रेमळ अंतःकरण, इत्यादि अनेक सद्गुणांचा प्रत्यक्ष आस्वाद घेण्याची मला संधि दिली, आणि दुःखाची यत्किंचितही आंच लागूं नये म्हणून माझें बालपण, केवळ प्रेमामुळें, कल्पनेलाही मिथ्या भासणाऱ्या, सुखमय परिस्थितींत गुरफटून ठेवून मला शिक्षण दिलें; या ऋणांतून अंशतःही मुक्त होणें जिवावर येतें म्हणून,

**फक्त प्रेमाखातर**

त्यांच्या आवडीच्या विषयावर लिहिलेलें हें पुस्तक, त्यांच्याच शिक्षणाचें फळ असल्यामुळें, दुर्दैवानें प्राप्त झालेल्या स्मरणमार्गानें

**अर्पण करीत आहें.**

**तसेंच त्यांचे स्नेही**

## गुरुवर्य

**कै. रा. रा. नारायण गोपाळ ऊर्फ अण्णासाहेब फाटक,**

बी. ए. एल एल. बी., सबजज्ज,

**या विद्वद्रत्नास, या वाग्देवीकंठमणीस**

त्यांचें नाटयशास्त्रनैपुण्य, अभिनयचातुर्य, विशेषतः त्यांची अभिनय शिकविण्याची मोहक कुशलता, इत्यादि गुणांवर लुब्ध होऊन, वयभेदामुळें उत्पन्न होणारी स्नेहविघातक परिस्थिति बाजूला सारून, स्निग्ध अंतःकरणानें, नाटकाला लागणारा योग्य अभिनय शिकविण्याची त्यांनीं जी हौस व प्रेम दाखविलें, त्याबद्दल या नाटकांतील अभिनयचातुर्य प्रकट करावयास संधि देणारी

**प्रवेशमाला**

अत्यंत कृतज्ञतापूर्वक व प्रेमपुरःसर त्याच स्मरणमार्गानें सादर करीत आहें.

त्यांचा नम्र शिष्य,

**तात्या.**

# प्रस्तावना.

प्रख्यात कादंबरीलेखक, आंग्लविदुषी, मिस **मेरी कॉरिली** या बाईनीं लिहिलेल्या **व्हेंडेटा** नामक कादंबरीच्या आधारानें हें नाटक लिहिलें आहे. ही कादंबरी वाचीत असतांना, तींतील हृदयंगम कथानकावर एक नाटक लिहावें, अशी त्या पुस्तकांतीलच एका सूचक वाक्यावरून कल्पना येऊन सुमारें पांच वर्षें झालीं. कल्पनेचें कृतींत रूपांतर होण्याला जवळ जवळ दोन वर्षें लागलीं. हा काल जरी कार्याच्या मानानें अधिक दिसला तरी, इतक्या अवधींत हें पुस्तक लिहिण्याचें काम माझ्या हातून संपल्यामुळें, शेवटलें वाक्य लिहिलें, त्या दिवशीं मीं स्वतःलाच शाबासकी दिली. वाङ्मयसेवेवर दिनचर्या अवलंबून नसल्यामुळें, इतकेंच काय परंतु वाङ्मयाशीं अत्यल्प परिचय असलेला व्यवसाय अंगीकारल्यामुळें, मातृभाषेवर आपली कितपत हुकमत चालेल, याबद्दल साशंक मनानें हातीं घेतलेली लेखणी, मनांत उत्पन्न होणाऱ्या कल्पनांच्या प्रवाहाबरोबर प्रवास करण्यास साहजिकच असमर्थ होती. परंतु स्वच्छंदपणानें वाहणाऱ्या नैसर्गिक प्रवाहांना अडवून धरून योग्य दिशेकडे इष्ट मार्गानें व गतीनें त्यांना वहावयास लावून, आपल्या इच्छेनुरूप त्यांना कार्यक्षम करण्याची कला साध्य करण्याचे प्रयत्न करणें हाही एक अंगीकृत व्यवसाय असल्यामुळें, या शर्यतींत लेखणीला मागें पडूं दिली नाहीं. शिवाय, हातीं घेतलेलें कार्य तडीस नेण्याची प्रबळ इच्छा, त्या वेळीं तिला सखीजन मिळाल्यामुळें, तिची उमेद वाढून, आज ती या नाटकाची लांबलचक प्रस्तावना लिहिण्याकरितां, हळूच मनाला खुणवीत आहे. परंतु तिला याहीपेक्षां एक अधिक महत्वाचें काम करावयास लावावयाचें असल्यामुळें, तिचें बिलकुल न ऐकतां थोडक्यांतच ही प्रस्तावना मी लिहीत आहें.

सदरहु नाटक वाचण्यापूर्वी 'व्हेंडेटा' कादंबरी वाचकांनीं वाचावी, अशी त्यांना माझी आग्रहाची विनंति आहे. या नाटकांत एका सभ्य गृहस्थानें आपल्या पत्नीचा तिच्या भ्रष्ट आचरणाबद्दल, केवळ कर्तव्य म्हणून कसा सूड घेतला याचें चित्र काढलें आहे. हें चित्र नाटकांत खुलून दिसावें म्हणून कांहीं

पात्रें कल्पनेंतून निर्माण करून त्यांच्या चरित्राची चित्ररेखा त्याच चित्रपटावर रेखाटली आहे. मुख्य कथानकाचा ओघ व तदनुरोधानें उत्पन्न होणारा मुख्य रसप्रवाह, यांना अखंड ठेवून, त्यांच्या मार्गांत इतर कथांनीं व तदंगभूत रसांनीं किंचित् अडथळा उत्पन्न करून, त्यांना जास्त स्पष्टपणें दृग्गोचर करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे, हें पहाण्याचें काम मी सहृदय वाचकांवर सोपवितों.

या पुस्तकांत अनेक दोष असण्याचा संभव आहे. नाटक छापून प्रसिद्ध होण्यापूर्वी, जर त्याचा रंगभूमीवर प्रयोग झाला असता, तर मार्मिक टीकाकारांच्या लेखणीनें निर्माण केलेल्या चाळणींत दोषांचे खडे—प्रेक्षकांच्या डोळ्यांना खुपलेले खडे,—सहज माझ्याही दृष्टोत्पत्तीस आले असते; आणि मग त्यांना कदाचित् पुस्तकांत जागाही मिळाली नसती. परंतु एखादें नवीन नाटक रंगभूमीवर येण्यास नाटकाच्या गुणाशिवाय लेखकाला जी इतर परिस्थिति सहाय्य असावी लागते, ती मला अनुकूल नसल्यामुळें तीन वर्षांत हें नाटक मला रंगभूमीवर आणतां आलें नाहीं; परंतु याबद्दल मला वाईट मात्र वाटत नाहीं. कारण या अवधींत, रंगभूमीवर या नाटकाचा प्रयोग करविण्याच्या प्रयत्नांत, ज्या सद्गृहस्थांनीं तें मला वाचतांना ऐकलें व तदितर प्रसंगीं ज्यांनीं प्रेमानें तें वाचलें, त्यांनीं केलेल्या कांहीं सूचनांचा मला फारच फायदा मिळाला आहे; आणि म्हणूनच हें नाटक छापून प्रसिद्ध करण्याचें—हा वाममार्ग आहे हें माहीत असून—मी धाडस करीत आहें. असें करण्यांत मार्मिक प्रेक्षकांचा डोळा चुकवून, तें आधीं मार्मिक वाचकांचे हात गांठीत आहे, हें मी जाणून आहें, परंतु टीकेला भिऊन वर्षानुवर्ष पुस्तक तसेंच ठेवण्यापेक्षां, टीकेच्या अग्नींतच तें फेंकून देणें बरें; म्हणजे हिणकस असेल तें जळून जाऊन शुद्ध तत्वाचा एखादा तरी कण लाभण्याचा संभव असतो. कारण या कामीं कसर आणि कसूर ही जोडी अगदीं कुचकामाची, मग ती कोणाचीही असो.

सदरहु पुस्तकासंबंधीं आभारप्रदर्शनाच्या समारंभांत, **मेरी कॉरिली** बाईंना अग्रपूजेचा उघड मान आहे. त्यांचे आभार नुसते न मानतां, त्यांच्या मूळच्या कथानकांत नाटकाच्या दृष्टीनें फेरफार केल्याबद्दल, ' क्षमस्व ' म्हणून आभार मानतों. तसेंच माझे प्रियमित्र, रा. रा. **पांडुरंग गंगाधर** ऊर्फ

**बाबासाहेब लिमये,** बी. ए., यांनीं आपला अमोलिक वेळ खर्चून जी मदत केली, व विशेषतः ती मदत करतांना जी कळकळ व प्रेम दाखविलें त्याबद्दल मी त्यांचा खरोखर फार फार ऋणी आहें. याशिवाय ज्या माझ्या मित्रांनीं हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याविषयीं प्रोत्साहन दिलें, त्यांचेंही मनःपूर्वक आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

लोणावळें,
१५ जुलै १९१३.

**माधव काशिनाथ आगाशे.**

# नाटकांतील पात्रें.

**पूर्णचंद्रः**–( चंद्रगुप्त ) कुसुमपुरांतील एक तरुण सभ्य गृहस्थ.

**कृष्णकांतः**–पूर्णचंद्राचा एक स्नेही.

**पद्माकरः**–पूर्णचंद्राचा खासगी कारभारी.

**डॉ० कार्तिकेयः**–कुसुमपुरांतील एक डॉक्टर.

**विलासिनीः**–पूर्णचंद्रांची पत्नी.

**नलिनीः**–डॉक्टर कार्तिकेयाची पत्नी.

**मेनकाबाईः**–विलासिनीची दूरची नातेवाईक.

**कमलाः**–मेनकाबाईची मुलगी.

शिवाय बक्षीसाहेब वकील, डॉ. करुणेश, मि. गरूड कॉन्ट्रॅक्टर, शेट गोपाळदास गुजर ऑ. मॅजिस्ट्रेट, मि. गदाधर चिटणीस, मि. धरणीधर मास्तर, वे. शा. सं. पंडित दयानंदशास्त्री, सुधीर विद्यार्थी, वगैरे वगैरे.

# कटुकर्तव्य.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**स्थळः**–कुसुमपुरांतील एक रस्ता.

( पद्माकर प्रवेश करतो. )

**पद्माकरः**–या प्रेतवाहकांच्या आरोळ्यांनीं कानठळ्या बसल्या ! ते तरी काय करतील बिचारे ! प्रेतं नेतां नेतां त्यांचे जीव अगदीं मट्ट्यास येत असतील. पूर्वी का सांथी नव्हत्या ? का माणसें मरत नव्हतीं ? महामारी, देवी, गोंवर, सन्निपात इत्यादि सांथींनीं आजपर्यंत लाखों वेळां आपला प्रभाव दाखविला आहे. पण या प्लेगाची तऱ्हाच कांहीं निराळी. सांथीचे रोग म्हणजे हापापलेल्या लुटारूप्रमाणें यायचे; आणि थोडी फार नासधूस करून जायचे. पण या प्लेगनं आर्यावर्तांत कायमची वस्ती करण्याचा बेत केला आहे. अरे, पण मी विचार करीत करीत आपल्या बंगल्याजवळ येऊन पोहोंचलों. आमचा बंगला गांवापासून दूर आहे, म्हणून येथें प्लेगची भीति वाटत नाहीं इतकेंच. ( आठवल्यासारखें करून ) पण हो. मी या विचाराच्या नादांत हा शालू यजमानांच्याकडे लवकर नेऊन द्यायचा आहे, हें अगदींच विसरलों. वहिनीसाहेबांनीं आज याच्याकरितां अगदीं हट्ट घेतला आहे.

( इतक्यांत माळी धावऱ्या धावऱ्या येतो. )

**माळीः**–अव दिवाणजी ! ओ दिवाणजी !

**पद्माकरः**–कायरे, काय झालं ? असा घाबरला आहेस कां ?

**माळीः**—त्या तकड आपला कोचमील नाहीं का, तो बघा अक्षी इवळतुया, कसा माशावानी तडफडतुया. का पिलिंगा बिलिंगानं झपाटलाय कोन जानं!

**पद्माकरः**—काय म्हणतोस, आपला कोचमन विव्हळत पडला आहे, आणि प्लेगनं लागला आहे म्हणतोस? चल, चल. तो कुठें आहे मला दाखीव बरं. ही काय पिडा आली आहे कोण जाणे! इथेंही प्लेग आला अं! या शालूला ह्या कांहीं सुमुहूर्त दिसत नाहीं. असो.

( दोघे जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळः**—बाग.

( कमला व विलासिनी बॅडमिंटन खेळत आहेत असा पडदा उघडतो. )

**विलासिनीः**—आणखी थोडा वेळ खेळ ग.

**कमलाः**—ताईसाहेब, मी दमलें आतां. शिवाय मंडळी यायची वेळ झाली.

**विलासिनीः**—मग तुला कुणीं खातंय् वाटतं!

**कमलाः**—नको, नको, आतां. पुरे झालं मला.—अगबाई! हे पहा कृष्ण-कांत आलेच. दादासाहेब बरोबर दिसत नाहींत.

**विलासिनीः**—अग पण हो, थोडा चहा घेऊन जा. ( कमला नको नको म्हणत निघून जाते. ) ( कृष्णकांतास उद्देशून ) गेलीच ती. अगदीं हट्टी पोर, आज चौघांनीं खेळावं म्हणून इला बोलावलं होतं. पण ही तुम्हांला इतकी कां भिते हो!

**कृष्णकांतः** जाऊं दे ग! बरं झालं, पिडा गेली. ( तिच्याशीं शेकहँड कर-ण्याचा आव घालून फाजीलपणा करतो. ती त्याला झिडकारून रागानें पहात दूर सरते. )

**विलासिनीः**—( रागानें ) भाऊजी! तुम्हीं तर अलीकडे अगदीं ताळ सोडला. तुमची भीति पार नाहींशी होत चालली. याचा परिणाम फार वाईट होईल बरं! तुम्ही आतां या कमलेशीं लग्न करा. म्हणजे लोक नांवं तरी ठेवणार नाहींत.

( हंसत ) बरं या, यायचं होईपर्यंत चार दोन गेम्स खेळूं. ( कृष्णकांताच्या हातांत बॅट देते. ते खेळतात. इतक्यांत बाजूला आवाज होतो. ) कोण आहे तें !

**कमला**:–( पुढें होऊन ) मी आहें, दादासाहेब या रस्त्यानं येत आहेत म्हणून मी पाठीमागल्या दरवाजानं जातें. ( जाते. )

**विलासिनी**:–( रागानें ) अस्सं काय ! खास आडून पहात होती. पाहिलंत, कसे भिंतीला कान असतात ते ! तुम्ही माळ्याला तेवढीं फळं तोडून घेऊन यावयास सांगा. ( तो जातो. )

( पूर्णचंद्र हातांत एक पुस्तक घेऊन प्रवेश करतो. )

**पूर्णचंद्र**:–काय ! तूं इथें एकटीच कशी ! कृष्णकांत कुठें आहे ? आणि कमला नाहीं आली !

**विलासिनी**:–कमला आली होती पण ती लाजून परत गेली. भाऊजी माळ्याकडे गेले आहेत. आतां येतील. ( पूर्णचंद्र हातांतील पुस्तक वाचतो. )

**विलासिनी**:–आतां पुरें झालं तें वाचणं ! मेला कंटाळा तरी कसा नाहीं येत ? ( पुस्तक काढून घेते. ) थोडंसं खेळायचं होतं.

**पूर्णचंद्र**:–आपण चौघेजण खेळणार होतों, पण ती कमला निघून गेली. आतां मी नाहीं खेळत. तो कृष्णकांत आला म्हणजे तुम्ही खेळा. मी पहात बसेन.

**विलासिनी**:–आपलं नेहमीं असच.–हो ! पण, त्या शालूचं काय झालं !

**पूर्णचंद्र**:–कृष्णकांतानं तसबीर तयार केली का ? ( ती मानेनें नाहीं म्हणते. ) मारे तुझा फोटो घेतला, एवढी ऐट केली, पण त्यानं तसबीर कांहीं तयार केली नाहीं ना ? मी त्याला आज ५०० रुपये बक्षीस देणार होतों.

**विलासिनी**:–ते म्हणत होते, बाकी सर्व तसबीर आज कित्येक दिवस तयार आहे; लुगड्याला रंग द्यायचा मात्र राहिला आहे. त्यांना त्या शालूचा रंग फार आवडला, म्हणून तो नेसून मी कशी दिसतें हें पाहिल्यावर तसबीर तयार होईल.

**पूर्णचंद्र**:–अस्सं काय ! मग त्याला बराच अवकाश आहे.

**विलासिनी**:–(जरा रागांत) कां ! शालू आणायला सांगितला नाहीं वाटतं !

**पूर्णचंद्र**:–अग पण हो ! रागावूं नकोस. मीं सर्व व्यवस्था केली आहे. कृष्णकांताचं तुझ्यावर धाकट्या बहिणीसारखं प्रेम, तो तुझी हौसेनं तसबीर

तयार करणार. आणि मग मी तुझ्याकरितां एवढंही काम करणार नाहीं असं कसं होईल ? वास्तविक या प्लेगच्या दिवसांत लोकांचे हाल होत असतांना आम्हांला या चैनी सुचूं नयेत, पण लाडक्या बायकोचा हट्ट पुरविला पाहिजे ना ? पण तो शालू नेसून गांवांत मिरवायला जाऊं नका हो ! लोक नांवं ठेवतील बरं !

**विलासिनीः**–इश्श ! एवढं का मला समजत नाहीं ?—अरे, कोण आहे रे तिकडे ? गंगाराम, ए गंगाराम, गंगाराम, मेलं कुणीच कसं ओ देत नाहीं ?

( एका बाजूनें पद्माकर व दुसऱ्या बाजूनें कृष्णकांत येतात.
व दोघेही एकदम )

**पद्माकर व कृष्णकांतः**–वहिनीसाहेब, गंगाराम बागेंत नाहीं.

**विलासिनीः**–मग गेलाय् तरी कुठें ?—तुम्हींच का आणलींत फळं ? ( त्याच्याजवळून तीं घेते व ठेवते. )

**पद्माकरः**–हा शालू आणला आहे.

**पूर्णचंद्रः**–हं, हा घ्या तुमचा शालू. आहे का मनासारखा ?

**विलासिनीः**–अहाहा ! काय नामी रंग आहे हा ! या रंगांतल्या किड्यांनींच पसंत केलेला, मग तो वाईट कसा असेल ? ( कृष्णकांतास उद्देशून ) पहा हो भाऊजी ! आहे ना रंग पसंत ? ( हळूच ) नाहीं तर रंगाचा बेरंग व्हायचा ! ( त्याला शालू दाखविते. )

**पद्माकरः**–( पूर्णचंद्राला हळूच गाडीवानाची हकीकत सांगतो. )

**पूर्णचंद्रः**–दोस्त ! आपण ज्याला भीत होतों तेंच दत्त म्हणून आपल्यापुढें उभं राहिलं आहे ! आपला कोचमन प्लेगनं आजारी झाला आहे, आणि तो इथेंच बागेंत आहे. तुम्ही घरांत जा. मी त्याची व्यवस्था करून येतों.

**विलासिनीः**–( घाबरत घाबरत ) आपण जाऊं नये गडे. त्याला प्लेगच्या इस्पिताळांत पाठवून देऊं आणि आपण मोतीबागेंत रहायला जाऊं.

**पूर्णचंद्रः**–तें मग पहातां येईल. मला त्याच्याकडे आधीं गेलंच पाहिजे. त्याला मायेचं माणूस कोणी नाहीं. त्याची काळजी घेतलीच पाहिजे. (जातो.)

**विलासिनीः**–नका नका हो जाऊं. गेलेच ना ते ? सकाळपासून कांहीं खाल्लेलं देखील नाहीं. आतां केंव्हां येणं होईल तें होवो.

**कृष्णकांतः**—हे हट्टी लोक असेच मरायचे ! आतां कसचा तो लवकर परत येतो ? चला आपण बंगल्यांत जाऊं. तूं शालूची घडी मोडून नेस. तुला तो कसा दिसतो तें मला एकदां पाहूं दे.

**विलासिनीः**—परत यायच्या आधीं जर घडी मोडली, तर फार रागावतील बाई. आतांच उगीच घाई कशाला ?

**कृष्णकांतः**—तूं त्याच्या रागाला भितेस ! तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीला असा काच असावाना ! विलासिनी, तुझं जसं माझ्यावर प्रेम आहे, तशी तूं माझी जर लग्नाची बायको असतीस—

**विलासिनीः**—पुरे, पुरे. आतां त्या गोष्टी कशाला ? चला आधीं बंगल्यांत जाऊं.

**कृष्णकांतः**—चला

( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळः—डॉक्टर कार्तिकेयांचा दवाखाना.

( डॉ. कार्तिकेय व त्यांचा कांपौंडर बोलत प्रवेश करतात. )

**डॉक्टरः**—आज प्लेगचा आंकडा काय आहे ?

**कांपौंडरः**—१५०, १५३, १७०.

**डॉक्टरः**—फ्री डिस्पेन्सरींत औषधं पाठविलींत ? तिकडची सर्व व्यवस्था पाहून आलांत ना ? नाहीं तर तो डॉक्टर करुणेश मला शिव्या देईल. मी श्रीमंत झालों आहें असा आधींच चोहोंकडे माझ्या नांवाचा बोभाटा झाला आहे. ( इतक्यांत एक गडी येतो. )

**डॉक्टरः**—नंबर ?

**गडीः**—१३२७.

**डॉक्टरः**–( कागद चाळून त्यांतील १३२७ चा कागद हातांत घेऊन ) कायरे ! रावसाहेबांची तब्यत कशी काय आहे ?

**गडीः**–काल ताप आला होता.

**डॉक्टरः**–ताप आला होता ना ! ठीक आहे.

**गडीः**–सारी रात्रभर खोकत होते.

**डॉक्टरः**–खोकत होते ना ! ठीक आहे.

**गडीः**–साऱ्या रात्रींत एक क्षणभर देखील झोंप लागली नाहीं.

**डॉक्टरः**–झोंप नाहीं आली ना ? ठीक आहे, पण कायरे, बाईसाहेब कुठें आहेत ?

**गडीः**–रावसाहेब आजारी झाल्या दिवसापासून त्या माहेरींच आहेत. त्यांना पुष्कळ पत्रं पाठविलीं, पण त्यांचं कांहींच उत्तर नाहीं.

**डॉक्टरः**–काय म्हणतोस उत्तर नाहीं ? ठीक आहे. ( प्रिस्क्रिप्शन लिहितो. ) जा, औषध घेऊन जा, आणि त्यांना सांग कीं, कालचंच औषध दिलं आहे म्हणून टाकून देऊं नका. दुखणं फारा दिवसांचं असल्यामुळें लवकर बरं होणं चांगलं नाहीं. ( दुसरा मनुष्य येतो, त्याच्या हातांतील कागद घेऊन ) नवीन केस आहे ! ( त्याला तो 'हो' म्हणतो. डॉक्टर कागद पाहून ) कोण ! श्रीमती सुंदराबाई सपाट ? ( कागद आपटून ) जा, त्यांना सांग कीं, या ठिकाणीं बायकांना औषध मिळत नाहीं. पण काय हो, याच्यावर नवऱ्याचं नांव कां नाहीं लिहून आणलंत ? म्हणजे हे कोण सपाट आहेत तें समजलं असतं. काय, त्यांच्या नवऱ्याचं नांव काय ?

**दुसरा गडीः**–नवऱ्याचं नांव नक्की ठाऊक असतं तर प्रथमच लिहून आणलं असतं. पण तुम्हाला त्याची काय जरूरी आहे ? तुम्ही कांहीं नवऱ्याला औषध देत नाहीं ना ?

**डॉक्टरः**–अस्सं. अस्सं. आतां आलं लक्षांत. त्या भटारखान्याजवळच्या सुंदरीकडून का तुम्ही आलांत ? मग त्या रांडेला ' श्रीमती ' आणि ' बाई ' यांचं रूपुस्त कशाला पाहिजे ? तिच्या नवऱ्याचं नांव नक्की नाहीं सांगतां येणार हें खरं आहे. त्या थेरडीचे रंग तेरड्यापेक्षांही क्षणभंगुर आहेत. तिच्या नांवापुढें नुसतं ' आजी ' लावीत जा अं. सध्यां तुमचा पंधरवडा

आहे वाटतं ? जा, जा, तिला नाहीं माझ्या दवाखान्यांत ओषध. ( तो रागानें निघून जातो. )

**कांपांडरः**–डॉक्टर, मीं बोलूं नये, पण हें कांहीं चांगलं नाहीं. यानं धंदा बुडेल बरं. तुम्हीं बायकांचा द्वेष करा. पण धंद्याशीं संबंध आला, म्हणजे तुम्हीं आपला द्वेष आवरीत जा. तुमच्या बाहेर लावलेल्या पाटीवर ' स्त्रीरोग-चिकित्सक ' म्हणून लिहिलेलं आहे, हें तुम्ही अगदींच विसरलांत वाटतं ?

**डॉक्टरः**–जाऊं द्या हो धंदा. त्याची भीति मला मुळींच नाहीं. माझा जम बसलेला आहे. आतां मी कितीही निष्काळजी झालों तरी लोक माझ्या-कडे येणारच. आतां पाटीबद्दल विचाराल तर ' स्त्रीरोगचिकित्सक ' याचा अर्थ ' स्त्रियांच्या रोगाची चिकित्सा करणारा ' असाच काय म्हणून करावा ? 'स्त्री हाच रोग आहे, त्याची चिकित्सा म्हणजे चर्चा करणारा,' असा कां करूं नये ? किंवा ' स्त्रियांपासून उत्पन्न झालेल्या रोगाची चिकित्सा करणारा ' असा करावा. भाषाशास्त्राची याला कांहीं आडकाठी आहे काय ?

**कांपौंडरः**–पहा, तुमची मर्जी.

( एक पेशंट येतो. )

**डॉक्टरः**–तुम्हीच का मि. धसमुसळे ?

**पेशंटः**–होय.

**डॉक्टरः**–बसा. वय काय ?

**पेशंटः**–पंचविशीचा भर आहे.

**डॉक्टरः**–धंदा ?

**पेशंटः**–बजवय्या आहें.

**डॉक्टरः**–असं काय ? नाडी पाहूं. ( नाडी हातांत धरून ) डोकं दुखतं ? जीभ पाहूं, डोळे पाहूं, नखं पाहूं. ( स्टेथॉस्कोप लावून ) खोका.

**पेशंटः**-डॉक्टर, माझ्या पायाला—

**डॉक्टरः**–( रागानं ) मला सारं समजतं आहे, तुम्ही नको सांगायला. खोका. ९९९ म्हणा. म्हणा १, २, ३. श्वास घ्या, सोडा. शौचास साफ होतं का ? लघवीची आग होते ? अंगाची आग होते ? ओकारी येते ? भूक लागते ? तहान लागते ? झोंप येते ? खोकला येतो ? ताप येतो ? घाम येतो ?

**पेशंटः**–( या सर्व प्रश्नांचीं उत्तरें ' नाहीं, नाहीं ' अशीं देतो. ) नाहीं.

**डॉक्टरः**–मग तुम्हांला होतंयू तरी काय ?

**पेशंटः**–( पायाकडे बोट दाखवून ) मला ठेंच लागली आहे.

**डॉक्टरः**–ही कितव्यांदां ? ( कानाचें माप घेऊन ) कान बरेच लांबलेले आहेत, तेव्हां पन्नासच्या पुढें मजल गेलेली दिसते ! ( पेशंट एकदम गोंधळून जाऊन उत्तर देत नाहीं. डॉक्टर त्याच्याकडे पाहून हंसत हंसत थर्मामेटर लावावयाला देतो व प्रिस्क्रिप्शन लिहितो. थर्मामेटर परत घेऊन ) जा, तिकडे जाऊन औषध घेऊन या. ( तो जातो व कांपौंडराबरोबर परत येतो. )

**कांपौंडरः**–डॉक्टर, यांना ठेंच लागली आहे, त्याला हें पोटॅशम ब्रोमाइड काय म्हणून ? आणि हें सँटोनाइन आणि कॅस्टर ऑईल कशाला ! ठेंचेवर हें नवीनच औषध आहे !

**डॉक्टरः**–( शांतपणानें हंसत ) तुम्ही त्यांना औषध करून द्या, आणि मग फावल्या वेळांत हे प्रश्न विचारा, जा. ( कांपौंडर व पेशंट जातात. ) या कांपौंडरला वाटतं कीं, मी आतां मोठा डॉक्टर झालों. पण याला वैद्यकीचं कांहीं तरी ज्ञान आहे ! ' ठेंच ' या शब्दाचा अर्थ 'पायाच्या बोटाला झालेली जखम ' एवढाच याला माहीत; पण उपदंशादि रोगांनीं पछाडलेले लोक नेहमीं ' पाय घसरला, ' ' ठेंच लागली, ' हे शब्द लाक्षणिक अर्थानं वापरतात, याचा याला अनुभव नाहीं. सध्यां प्रारंभच आहे, तेव्हां ही ठेंच औषधावांचून देखील बरी होईल. पण पुन्हां ठेंचच लागूं नये म्हणून औषध दिलं आहे. याच्या पोटांत गोड गोड मुके घेऊन जंत झाले आहेत. यामुळें डोळ्यांपुढें अंधेरी येते. शिवाय हे लोक नेहमीं नेत्रकटाक्षांचे भुकेले. वर खिडक्यांतील तारकांशीं नेहमीं तारांशिवाय तारायंत्र चालायचं. मग ठेंचा नाहीं लागायच्या, तर काय होईल ! माझी योजना अगदीं बरोबर आहे. या औषधानं त्याचा चांगला नायनाट जिरेल. ( कांपौंडर व पेशंट परत येतात. ) एक वर्षभर औषध घ्यायला पाहिजे. औषधाचा घोंट घेऊन त्यावर सपाटून कात घातलेला कडू विडा खात जा, हें एक त्याला पथ्य आहे. शिवाय रस्त्यांतून चालतांना पायाखालीं बघून चालत जा. माड्यांकडे बघून चालूं नका, म्हणजे ठेंच नाहीं लागायची. ( पेशंट रागानें ' डॉक्टरला वेड लागलं आहे वाटतं ' असें पुटपुटत जातो. ) ( दुसऱ्या पेशंटची केस हातांत घेऊन त्याची पूर्ववत् परीक्षा

करतो. पेशंट त्याला 'नाहीं, मी आजारी नाहीं,' अशीं उत्तरें देतो.) मग तुम्हांला होतंयू तरी काय ?

**पेशंट**:—नाहीं, मी आजारी नाहीं. तर माझ्या बायकोचे डोळे बिघडले आहेत.

**डॉक्टर**:—मग हें आधींच कां नाहीं सांगितलंत ? माझ्याजवळ बायकांना औषध नाहीं. बाकी तुम्हांला सांगतों कीं तिचं डोळ्याचं दुखणं, हें निव्वळ ढोंग आहे. हल्लीं गांवांत प्लेगाबराबर पुरुषांची नजर विषारी होण्याची सांथ आली आहे. असल्या सांथीनं झपाटलेल्या पुरुषाची आणि एखाद्या स्त्रीचा नजरानजर झाली कीं, ती स्त्री आंधळी होते. खरी नव्हे हो, प्रेमानं आंधळी होते. असलाच कांहीं तरी तुमच्या घरीं प्रकार असेल नाहीं ? माझ्याजवळ याला फार जालीम औषध आहे, पण तें मी देऊं इच्छित नाहीं.

(इतक्यांत डॉक्टर करुणेश प्रवेश करतो.)

**डॉक्टर करुणेश**:—वेड्या, आज फ्री डिस्पेन्सरींत काय गोंधळ उडाला आहे, त्याची तुला कल्पना आहे का ?

**डॉक्टर कार्तिकेय**:—काय, काय झालं ? एखाद्या बाईचा नवरा प्लेगनं मेला होय ? तिला म्हणावं पुनर्विवाह कर.

**डॉक्टर करुणेश**:—ए मूर्खा, काय भलभलतं बडबडतोस ? अरे, सरदार पूर्णचंद्र शौर्यसागर, आपल्या कोचमनकरितां औषध पाहिजे म्हणून माझा शोध करीत फ्री डिस्पेन्सरींत आले होते, तेथेंच त्यांना प्लेग झाला आणि चार तासांच्या आंत त्यांचं प्राणोत्क्रमण झालं.

**डॉक्टर कार्तिकेय**:—अरे अरे अरे अरे ! बरं मग पुढें ?

**डॉक्टर करुणेश**:—पुढें काय ? आपल्या स्वयंसेवकांनीं त्यांच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें त्यांना त्यांच्या श्मशानांतील छत्रींत नेऊन पुरलं आहे.

**डॉक्टर कार्तिकेय**:—ते स्वयंसेवक कुठें आहेत ?

**डॉक्टर करुणेश**:—ते त्यांचा प्रेतविधि उरकून परत आले, आणि लगेच दोघेही प्लेगनं लागले. सध्यां ते बेशुद्ध स्थितींत इस्पिताळांत आहेत; पण बाहेर जाण्यापूर्वीं त्यांनीं मला एक पत्र लिहून ठेवलं होतं, त्यावरून सर्व हकीकत समजून आली. हें पहा तें पत्र.

**डॉक्टर कार्तिकेयः**–( पत्र वाचतो. ) " आपलीं प्रेतसंस्कार मुकाट्यानं करण्याचं वचन त्यांनीं आमच्यापासून घेतलं, कारण प्रेताची विल्हेवाट लावल्याशिवाय जर ही बातमी बाहेर फोडाल, तर माझी बायको माझ्याजवळ येऊन तिलाही प्लेग होईल. त्यांच्या वचनांत गुंतल्यामुळें व आपलाही त्या वेळीं पत्ता नसल्यामुळें, आम्हीं सामानाची एक मोडकी पेटी रिकामी करून, त्यांत त्यांचं शव ठेवून, ती प्रेताच्या गाडींतून ढकलीत त्यांच्या छत्रींत पुरून ठेवण्यास जात आहोंत. भेटीअंतीं जास्त खुलासा करूं.

आपले,

**देवीदास व शिवदास.** "

**डॉक्टर कार्तिकेयः**–ही अत्यंत वाईट गोष्ट झाली.

**डॉक्टर करुणेशः**–शौर्यसागरांच्या बंगल्यावर ही बातमी सांगायची आहे; तेव्हां तूं जा. मला दवाखान्यांतच फार काम आहे.

**डॉक्टर कार्तिकेयः**–काय ! मी जाऊं ? छे, मी बायकांचं तोंडदेखील पहात नाहीं. त्यांतून त्या विला—नकोच. मी नाहींच जात.

**डॉक्टर करुणेशः**–जा, असं वेड्यासारखं करूं नये.

**डॉक्टर कार्तिकेयः**–मी वेडाच आहें. त्यांतून या बातमीनं तर माझं भानच ठिकाणावर नाहीं. मी यापुढें बहुतकरून अधिकाधिक वेडा होणार, असं मला वाटायला लागलं आहे. मी साफ जात नाहीं. तूं मला आग्रह करूं नको.

**डॉक्टर करुणेशः**–बरं, मी जातों. मग काय करणार !

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळः**—कमलेचें घर.

( कमला व नालिनी बोलत बोलत येतात. )

**कमलाः**–वेड्याला त्याच्या लहरीप्रमाणेंच वागविलं पाहिजे असं म्हणतात. त्याच्या लहरीच्या आड आल्यानं, वेड अधिक अधिक वाढत जातें. तें कांहीं

नाहीं, त्यांना स्त्रियांचा तिटकारा आला आहेना ? मग मी म्हणतें तसा वेष पालटूनच त्यांच्याकडे जा; त्यांच्याजवळ नोकर म्हणून रहा; आणि हळूंहळूं त्यांचं वेड घालविण्याचा प्रयत्न कर. नाहीं तर तूं जगून आलीस त्याचं काय सार्थक ?

**नलिनीः**–ही युक्ति ठीक आहे ग. पण मला ती साधेल का ? पुरुषाच्या वेषांत नेहमीं राहून कसा निभाव लागेल ? थोडा वेळ वेष पालटून वेळ मारून नेणं निराळं, आणखी हें निराळं. एखाद्या परक्या ठिकाणीं वेष पालटून रहाणें कदाचित् शक्य आहे; परंतु तिकडच्या सहवासांत कसं ग शक्य होईल ? माझ्या मार्गांत काय अडचणी येतील यांची तुला कल्पना नाहीं. त्यांनीं मला ओळखलं तर ?

**कमलाः**–नलिनी, अग असं कांहीं तरी धाडस केल्याशिवाय तुझ्या नवऱ्याल तूं ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न कसा करणार ? पद्माकर म्हणत होते, डॉ० कार्तिकेयाजवळ कोणी तरी मायेचं माणूस पाहिजे आहे. म्हणून मी म्हणतें उद्यां सकाळीं तूं पुरुष हो, आणि जा त्यांच्याकडे. ते बोलतील त्याला होस हो दे ठेवून, आणि त्यांच्या नाटकासारख्या आवडत्या विषयावर नेहमीं बोलण्याचा भर ठेव म्हणजे झालं.

**नलिनीः**–बरं आहे. तुझी मर्जी. आपल्याला कांहीं तरी उद्योग सुरू केलाच पाहिजे. उद्यांचा हा प्रयत्न कितपत यशस्वी होतो तें पाहून त्याप्रमाणें पुढील व्यवस्था करूं.

**कमलाः**–अग हो, बरी आठवण झाली. आपल्याला विलासिनीबाईंनीं बोलाविलं आहे. तूं मृत्यूच्या दाढेंतून परत आलीस हें एक सर्वांनाच आश्चर्य होऊन बसलं आहे. त्यांना तुझी हकीकत ऐकायची आहे. त्यांच्या यजमानांकडून डॉक्टरना चार गोष्टी सांगून, त्यांचं मन ताळ्यावर आलं तर तुझ्या प्रयत्नांना लवकरच यश येईल. पूर्णचंद्र शौर्यसागर फार थोर मनाचे आहेत, ते खात्रीनं यत्न करतील.

**नलिनीः**–अग तें का मला सांगायला पाहिजे ?

( मेनकाबाई प्रवेश करते. )

**मेनकाबाईः**–कमले, तूं शौर्यसागरांच्या बंगल्यावर जाशील तेव्हां पद्माकराची चौकशी करून ये हो. आज सकाळपासून त्याचा ठिकाण नाहीं. तो

नादी व त्याचे यजमानही नादी. या प्लेगच्या दिवसांत बसायचे एखाद्या अनाथ प्रेताची व्यवस्था लावीत.

**कमला**:–इश्श ! काय बोलतेस हें आई !

**मेनकाबाई**:–हं ! जा आतां, लौकर ये हो. नाहीं तर बसशील तिथेंच पाल्हाळ लावीत. ( जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थळ**:–श्मशानछत्री.

( जवळ झांकण मोडलेली पेटी पडली आहे अशा स्थितींत पूर्णचंद्र प्रवेश करतो. )

**पूर्णचंद्र**:–मी कुठें आहें ? अहो शिवदास, देवीदास, अरे हे स्वयंसेवक गेले कुठें ? काय कोणीच ओ देत नाहीं ! चार, पांच ! काय पांच वाजले ? पहांटेचे कीं दुपारचे ? पहांटेचे असावे. काल दुपारीं मला प्लेगच्या हॉस्पिटलमध्यें चक्कर आली आणि तेथेंच मी बेशुद्ध होऊन पडलों, तो आतां जागा झालों. हं ! आतां माझ्या ध्यानांत आलं. ते बिचारे स्वयंसेवक मला घेरी आली त्या वेळीं याचरून गेले होते. मला प्रबल मूर्च्छा आल्यावर मी मेलों असं समजून, त्यांनीं मला घाइघाईनं कसं तरी पेटींत घालून पुरून टाकलं असेल. या प्लेगच्या तडाख्यांत प्रेतं दहन करणं अजीबाद बंद झालं आहे, हे ईश्वराचे माझ्यावर तरी मोठे उपकार आहेत म्हणायचे. नाहीं तर या वेळीं मी जिवंत पुरला जायच्याऐवजीं, जिवंत जाळला जायचा. या माझ्या पूर्वजांच्या छत्रींत त्यांनीं मला खोल पुरलं नाहीं हे त्यांचे माझ्यावर उपकारच आहेत. (भीतीनें) काय! मी स्मशानांत आहें ? माझी विड्यांची डबी कुठें आहे? घड्याळ नाहीं; आंगठी नाहीं; काड्यांची पेटी आहे. ती बरी ठेवली बिचाऱ्यांनीं. ( काडी ओढून ) अरे, ही पहा मेणवत्ती. आणि ही दुसरी पेटी कसली ? ( मेणवत्ती जाते. ) खास माझ्या घरांत दुसरं कोणी तरी मेलं. आणि दुसरं

कोण असणार? माझी प्रिया विलासिनी खास मला भेटायला आली. तिला काल रात्रीं या ठिकाणीं आणून ठेवली त्या वेळची ही मेणबत्ती. प्रिये विलासिनी, मी जिवंत होऊन तुला भेटायला येईन; याची तुला कल्पना नसल्यामुळें तूं इतकी घाई केलीस. आतां मला तरी जगून काय करायचं आहे?–पण तुला-ही जिवंतपणींच नसेल ना पुरली? पण छे! तसं नेहमींच कसं होईल? काय दैवाची गति विचित्र आहे! ही हिची आणि माझी या ठिकाणीं शेवटची भेट व्हावी असा ईश्वरी संकेतच दिसतो. (मेणबत्ती लावून पेटी उघडून पहातो.) काय! या ठिकाणीं विलासिनी नसून लक्ष्मीला पुरून ठेवली आहे? काय ही अपार संपत्ति! हें आहे तरी काय गौडबंगाल? (दागिने हातांत घेऊन) हां समजलों. त्या उग्रसेन दरवडेखोरानं ही निवांत जागा पाहून या ठिकाणीं आपली लूट पुरून ठेवली आहे. माझी प्रिया जिवंत आहे तर मग! तेव्हां आधीं इथून निसटलं पाहिजे. (जिन्यावर जाऊन) शिव शिव! हें दार बाहेरून बंद केलं आहे. आतां मी काय करूं? या दिव्याला हा वारा कोठून लागतो? (भिंतीजवळ जाऊन) ही पहा, या इथें फट आहे. हा लांकडाचा तुकडा इथें कोणीं बसविला? हं, ही चोरवाट आहे. उग्रसेना! तूं दुसऱ्याची संपत्ति आणि प्राण हरण करणारा, पण या वेळीं मला माझे प्राण देऊन वर अपार संपत्तीही दिली आहेस. (पेटींतील द्रव्य व दागिने घेतो.) या चोरवाटेनं बाहेर पडावं, आणि आपल्या घराचा मार्ग सुधारावा. हे दयाघन परमेश्वरा! तुझी लीला अगाध आहे. प्राणिमात्रांच्या चरित्रांतील गोष्टी तूं आगाऊच ठरवून ठेवल्या आहेस, त्याप्रमाणें त्या घड-तात. पण या दैववादावर मनुष्यांनीं विश्वास ठेवून स्वस्थ राहूं नये, म्हणून भविष्यकाळ अंधेरांत ठेवून दैवाला तूं पंगू केलं आहेस. उद्योगाचे पाय दैवाला लावून ते अनुकूल करून घेण्यांत खरा पुरुषार्थ आहे. आज तुझ्या कृपेनं मला पुनर्जन्म मिळून माझ्या ऐहिकसुखाची परमावधि होईल याची मला कल्पनादेखील नव्हती. मी तुला अनन्यभावानं शरण आलों आहें.

(पडदा पडतो.)

अंक पहिला समाप्त.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला

**स्थळः**–रस्ता.

( कृष्णकांत प्रवेश करतो. )

**कृष्णकांतः**–गेली–संपली. ती कालची कृष्णरात्र हळू हळू नाहींशी होत आहे. कालचा दिवस आणि आजचा दिवस यांच्यामधला काळाकुट्ट पडदा कालाच्या गतीनं वर उचलला जात आहे. माझं पूर्वचरित्र, आणि त्याच्याशीं संलग्न होणारी माझी भावी स्थिति यांच्यामध्यें निसर्गानं धरलेली ही कृष्णशाल–हा अंतरपट–आतां सूर्योदयाबरोबर दूर होईल. गेल्या रात्रीं मला मुळींच झोंप आली नाहीं. विलासिनीची ती मनोहर मूर्ति अजून माझ्या डोळ्यांसमोरून हालत नाहीं. माझ्याविषयींची ती आपली भावना कायम ठेवील का ? हा विचार मनांत आल्यामुळें मी अगदीं अस्वस्थ होऊन गेलों आहें. यापुढें माझ्याशीं तिला उघडपणें मनास मानेल तसं वागतां येणार नाहीं. तिला पतिव्रता म्हणून मिरवायची फार हौस आहे. आणि म्हणूनच या आकस्मिक प्रकारानं तिचं माझ्यावरील गुप्त प्रेम डळमळण्याचा बराच संभव आहे. ती हौशी आहे, दिलदार आहे; पण लहरी आहे; हट्टी आहे; माझं म्हणणं ती कबूल करील का ? का मी द्रव्यहीन म्हणून ती माझा धिःक्कार करील ? तिला आधीं श्रीमंती पाहिजे, मग प्रेम. कारण, तिची अशी पक्की समजूत आहे कीं, श्रीमंतांच्या पांघरुणाखालीं स्त्रियांना मन मानेल तसं वागतां येतं. पण या विचार करण्याच्या नादांत मी हा कुणीकडे वहात चाललों आहें ! त्या सुंदरीचं–त्या चारुगात्रीचं–माझ्यावर निष्कपट प्रेम आहे, हें मला माहीत असून, काय या भलभलत्या कल्पना माझ्या मनांत येत आहेत ? जाऊं द्या ते विचार. आपण आपल्या प्रियेला गाढ आलिंगन देऊन तिच्या अंतःकरणांतलं पतिविरहाचं दुःख सेंचून बाहेर काढूं. आपल्या आनं-

दाश्रुजलानें तिचा विरहाग्नि पार विझवून टाकूं, आणि काल पश्चिमेस अस्तास गेलेला सूर्य पुन्हां पूर्वेकडे वर डोकं काढतो आहे तोंच, आपल्या उत्तरचरित्राला आरंभ करूं. ( चालूं लागतो, इतक्यांत सूर्याला पाहून ) पण छे, हा पहा सूर्य कसा लपतछपत वर येत आहे ! माझं सौख्य त्याला मिळणार नाहीं म्हणुन रागानें कसा लाल झाला आहे ! तो पहा, पुन्हां ढगांत लपायला चालला. त्रास मला लाजला. जा, असाच चोरासारखा लपून रहा, आणि मी व माझी प्रिया आमच्या बागेंत फिरत असतांना आमच्याकडे आ वासून पहात बैस; आमचा हेवा कर. आमचा विलास पाहून तुझा ताप हळू हळू वाढत चालला, म्हणजे तुला असाच जळत ठेवून आम्ही आमच्या बंगल्यांत जाऊं, आणि तेथें मौज करूं. मग तूं बाहेर आणखी खुशाल ताप; इतकेंच नव्हे, तर आपले सहस्र कर भूमीवर आपटून आमचा सूड घेण्याची प्रतिज्ञा कर. हा पहा मी तुला एकटाच ठेवून आपल्या प्रियेकडे चाललों. लवकरच तिला घेऊन येतों, आणि तुझ्या देखत तिच्याशीं विलास करतों. तुझ्याबरोबर प्रवास करणारा तुझा मित्र, अमावास्येचा निस्तेज पूर्णचंद्र, तुझ्या प्रखर तेजांत या वेळीं लपला आहे; त्यालादेखील ही मौज दाखीन, म्हणजे तो तुझ्यामागें राहून संध्याकाळीं या ठिकाणीं हळूच वर डोकं काढील. त्यालाही मी त्या वेळीं शृंगाररसाचा एक मासला दाखवीन. तो पाहिल्याबरोबर त्याची शृंगाराबद्दलची सर्व घमेंड उतरेल, इतकेंच नव्हे तर तो इतका शरमेल कीं, या ठिकाणीं पळभरदेखील राहणार नाहीं. तावडतोब तुझ्यामागें पळ काढील. ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळः**—रस्ता.

( पूर्णचंद्र प्रवेश करतो. )

**पूर्णचंद्रः**—दिवस वर आला आहे, तरी या मोहल्यांत कांहींच गडबड दिसत नाहीं. ही पहा एक माळीण इकडे येत आहे. तिच्यापासून थोडीं फळं विकत घेऊन उपाहार तर करूं या. कारण भुकेनें माझी फार त्रेधा उडविली आहे. ए बाई—

**माळीणः**–( स्वगत ) काय भेसूर दिसतोया ! ( उघड ) ए बुढ्ढेबावा. जरा दूर उभा रहा. तुझं मला भ्या वाटतंया.

**पूर्णचंद्रः**–अग भिऊं नको. मी तुझ्यासारखाच एक मनुष्य आहें आणि बुढ्ढा नसून तरुणही पण आहें.

**माळीणः**–माझ्या डोळ्याच्या खांचा नाहीं झाल्या ! सकाळच्या रामपाऱ्यांत, म्हाताऱ्या, खरं तरी बोल. का साठी बुद्धि नाठी झाली ? बरं तुला व्हावं काय ? का फुकटचं हाटाकलं ? घे, भाऊ, घे कांहीं तरी, अन कर भोनी. असा नग नाट लावूं. बग आंजीर, केळं, संत्रीं, डाळिंब, काईंबी हाए.

**पूर्णचंद्रः**–द्राक्षं आहेत ?

**माळीणः**–हो. ( पाटी खालीं ठेवते. )

**पूर्णचंद्रः**–दे थोडीं, दे.

**माळीणः**–किती व्होवीं ? पावशेर, अच्छेर ?

**पूर्णचंद्रः**–दे, आच्छेर दे. किती का देईनास !

**माळीणः**–घ्या. ( वजन करून देते. ) आठ आणे झाले.

**पूर्णचंद्रः**–( एक गिनी देतो. )

**माळीणः**–यो बया ! या गिनीची मोड आहे कुठें ?

**पूर्णचंद्रः**–जा, हीं सर्व फळं तुझ्या पोराबाळांना वांटून टाक; आणि तेवढ्याचकरितां तुला सर्व फळांच्या दुप्पट किंमत दिली आहे.

**माळीणः**–( त्याला आणखी फळें देते. ) लई उदार गिरस्त दिसतोया ! मी उगाच त्याला वंगाळ बोललें. कान आहे कोण जाणे ? तोंडावर अक्षी कळा नाहीं. काय झालं आहे कुणाला ठाऊक ! चला पोराखी थोडीं देऊं आणि बाकीचीं टाकूं ओपून. पोराखी या दिसांत लई चारूनशानी उपेग नाहीं. ( पुन्हां ओरडत जाते. )

**पूर्णचंद्रः**–( द्राक्षें खातां खातां ) इची द्रव्य मिळविण्याची हांव कांहीं पुरी झालेली दिसत नाहीं. अजून ओरडतच चालली आहे. काय करील बिचारी, घरची गरिबी असेल, तेव्हां तिचं करणें क्षम्यच समजलं पाहिजे. कारण, द्रव्याच्या राशींच्या राशी ज्यांच्या घरांत पडल्या आहेत आणि अजून त्यांत भर पडत आहे असे लक्षाधीश श्रीमंत संपत्तीच्या प्राप्तीसाठीं श्रम करतांना दृष्टीस

पडतात. तर मग इची काय कथा ? त्याचप्रमाणें ज्यांचें आयुष्य ओहटीला लागलें आहे व ज्यांच्या शरीरावर जरेचें साम्राज्य स्पष्टपणें दृग्गोचर होत आहे असले श्रीमंत थेरडे कपी जर पैशासाठीं हापापलेले दिसतात तर या तरुण अबलेची काय कथा ?

( इतक्यांत वर्तमानपत्र विकणारा छोकरा येतो. )

**छोकराः**–जादा आंदोल, घ्यारे जादा आंदोल.

**पूर्णचंद्रः**–छोकरा, आण पाहूं तुझं वर्तमानपत्र. कायरे, काय बातमी आहे ?

**छोकराः**–बातमी फार वाईट आहे. एका थोर गृहस्थाच्या मृत्यूची बातमी आहे.

**पूर्णचंद्रः**–कोण मेलं रे ?

**छोकराः**–तुम्हांला ठाऊक नाहीं ? तुम्ही कुठें गांवाला गेलां होतां ? घरीं जा, म्हणजे काय गोंधळ उडाला आहे तो तुम्हांला कळेल. तुमचं आडनांव शौर्यसागर आहे ना ? ( पूर्णचंद्र मानेनें होय म्हणतो. ) मग तुम्ही कोण पूर्णचंद्र शौर्यसागरांचे नातेवाईक आहांत ?

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) यानं मला ओळखलं नाहीं खास. मघाशीं त्या माळ-णीनं मला बुढ्ढा म्हणून हांक मारली. हा छोकरा हुषार आहे. हा म्हणतो तुम्ही पूर्णचंद्र शौर्यसागरांच नातेवाईक आहांत का ? ही काय भानगड आहे बरं ?

**छोकराः**–महाराज, विचार कसला करतां ? एक अंक घ्या, म्हणजे तुम्हांला कळेल कीं काल दुपारीं पूर्णचंद्र शौर्यसागर प्लेगनं कैलासवासी झाले.

**पूर्णचंद्रः**–आण पाहूं तुझं वर्तमानपत्र. ( वर्तमानपत्र वाचतां वाचतां ) तूं फार हुषार दिसतोस. काय शिकला आहेस ?

**छोकराः**–मी इंग्रजी तिसरी इयत्ता शिकत असतों. मी सागर हाय-स्कूलचा विद्यार्थी आहें. घरची गरिबी म्हणून सकाळीं तासभर हें काम करतों. गिन्हाइकं ठरलेलीं आहेत. तेव्हां पोटापुरता पैसा मिळतो, व वेळही फारसा खर्च होत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–पत्राची किंमत काय ?

**छोकराः**–अर्धा आणा.

**पूर्णचंद्रः**–हे घे तुला फीला पैसे. ( गिनी देतो. )

**छोकराः**–ही गिनी आहे ! महाराज, मला कशाला गरीबाला ही पाहिजे ! जर मी ही मोडायला गेलों तर ही मीं चोरून आणली आहे असं लोक म्हणतील. त्यांतून लोकांच्या उदारपणावर आपला उदरनिर्वाह करण्याची माझी इच्छा नाहीं. मी स्वावलंबनाच्या मार्गानं जात असतांना तुमच्या उदारपणानं जर मला भुरळ पाडली तर पुढें माझ्या हातून काय काम होईल ! ज्या वेळीं मला कांहीं अडचण येईल–मी संकटांत असेन–त्या वेळीं मी कांहीं एक उद्योग न करतां लोकांच्या उदारपणाकडे टक लावून पहात बसेन ! मी हल्लीं संकटांत आहें, म्हणूनच आपलं मन भ्रष्ट होऊं न देण्याची खबरदारी घेत आहें. आपण रागावूं नका. हा काळच असा आला आहे. आपणाला मी एक अंक तसाच देतों.

**पूर्णचंद्रः**–नको. मला फुकट नको. माझ्याजवळ मोड नाहीं म्हणून ही तूं घे.

**छोकराः**–आपल्याजवळ मोड नसेल तर मी आपल्या घरीं येईन. आपलं घर मला ठाऊक आहे. आजपासून तीन दिवस पूर्णचंद्र शौर्यसागरांच्या मृत्यबद्दल आमची शाळा बंद आहे.

**पूर्णचंद्रः**–( आश्चर्यानें ) तसं नको. मीच तुझ्या ऑफिसांत आणून देईन. तुझं नांव काय ?

**छोकराः**–माझं नांव सुधीर ( जातो. )

**पूर्णचंद्रः**–वाहवा, फार छान. काय बहार आहे ! वर्तमानपत्रांतून प्रसंग-विशेषीं पराचा कावळा करून खोट्यानाट्या बातम्या देण्याची नित्य चाल आहे, पण गांवांतल्या गांवांत जिवंत मनुष्याचा अगाऊ मृत्युलेख लिहिण्याची पाळी त्यांजवर कधीं आली नसेल. सर्वच मौज आहे. माझ्याप्रमाणें मरून जिवंत होण्यांत एक फायदा आहे. आपल्याबद्दल लोक काय बोलतात तें तरी समजतं. काय लिहिलं आहे पाहूं या तर खरं. ( वाचतो. )

जादा ! जादा ! ! जादा ! ! !

# आंदोल.

वर्ष ५.] कुसुमपूर, रविवार, ता. २० डिसेंबर. [ अंक ४३.

## सरदार पूर्णचंद्र शौर्यसागर यांचा अकालीं मृत्यु.

सृजति तावदशेषगुणाकरम् ।
पुरुषरत्नमलंकरणं भुवः ॥
तदपि तत्क्षणभंगि करोति चेत् ।
अहह कष्टमपंडितता विधेः ॥
—भर्तृहरि.

विधाता निर्मी या भुवनिं
मनुजा पूर्ण सुगुणी ।
जनां वाटे त्याली सुघटित
अलंकार धरणी ॥
तया अल्पायूषी बघुनि
गमतें काय चुकला ।
विधी वेडा झाला? स्वकृतिस
म्हणूं काय भुलला ॥

"आम्हांस लिहिण्यास अत्यंत वाईट वाटतें कीं, येथील प्रसिद्ध नागरिक व पिढीजाद सरदार पूर्णचंद्र शौर्यसागर यांस काल रोजीं सायंकाळीं निर्घृण काळानें आमच्यांतून ओढून नेलें. शौर्यसागरांचें घराणें पेशवाईत पहिले बाजीराव यांच्या कारकीर्दींत उदयास आलें. त्या वेळीं स्वराज्याचा विस्तार करण्यांत अनेक शौर्यसागरांनीं आपलें रक्त आर्यभूमीवर शिंपडलें आहे. थोरले माधवरावसाहेब गादीवर असतांना त्यांनीं पूर्णचंद्राच्या प्रपितामहांना कुसुमपूर परगणा जहागीर करून दिला. पुढें १८१८ त पेशवाई नष्ट झाल्यावर शौर्यसागरांची वाताहत झाली. आणि नंतर १८५७ च्या बंडांत तर सर्व शौर्यसागर मारले गेले. त्या वेळीं पूर्णचंद्रांचे वडील लहान होते तरी यांची जहागीर खालसा झाली. पुढें ते वयांत आल्यावर त्यांनीं अनेक खटपटी करून आपलें बरेंच उत्पन्न परत मिळविलें व आपलें नांव सरदारी पटावर दाखल करून घेवविलें. त्यांचें लग्नही एका कुलीन घराण्यांतील स्त्रीशीं झालें होतें. अशा रीतीनें सर्व स्थिरस्थावर झाल्यावर पूर्णचंद्रांचे

## आंदोल, ता. २० डिसेंबर.

वडील व मातोश्री त्यांच्या वयाच्या दहाव्या वर्षीं मृत्यु पावली. परंतु, पूर्णचंद्रांच्या मामानें त्यांचें संरक्षण करून त्यांचा विद्याभ्यास केला. हल्लीं कोठें ते नुकताच स्वतंत्रपणें संसार करूं लागले होते, तोंच त्यांस मृत्यूनें गांठलें. त्यांच्या वडिलांनीं आपली जहागीर परत मिळाली या आनंदाप्रीत्यर्थ कुसुमपुरांत सागर हायस्कूलची इमारत बांधून, सरकारच्या हवालीं केली आहे. पूर्णचंद्रांनीं आपला विद्याभ्यास पुरा झाला त्या वेळीं, या शाळेला पांच हजार रुपये दिले. हल्लीं येथें जें प्लेगचें हॉस्पिटल आहे त्याला त्यांचीच सर्वांत मोठी देणगी आहे, आणि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, तेथेंच काल त्यांचा अंत झाला.

सार्वजनिक कामांत झीज सोसून काम करणारीं माणसें आधींच थोडीं आहेत, किंबहुना नाहींत म्हटलें तरी चालेल. अशा वेळीं पूर्णचंद्रांच्यासारखे लोक जर मृत्युमुखीं पडूं लागले, तर या देशाचा भाग्योदय फार दूर आहे असेंच म्हटलें पाहिजे. आमच्या शहरांत सार्वजनिक काम करणाऱ्या लोकांत जी ही खिंड पडली आहे, ती खास लवकर भरून येणार नाहीं. त्यांचा स्वभाव फारच मनमिळाऊ होता. तसेंच त्यांचें अंतःकरण फार मृदु होतें, त्यामुळें गरिबांची दैन्यावस्था पाहून तें फार द्रवत असे. त्यांना वाचनाचा फार नाद होता. असा सद्गुणी पुरुष एकाएकीं मृत्यु पावल्यामुळें सर्व शहरावर आज दुःखाची छाया पसरली आहे. त्यांच्या पाठीमागें त्यांची पत्नी व एकुलताएक मुलगा आहे, त्यांच्यावर तर हा दुःखाचा डोंगरच कोसळला आहे; परंतु, काळावर नजर देऊन त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें पाहिजे. पूर्णचंद्रांचें वय अवघें २८ वर्षांचें होतें. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो. त्यांची शुश्रूषा करणारे स्वयंसेवक, देवीदास व शिवदास, हेही दोघे मृत्यु पावल्याचें दुःखकारक वर्तमान आतांच आलें आहे!"

अरेरे! हें मात्र अत्यंत वाईट झालं. का तेही माझ्यासारखेच खोटे मेले आहेत! एवढं खरं कीं, आपण कोण ही गोष्ट मात्र या वेळीं गुप्त ठेविली पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाहीं. नाहीं तर, माझी हकीकत सांगतां सांग-

तांच मला पुरे वाट व्हायची. ( हंसत ) आतां माझी हकीकत पुन्हां वर्तमानपत्रांतच छापली पाहिजे. ( जरा इकडे तिकडे हिंडून. ) अरे, आपण या आडवाटेनं आलों तरी कुठें !–हं, डॉ. कार्तिकेयाच्या घराकडे हा रस्ता जातो. ती स्वारी ठीक आहे बोलायला. तिथेंच कांहीं वेळ काढून पुढला बेत करूं. ( घराजवळ थांबून कानोसा घेतो. )

**नलिनीः**–( पडद्यांतून ) या वेळीं घरांत जिकडे तिकडे सामसूम कसं आहे ! काय होईल तें होवो, आपण तर हांका मारूं या. " घरांत कोणी आहे काहो ? अहो घरांत कोणी आहे का ! "

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) डॉक्टरच्या घरांत कोणी माणूस दिसत नाहीं. ही कोणी तरी बाई औषधाकरितां डॉक्टरकडे आली असून, घरांतील माणसांना हांका मारते आहे. येऊं द्या डॉक्टरना बाहेर. मगच आपणही भेटूं. आपण तरी कशाला हांका मारा. ( नलिनी पुढें येते. पूर्णचंद्र बिचकतो. ) अरे ही बाई नसून कोणी तरी पुरुष आहे. कोण बर आहे हा बायकी आवाजाचा पुरुष !

( आड उभा रहातो. )

**नलिनीः**–( स्वगत ) काय करावं बाई ! या वेळीं नेहमीं ज्या ठिकाणीं मुंग्यासारखीं माणसांची रीघ लागायची, प्रत्येकाशीं पुरतं बोलायला देखील फुरसत मिळायची नाहीं, त्या ठिकाणीं प्रत्यक्ष मला, या घराच्या मालकिणीला, दरवाजे उघडण्यासाठीं हाका मारण्याची पाळी यावी ना ! असो, पण पुढें काय उपाय करावा ! ( विचार करते. )

**पूर्णचंद्रः**—(स्वगत) डॉ० कार्तिकेयची दुसरी बायको नलिनी, ही मेली नाहीं अशी जी कुणकुण कानावर येत होती ती खरी आहे एकूण ! पण हिनं वेषांतर काय म्हणून केलं आहे ! इचा नवरा वेडा झाला आहे तेव्हां त्यानं आपल्याला एकदम ओळखूं नये म्हणूनच असावं. मेलेल्या माणसांनीं जिवंत होऊन आपल्या आवडत्या माणसांना भेटायला जाण्याचा हा योगच आलेला दिसतो. पण मलाही हिच्यासारखं वेषान्तर करायला पाहिजे कीं काय ? कारण, माझी प्रियाही माझ्या विरहदुःखानं वेडीच झाली असेल.

**नलिनीः**—( पुढें येऊन ) हो, असंच ! आपण थोडा वेळ फिरून, मगच यावं. ( दार उघडून डॉक्टर बाहेर येतो. )

**डॉक्टरः**—कोण हांका मारतंय्. आज पूर्णचंद्रांच्या मृत्यूनिमित्त दवाखाना

बंद आहे. पण ती हांक स्त्रीची होती. या ठिकाणीं स्त्रियांना औषध मिळत नाहीं, विष मिळतं, हें तिला माहीत नाहीं असं दिसतं. (नलिनी व पूर्णचंद्र आडच उभे रहातात.) स्त्रीजात म्हणजे सारी बेहराम. ती निर्माण करतांना ब्रह्मदेव खास दारू प्याला होता. त्याशिवाय त्यानं एवढी घोडचूक केलीच नसती. सर्व सृष्टि निर्माण केल्यानंतर राहिलेला उकिरडा एका ठिकाणीं कुटून, त्याचे जागोजाग वाटेल तसे गोळे थापून देऊन बनविलेली ही स्त्रीमूर्ति, दुर्गुणांच्या घाणींत बुचकळून दारूच्या निशेंत पृथ्वीवर पाठविली आहे. स्त्रीजात म्हणजे सारी बेहराम !

**नलिनीः**–पण तुमची आईही त्यांपैकींच एक होती.

**डॉक्टरः**–अहो विक्षिप्त गृहस्थ, तुम्हांला त्याच्याशीं काय कर्तव्य आहे ? तुम्ही कां आलां होतां ? तुमची बायको घरीं नांदत नाहीं ? पळून गेली आहे ? तुम्ही परगांवीं असतांना तिला डोहाळे लागले, का तुमच्या विधवा बहिणीला पुत्ररत्न झालं म्हणून तिनं विष खाल्लं, का तुमच्या आईनं पुनर्विवाह लाविला म्हणून " जगावं कीं मरावं " हें कोडं सोडविण्याची युक्ति तुम्हांला पाहिजे ? काय झालंय् तरी काय ! बोला आज दवाखाना बंद आहे, तरी जर जरूरीचं काम असेल तर मी औषध देईन. ( त्याच्याकडे टक लावून पहातो. )

**नलिनीः**–मी आपल्याजवळ औषधाकरितां आलों नाहीं, नोकरीकरितां आलों आहें. आपल्याला आज बोलायला थोडीशी फुरसद मिळेल असं मला वाटलं होतं.

**डॉ० कार्तिकेयः**–बरं बोला. तुमचं गांव कोण. तुम्हांला कुठें तरी पाहिलें आहे. तुमचा चेहरा मला ओळखीचासा वाटतो. ( नलिनी दचकते. )

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) आतां मौज होणार आहे. आपल्याला चांगलीच करमणूक आहे.

**नलिनीः**–काय ! ओळखीचा वाटतो ! तें कसं काय बरं ?

**डॉ० कार्तिकेयः**–कसा ओळखीचा वाटतो हें सांगायचं म्हणजे माझ्या जन्माची रडकथाच सांगितली पाहिजे. माझ्या मृत पत्नीला जर भाऊ असता तर खास त्याच्या नांवानं तुम्हांला हांक मारिली असती.

**नलिनीः**–काय तुम्ही विधुर आहांत ?

**डॉ० कार्तिकेयः**–नका, नका खोल पाण्यांत शिरूं ! त्या सर्व प्रकरणांत एक गोष्ट घाईनं केली गेली, पण झालं तें बरंच झालं.

**नलिनीः**—काय झालं काय आणि बरं काय ! अशी कोणती गोष्ट तुमच्या मनाला खात आहे ?

**डॉ० कार्तिकेयः**—मनाला कांहीं एक खात नाहीं म्हणा. कारण, एका अवद्सेचं कृत्य डोळ्यांनीं पाहून नंतर तिचा समाचार घेतला; पण दुसरीचीं कृष्णकृत्यं मला समजलीं नाहींत म्हणून काय झालं ! ती स्त्री आहे एवढाच तिच्याविरुद्ध पुरावा बस्स होता. आणि म्हणून, तिलाही जलसमाधि देऊन मी हल्लीं कायमचा फटिंग बनलों आहें.

**नलिनीः**—एकूण पुराव्याशिवाय अपराध केला, अशी कल्पना करून आपण एका निरपराधी स्त्रीचा नाहक बळी घेतला आहे तर मग ! कांहीं हरकत नाहीं. हें असं झालंच पाहिजे. आपण केलं तें अगदीं यथायोग्य केलं. या बायकांचा कोणीं विश्वास धरावा ? माझा भाऊ मोठा तेजस्वी पुरुष, मनाचा दिलदार, पण बायकोचं यत्किंचित् वांकडं पाऊल पडल्याबरोबर, त्यानं तिचा गळा दाबून प्राण घेतला. त्या दिवसापासून बायकांचं वारंही घेणार नाहीं, अशी मीं शपथ घेतली आहे. तुमच्यासारख्यांचा आश्रय मिळेल, तर माझी शपथ कधींही मोडली जाणार नाहीं. आपण मला फक्त अन्नवस्त्र द्या व वाटेल तें काम सांगा. मी आपणांजवळ जन्मभर रहाण्यास तयार आहें. मी अगदीं अनाथ आहें.

**डॉ० कार्तिकेयः**—ठीक आहे. तुमचे हे विचार ऐकून तुमच्या सहवासांत माझं भावी आयुष्य खात्रीनं सुखांत जाईल असं मला वाटतं. मी तुम्हांला माझ्या स्नेह्याप्रमाणें वागवीन. तुमच्या मर्जीस वाटेल तितके दिवस तुम्ही माझ्या घरीं रहा. आपल्या स्नेहाचा आरंभ करण्याकरितां या, मला एकदां कडकडून भेटा. ( भेटतात. ) त्यांतून तुमच्या रमणीय चेहेऱ्याकडे पाहिलं म्हणजे मनाल कसा आनंद वाटतो. ( ती लाजून दुसरीकडे पहाते. ) ( आश्चर्यानें ) अरे ! तुम्ही लाजतां कां आणि असं बायकांसारखं तोंड कां फिरवितां ?

**नलिनीः**—( स्वगत ) हीच खरी परीक्षेची वेळ आहे. एक खोटा शब्द पचविण्याकरितां हजारों खोटे शब्द बोलावे लागतात. या वेळीं जें सुचेल तें उत्तर देऊन वेळ मारून नेलीच पाहिजे. नाहीं तर, यांच्या मनांत आपल्याबद्दल संशय उत्पन्न व्हायचा आणि तो तर आपल्याला नको. यांना नाटकाचा अतिशय नाद आहे नाहीं का ! हो, असंच. (उघड) नाहीं, लाजत नाहीं. मला माझा वृत्तांत सांगायला लाज वाटते. पण आतां तुम्ही माझे स्नेही झालां आहांत, तेव्हां तुमच्या

जवळ कशाला चोरून ठेवूं ! मी आजपर्यंत एका नाटक कंपनींत होतों; आणि त्या ठिकाणीं नायिकेची भूमिका माझ्याकडे असल्यामुळें, मला नेहमीं स्त्रीवेषच घ्यावा लागे. पुरुषवेष मीं कधींच घेतला नाहीं. त्यामुळें, पतीच्या आलिंगनसमयीं करावे लागणारे हावभाव स्वाभाविकपणें माझ्या हातून होऊन गेले. त्यावरून माझ्याबद्दल आपल्या मनांत भलताच संशय येऊं देऊं नका हो ! माझं बोलणं बायकी येतं याचं कारणही तेंच आहे. आतां यापुढें मला लागलेली बायकी बोलण्याची संवय, व बायकांसारखे करावे लागणारे हावभाव आपणापुढें बदलण्याचा मी प्रयत्नच करणार नाहीं. आपण दोघेही स्त्रीद्वेष्टे आहोंत; परंतु हें माझं बायकी बोलणं आणि बायकी हावभाव आपण मानून घेतलेच पाहिजेत. निवळ याच कारणांमुळें आपण माझा राग करूं नये.

**डॉ० कार्तिकेयः**—काय तुम्ही नाटकांत होतां ! मग जें नाटकांत रंगभूमीवर शक्य आहे, तें जगाच्या रंगभूमीवर नाहीं का साधणार ?

**नलिनीः**—( स्वगत ) आणखी काय प्रसंग येतो आहे कोण जाणे ! (उघड) मला तुमच्या बोलण्याचा अर्थच समजत नाहीं.

**डॉ० कार्तिकेयः**—समजा, मला तुमच्याशीं लग्न करायचं आहे. ( नलिनी मोठ्यानें हंसते. ) असं हंसतां काय ! बायको या शब्दाचा, जो रूढ अर्थ आहे तो तुम्ही सोडून द्या आणि बायको म्हणजे स्नेही, संसाराची निम्मी कामगिरी खुषीनं वांटून घेणारा जिवलग दोस्त, किंवा त्याचा भार हलका करण्याकरितां सदैव तत्पर असा एकनिष्ठ प्रेमळ सेवक, एवढाच अर्थ लक्षांत घ्या. पुरुष पुरुषांशीं, त्यांतून तुमच्यासारख्या सुंदर तरुणाशीं लग्न करतो, हें ऐकल्या-बरोबरच पाजी लोक नाना तऱ्हेचे कुतर्क काढतील, व माझ्यावर भलते भलते दोषारोप करतील. पण मी तुम्हांला सांगून ठेवतों कीं, आपल्या कडकडीत ब्रह्मचर्यव्रताच्या आचरणानं आपण त्यांना खालींच पहायला लावूं. ज्यांची कामवासना, प्रखर स्त्रीद्वेषानं पार जळून खाक झाली आहे, अशा दोघां स्त्री-द्वेष्ट्यांना स्नेह्याप्रमाणें राहून संसारांतली कामगिरी वांटून घेतां येणं शक्य आहे, असं जगाला शिकवलंच पाहिजे. आजपर्यंत अशा तऱ्हेची कल्पना कोणालाही सुचली नाहीं. परंतु माझी अशी खात्री आहे कीं स्त्रियांचीं निंद्य कर्मं वाढल्यानंतर पुरुषांना पुरुषांशीं लग्न लाविल्याशिवाय दुसरं गत्यंतरच राह-णार नाहीं. मी स्त्रीद्वेष्टा म्हणून या कुसुमपुरांत प्रसिद्ध असल्यामुळें या कामांत

पुढाकार घेण्याचं ठरविलं आहे. पण, याला तुमची मदत पाहिजे. आपलं हें लग्न म्हणजे स्त्रियांच्या वाईट चालीवर एक रामबाण औषधच आहे.

**नलिनीः**–माझंही मत तुमच्यासारखंच आहे. पण अशा तऱ्हेचा विचित्र विवाह कायदेशीर कसा होणार ? आणि या विचित्र विवाहाची बातमी चोहोंकडे कशी पसरणार ?

**डॉ० कार्तिकेयः**–विवाहाच्या कायदेशीरपणाबद्दल जर म्हणाल, तर माझी अशी खात्री आहे कीं, गांवांत या विवाहाला कोणताही धर्माधिकारी आपली संमति देणार नाहीं; कारण हें स्त्रीजातीच्या विरुद्ध पुरुषांचं बंडच होणार आहे. दक्षिणेच्या रूपानं जोंपर्यंत ओंजळीच्या ओंजळी रुपये मिळत आहेत, तोंपर्यंत ते स्त्रियांच्या विरुद्ध ब्रही काढणार नाहींत; इतकंच नव्हे, तर एखाद्या भरपूर दक्षिणा देणाऱ्या बाजारबसवीच्या धंद्याची देखील तारीफ करतील. कोणताही ग्रामाधिकारी हें लग्न कायदेशीर आहे अशी याची नोंद करणार नाहीं, व कोणताही समाजसुधारक, आपल्या प्रार्थनामंदिरांत या लग्नाचा विधि उरकणार नाहीं. पण आपल्या पूर्वजांनीं घालून दिलेली गांधर्वविवाहाची पद्धत पुन्हां अमलांत आणली म्हणजे झालं. लग्न म्हणजे करार पाळण्याची शपथ आहे.

**नलिनीः**–तरी पण हल्लींच्या कालमानाप्रमाणें कोणी तरी साक्षीदार असलेला बरा. कारण नेहमींच्या रंगभूमीवर प्रेक्षकसमुदाय साक्षीदाराच्या जागीं असतो. परंतु जगाच्या विशाल रंगभूमीवर या वेळीं हें कृत्य पहायला एकही प्रेक्षक नसल्यामुळें, ही साक्षीदाराची उणीव मला फारच भासत आहे.

**पूर्णचद्रः**–( पुढें होऊन ) नका, अशी उणीव भासूं देऊं नका ! तुमचं चरित्र मीं आतांपर्यंत लक्ष्यपूर्वक ऐकलें आहे, आणि परमेश्वराला हा विवाह संमत आहे अशी तुमची खात्री करण्याकरितां ही तुमची साक्षीदाराची उणीव मी स्वतः पुढें होऊन दूर करीत आहे. बोला आणखी कांहीं तुमच्या अडचणी असतील तर. माझ्या शक्तीप्रमाणें त्या सर्व मी दूर करीन.

**डॉ० कार्तिकेयः**–हे वृद्ध पुरुषा, तूं कोण आहेस ? आणि या ठिकाणीं कां आलास ?

**पूर्णचंद्रः**–सध्यां तें कांहीं विचारूं नका. भुकेनं माझे प्राण व्याकुळ होत आहेत. परंतु तुमचा हा मनोरंजक संवाद ऐकून क्षणभर मी आपली तहान-

भूक विसरलों होतों. तुमच्या संवादाचा गोड शेवट जसजसा जवळ येत चालला, तसतसा मी देहभान विसरत चाललों; आणि शेवटीं, या गृहस्थांना आलेली साक्षीदाराची अडचण दूर करण्याकरितां झटूकन पुढें आलों. आटपा लौकर. आपल्या मनाप्रमाणें आपण सर्व गोष्टी उरकून घ्या.

**नलिनीः**–( स्वगत ) हा म्हातारा एकदम इथें कसा आला आणि हा आहे तरी कोण !

**पूर्णचंद्रः**–काय हो ! विचार कसला करतां ? परमेश्वरानं तुमच्या मना प्रमाणें साक्षीदार पाठविला म्हणून गोंधळलांत का काय ?

**नलिनीः**–( स्वगत ) ही संधि, हा विषय आंवरता घेण्याला बरी आहे. ( उघड ) छे; छे; गोंधळलों नाहीं. हा आमचा विनोद चालला होता. डॉक्टर-साहेब, मी उद्यां येऊन आपल्याला पुन्हां भेटेन.

**डॉ० कार्तिकेयः**–वा ! असं कुठें झालं आहे ! हे पाहुणे आले आहेत यांची विचारपूस करूं या. त्यांतून जेवायची वेळ झाली आहे, जेवून जा. म्हणजे माझं सर्व घर अनायासं तुमच्या नजरेस पडेल. ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळः**—पद्माकराचें घर.

( पद्माकर कोंचावर आपल्याशींच बोलत बसला आहे. )

**पद्माकरः**—नाहीं बुवा, आपला विश्वासच बसत नाहीं. पण या आंदोलांत छापलं आहे, तेव्हां खोटं कसं म्हणावं ! पण छापलं म्हणून काय झालं ! छापलेलं सर्वच कांहीं खरं नसतं. त्यांतून हीं वर्तमानपत्रं म्हणजे काय, नुसतीं भुतं आहेत. वाटेल तें छापतील. आणि पुढल्या अंकांत आपल्या चुकीची दुरुस्ती करतील. ( विचार करून ) तें सर्व खरं, पण मालकांची काय वाट झाली असेल ! त्यांची हॉस्पिटलमध्यें शुश्रूषा करणारे स्वयंसेवकही मृत्यु पावले असं यांत लिहिलं आहे. काय प्लेगचा भयंकर तडाखा हा ! ते स्वयंसेवक मेले हें खरं असेल;

पण माझे मालक कांहीं मेले नसतील. यांत त्या पाजी कृष्णकांताचा कांहीं डाव नसेल ना ! कारण तो मोठ्या खुषींत दिसतो आहे. वहिनीसाहेब वाईट रीतीनें वागतात, पण काल ही बातमी ऐकल्याबरोबर त्यांनीं रडून रडून आकाशपाताळ एक केलं, असं मावशी सांगत होत्या. साहजिकच आहे. पतीचा मृत्यु कोणत्या पत्नीला रडविल्याशिवाय राहील ? या कृष्णकांताचा व त्यांचा स्नेह कांहीं ठीक नव्हता. साहेब घरांत नसले, तरी हा नेहमीं बंगल्यांत पडलेला. ही शालूची चिथावणी त्याचीच. काल अमावास्या होती म्हणून माझं मन कचरतच होतं, बंगल्यांत आल्याबरोबर अपशकुनही झालाच, आणि शेवटीं तोच खरा ठरला अं ? मग काय माझे धनी मेले म्हणून समजूं ? माझं मन ही गोष्ट कबूलच करीत नाहीं. ते खास जिवंत आहेत आणि मला भेटणार अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. ते पहा, मला हांका मारीत आहेत. ( पडद्यांत ' पद्माकर ' ' पद्माकर ' अशा हांका ऐकूं येतात. ) हा पहा मी आलोंच. ( कोंचावरून उठणार इतक्यांत कमला हातांत दूध घेऊन प्रवेश करते. ) मला कोणीं हांक मारली ? रावसाहेब बाहेर आले आहेत ? मला कांहीं दूधबीध नको, आधीं त्यांना भेटूं दे. त्यांना आंत घेऊन येतो, त्यांच्याकरितां थोडं दूध आण, ते दमले असतील. ( जावयाला निघतो. )

**कमलाः**–( त्याला आडवून ) पद्माकर, पद्माकर, असं काय बरं करावं ! मेलेलीं माणसं का पुन्हां जिवंत होत असतात ! कालपासून पोटांत अन्न नाहीं, त्यामुळें तुम्हाला पित्त झालं आहे. थोडं दूध घ्या म्हणजे बरं वाटेल. ( तो नाहीं म्हणतो. ) थोडं घ्या, अगदीं थोडं, एक घोट. असं काय बरं !

**पद्माकरः**–कमले, माझ्या धन्यांची काय वाट झाली, हें कळल्याशिवाय मला कांहीं गोड लागणार नाहीं. तूं कां उगीच आग्रह करतेस ?

**कमलाः**–हातांत आंदोलचा अंक आहे. आतां कांहीं तरी शंका आहे का ? नका असा त्रास करून घेऊं. ( तो नाहीं म्हणतो. ) नाहीं का माझं ऐकत ? थोडं घ्या, एक घोट. ( पेला पुढें करते. )

**पद्माकरः**–( पेला हातांत घेऊन तिच्याकडे पहात ) तुझ्यापुढें माझा इलाजच चालत नाहीं. ( दूध पितो. ) तूं जवळ असलीस म्हणजे मला आनंद वाटतो. पण—

**कमलाः**–पण काय ? काय आलं मनांत ? मीं ओखळलं, पण तुम्ही सांगा.

**पद्माकरः**–या वेळीं हे विचार नकोत. माझं चित्त नाहीं ठिकाणावर. ( सचिंत बसतो. )

**कमलाः**–( स्वगत ) या वेळीं यांचं मन दुसरीकडे न्यायला हें फार चांगलं साधन आहे. अमळ चिकाटी धरली पाहिजे. आजपर्यंतच्या आमच्या आंधळ्या प्रेमाला या विषयांतर करण्याच्या प्रयत्नांत दृष्टि येईल. ( उघड ) मघाशीं काय बोलणार होतां तें सांगा म्हणजे येईल ठिकाणावर. सांगा, काय मनांत आलं ? मी कांहीं तुम्हांला तशी सोडणार नाहीं.

**पद्माकरः**–तुला पूर्णचंद्र हा लोक सोडून गेले असं वाटतं का ? का नाहीं वाटत ? त्यांच्याबद्दल तुला वाईट वाटत नाहीं ?

**कमलाः**–वाईट वाटत नाहीं असं कसं होईल ? पण तुमचा आणि त्यांचा सहवास अधिक; म्हणून तुम्हांला अगदीं चुकल्यासारखं झालं आहे. पण मघाशीं अर्धवट काय बोललांत तें सांगा आधीं.

**पद्माकरः**–( स्वगत ) हिनं आज माझी पाठ पुरविली आहे. आपणही विषय बदलावा. ( उघड ) तुझ्या लग्नाबद्दल मावशी खटपट करीत आहेत. त्यांच्या मनांतून तुला कृष्णकांताला द्यावी असं आहे, पण आतां तें कसं होणार ?

**कमलाः**–होणार नाहीं ना ? फार चांगलं. माझी कुठें या गोष्टीला संमति आहे ? तुम्हांला हें नाहीं का ठाऊक ? मला त्यांचा स्वभाव मुळींच आवडत नाहीं.

**पद्माकरः**–पण तो श्रीमंत आहे, निदान होणार तरी आहे.

**कमलाः**–श्रीमंतीवर कांहीं सुख अवलंबून नाहीं, परस्परांच्या प्रेमावर आहे.

**पद्माकरः**–मग तुझं कुणावर प्रेम आहे ?

**कमलाः**–तुमचं माझ्यावर प्रेम आहे, हें तुम्ही बोलून दाखविल्याशिवाय मी तोंडांतून एक ब्र देखील काढणार नाहीं.

**पद्माकरः**–काय ! तुझं माझ्यावर प्रेम आहे ? वेडी कुठली ! कृष्णकांताशीं तुझं लग्न होऊं नये अशी माझी इच्छा आहे, पण तींत कांहीं स्वार्थ नाहीं. तो

वाईट मनुष्य आहे, तेव्हां तुझ्यासारख्या सुशील आणि सुशिक्षित तरुणींचा त्या-च्याशीं विवाह होणं म्हणजे मर्कटाच्या गळ्यांत रत्नमाला पडण्यासारखंच आहे.

**कमला**:–हीं विशेषणं मला कांहीं शोभत नाहींत. पण तुमच्यासारख्या सुशील आणि सुशिक्षित तरुणांनीं, विनाकारण अविवाहित राहूं नये अशी माझी इच्छा आहे. पण तींत कांहीं स्वार्थ नाहीं. माझं एवढंच म्हणणं आहे कीं, असं करणं म्हणजे कोंदणाशिवाय हिरा ठेवण्यासारखं आहे.

**पद्माकर**:–हें पहा, मला सर्व कांहीं समजतं, पण मी काय करूं ? तूं मला आवडतेस, पण मावशींना माझी गरीबी आवडते आहे का ? हें पहा, तुला श्रीमंत नवरा मिळाला तर मला आनंदच आहे. तूं थोडीशी वाट पहा. अशी अधीर होऊं नको. म्हातारी खास कोणी तरी हुडकून काढील.

**कमला**:–तें कांहीं नाहीं; आजपासून तुमच्या शिवाय जगांतील इतर सर्व पुरुष मला भावासारखे आहेत. मी आपलं प्रेम व त्याजबरोबर आपलं सर्वस्व या चरणीं अर्पण केलं आहे. काय वाटेल तें होवो. मी कांहीं आईच्या म्हण-ण्याला कबूल होणार नाहीं. ही पहा मी तुमच्या गळ्याची शपथ वहातें. तुम्हीं मला पदरांत घेतलीच पाहिजे. नाहींतर आई एखाद्या श्रीमंताला गळ घालून माझ्या मताविरुद्ध मला त्याच्या गळ्यांत बांधील, म्हणून मी तुमच्या गळीं पडलें आहें. मला दूर लोटूं नका.

**पद्माकर**:–नाहीं, तुला अंतर देणार नाहीं. पण तुला गरीबींत सुख मानलं पाहिजे.

**कमला**:–( पावलांचा आवाज ऐकलासें करून ) आईच आली वाटतं. ( त्याच्यापासून दूर होते. )

( मेनकाबाई प्रवेश करते. )

**मेनकाबाई**:–कमले पोरी, काय आरंभलं आहेस ? पद्माकर, तुला मी आपल्या घरीं ठेवून घेतला त्याचं असंच चीज करणार का ? वाहवारे वाहवा ! फार छान ! असला फाजिलपणा माझ्या नाहीं हो कामाला यायचा.

**कमला**:–आई, काय ग झालं यांत ? कालची बातमी ऐकल्यापासून पद्मा-कर अगदीं अस्वस्थ झाले आहेत; त्यांना मुळींच चैन पडत नाहीं, म्हणून त्यांच्या मनाची करमणूक करीत बसलें होतें. यांत फाजीलपणा तो काय झाला !

**मेनकाबाई**:–पहा कशी चुर चुर बोलते आहे. अग पोरी, याच्या नादीं लागून भीक का मागायची आहे ? चांगला गोरागोमटा आहे; पण कपाळकरंटा आहे ना ! होती नोकरी २० रुपड्यांची तीही आतां जायच्या बेतांत आली आहे. विलासिनीचं आणि याचं कांहीं पटायचं नाहीं. याला चांभारचौकशा फार हव्यात. डोळे मिटून काम करण्याची संवयच नाहीं. खबरदार पुनः यांच्याशीं अशी बोलत बसलीस तर. पद्माकर, असा रडत काय बसला आहेस ? जा, तुझ्या वहिनीसाहेबांनीं तुला बोलावलं आहे. आज साऱ्या दिवसांत तिकडे फिरकला देखील नाहींस; तुला कांहीं वाटत नाहींरे ? समाचाराला येणाऱ्या सगळ्याच माणसांना कांहीं तिला भेटायचं नाहीं; तेव्हां बाहेर कोणीतरी पाहिजे. त्यांना आतां बाहेर पडतां येत नाहीं. तसंच कोणी मोठं माणूस आलं असेल तेव्हां त्या भेटतील. बाकीच्यांना परस्पर तूंच वाटेस लावलं पाहिजेस. कोणीही नवं माणूस आलं कीं त्यांना रडावं लागतं. तेव्हां असा कांहीं तरी अटकाव असल्याशिवाय डोळ्यांत पाणी सांठायला तरी कांहीं अवकाश हवा कीं नको. जा, तूं पुरुषासारखा पुरुष असून रडत बसला आहेस आणि ही एवढीशी पोर तुझी समजूत करते. जा, आधीं जा. पण लवकर येहो. ( पद्माकर जातो. ) कमले, तिनिसांजा आतां होतील; तूंही घरांत जा. तो तासाभरांत परत येईल, तोंपर्यंत सैंपाक झाला पाहिजेना ?

**कमला**:–( स्वगत ) थोडक्यांतच निभावलं म्हणायचं. पुढची बात पुढें पहातां येईल.

( जाते. )

**मेनकाबाई**:–हा पद्माकर जर घरचा गरीब नसता, चांगला एखाद्या श्रीमंताचा मुलगा असता, तर मला पोरीच्या लग्नाची मुळींच काळजी नव्हती. तो कृष्णकांत आतां खास बहकणार. तो कसचा आपल्या हातीं लागतो ! आपल्याला आतां दुसरा विचार पाहिलाच पाहिजे. मी तरी या पद्माकराला इतक्यांतच कशाला दुखवूं ! म्हणतातना, पुरुषाचं भाग्य देवादिकांना देखील कळत नाहीं. पाहूं पुढें काय काय होतं तें. बाकी कृष्णकांताबद्दल इतक्यांतच तसं निराश व्हायचं कांहीं कारण नाहीं म्हणा. थोडे दिवस दम धरला पाहिजे. पोरीनं घरांत दिवेबिवे तरी तयार केले आहेत कीं नाहींत हें पाहिलं पाहिजे.

( जाते. )

---

# प्रवेश ४ था.

स्थळः–कार्तिकेय याचें घर.

( पूर्णचंद्र व एक गडी येतात. )

**पूर्णचंद्रः**–काय ! ते तुला भेटले नाहींत ! त्यांच्या घराला कुलूप होतं !

**गडीः**–होय, साहेब, हें घ्या आपलं पत्र.

**पूर्णचंद्रः**–( पत्र घेऊन ) बरं दुसरं पत्र ?

**गडीः**–तें टपालाच्या पेटींत टाकलं. ( गड्याला बक्षीस देतो व जातो. )

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांताच्या ऐवजीं पद्माकराकडे पत्र पाठविलं असतं तर बरं झालं असतं ! कारण आज रविवार आहे, तेव्हां संध्याकाळची डिलिव्हरी नाहीं. मग पद्माकर तरी कसा येणार ! असो झालं तं झालं ! पण डॉक्टर कां अजून येत नाहीं ! अहो डॉक्टर, अहो कार्तिकेय.

**डॉ० कार्तिकेयः**–(प्रवेश करून) काय म्हणतां ! कपडे ठीक झाले कीं नाहीं!

**पूर्णचंद्रः**–कपडे ठीक झाले, पण त्यांची किंमत काय ?

**डॉ० कार्तिकेयः**–मी कांहीं शिंपी नव्हे. माझे आईबाप सुई दोरा नसून बाटली आणि खलबत्ता आहेत हें आपण विसरलांत म्हणून असं बोललांत. माझ्या जवळ हे कपडे शिल्लक राहिलेले आहेत.

**पूर्णचंद्रः**–पण हे तुमचे नाहींत असं तुम्हीं मघाशीं म्हटलंत ना ?

**डॉ० कार्तिकेयः**–मग माझे नाहींतच. त्यांचा मालक मेला. पृथ्वीच्या पोटांत रांडुबाईसारखा दडून बसला आहे.

**पूर्णचंद्रः**–अरेरे ! फार वाईट गोष्ट झाली ! तो कशानं बरं मेला ?

**डॉ० कार्तिकेयः**–तो आपल्या हातानं मेला. थट्टा नव्हे, खरंच आपल्या हातानं मेला.

**पूर्णचंद्रः**–म्हणजे काय ?

**डॉ० कार्तिकेयः**–म्हणजे काय ! अहो म्हणजे त्यानं आपल्या हातानं गळफांस लावून घेऊन प्राण दिला.

**पूर्णचंद्रः**–काय म्हणतां आत्महत्या केली ? कां म्हणून ?

**डॉ० कार्तिकेयः**—कां म्हणून! तो रड्या होता आणि त्याची बायको रंगेल होती म्हणून. एक दिवस तो माझ्याकडे आला, आणि मला म्हणाला कीं बायकांच्या रंगेलपणाला कांहीं औषध असेल तर मला सांग. मी पडलों त्यांतला दर्दी. मी त्याला रंगेलपणाच्या भावना विचारल्या. त्यानं त्याबरोबर सांगितल्या.

**पूर्णचंद्रः**—काय, भावना तरी काय सांगितल्या ?

**डॉ० कार्तिकेयः**—अहो त्या अगदीं ठरलेल्या आहेत. एखाद्या स्त्रीला रंगेल-पणाचा रोग जडला कीं तिचे सांधे लवचिक होतात. माना वेळणं, कंबर लच-कावणं, तुर तुर चालणं, ठुमकणं, मुरडणं, नाकांतील नथ उडवणं इत्यादि इत्यादि त्याचीं दृश्य लक्षणं आहेत. वांकड्या नजरेनं पुरुषांच्याकडे पहाणं हेंही त्याचंच द्योतक आहे.

**पूर्णचंद्रः**—पण यांपैकीं एकही लक्षण त्या स्त्रीनं दृष्टोत्पत्तीस येऊं दिलं नाहीं, तर मग रंगेलपणा कसा ओळखायचा ?

**डॉ० कार्तिकेयः**—अगदीं सोपीशी खूण सांगतों. जिचं तोंड सदा रंगलेलं ती रंगेल !

**पूर्णचंद्रः**—खाशी डॉक्टर ! बरं पुढें.

**डॉ० कार्तिकेयः**—पुढें काय ? मी त्याला औषध सांगितलं. अगदीं रामबाण औषध. हटकून गुण. अलीकडे बोकाळलेल्या सवंग वैद्यांच्या जाहिरातींतील ह्या भपका नव्हे बरं !

**पूर्णचंद्रः**—असं आहे तर आपल्यालाही ऐकलेलं असूं दे.

**डॉ० कार्तिकेयः**—ठेवाच ऐकून; वैद्यशास्त्रांतील प्रमेयं झांकून ठेवण्याचा ह्या मनु नव्हे. हें पहा, एखाद्या स्त्रीला जर रंगेलपणा जडला तर तिला एक खोल खड्डा खणून त्यांत जिवंत गाडावी. म्हणजे पुढल्या जन्मीं ती निर्मल होऊन बाहेर येईल. हें ऐकल्याबरोबर त्या तरुणाची कंबरच खचली. बायकावर त्याचं अनिवार प्रेम. त्यानं एक दिवस माझ्याच घरीं संधि साधून गळफांस लावून घेतला, आणि दिलान प्राण. त्याची रंगेल बायको हल्लीं जिवंत आहे. एका जन्मांत नवऱ्याच्या तिनं किती पिढ्या पाहिल्या आहेत याचा अंदाज करा-यला, ब्रह्मदेवाच्या चित्रगुप्तांना दर रोज खानेसुमारी करावी लागते. अस-ल्या बायकांना प्लेग होत नाहीं, कांहीं नाहीं; कशा टुणटुणीत असतात. पण तो

विचारा शौर्यसागर काल एकाएकीं प्लेगनं मेला. तो मरायला नको होता. फार छान माणूस.

**पूर्णचंद्रः**–तो असा होता तरी कोण ?

**डॉ० कार्तिकेयः**–होता तरी कोण ? अहो तो मोठा दिलदार सरदार होता. मा त्याला ओळखत होतों. त्याची बायको, ती सुबक छबकडी, पांढरी सफेत मऊ लुसलुशीत विषारी नागीण आहे. माझा आणि तिचा उभा दावा.

**पूर्णचंद्रः**–तुम्ही चुकतां आहां; ती पूर्णचंद्राची बायको नसेल. तुम्ही तिच्या नवऱ्याचं वर्णन करा पाहूं.

**डॉ० कार्तिकेयः**–अहो मी चुकत नाहीं. तिच्या नवऱ्याचं वर्णन करतों म्हणजे तुमची खात्री होईल. तो तुमच्या इतकाच उंच होता. तुमच्यासारखाच त्याचा अंगलोट. पण तो इतका तेजस्वी होता कीं त्याच्या चेहेऱ्यावर नजर ठरत नसे. नाक अगदीं तुमच्यासारखं. आतां तुमचे डोळे खोल गेलेले आहेत, गाल बसलेले आहेत, आणि केंस पांढरे झालेले आहेत. याशिवाय तुमच्यांत आणि त्याच्यांत कांहींच फरक नाहीं. तुम्ही हें भटकत फिरायचं सोडून जर शरीरावर थोडंसं मांस आणाल व केसांना कलप लावाल, तर तुम्हाला देखील लोक – पण लोकच काय—पूर्णचंद्राची बायको देखील पूर्णचंद्रच जिवंत होऊन आले आहेत असं म्हणेल. इतकं कशाला ? कोण आहे रे तिकडे ! बॉय !

**बॉयः**–( प्रवेश करून ) साब.

**डॉ० कार्तिकेयः**–टेबलावर आरसा आहे तो घेऊन ये.

**बॉयः**–जी साब. ( जातो व आरस घेऊन येतो. )

**डॉ० कार्तिकेयः**–( आरसा पूर्णचंद्राला दाखवून ) हे पहा, पिकलेले पोक्त पूर्णचंद्र कसे दिसतात ते !

**पूर्णचंद्रः**–( आरशांत पाहून स्वगत ) काय विलक्षण फरक हा. खरंच मी अगदीं अस्सल म्हातारा झालों ! ( उघड ) पण कायहो, पूर्णचंद्राच्या बायकोवर कां तुमचा एवढा दांत ! तिनं काय तुमचं घोडं मारलं होतं !

**डॉ० कार्तिकेयः**–तिनं माझं घोडं मारलं नव्हतं; पण तिच्या घोड्यानं मला लाथ मारली होती. तेव्हां ती मला हंसली. मला दुःखापत झालेली पाहून तिनं दांत विचकले. लोक तुम्हाला सांगतील कीं ती अगदीं साधी भोळी आहे. पण

तें सब झूट आहे. त्या वेळीं तो उल्लू कृष्णकांत तिच्याबरोबर होता. तिचा नवरा नव्हता. तो बरोबर असता तर ती अशी वागलीच नसती. पण त्याचं काय आतां. तुम्हाला एवढंच सांगतों, कीं तिचं त्या वेळचं हंसणं थेट माझ्या बायकोसारखं होतं.

**पूर्णचंद्रः**–बरं मग, असेल ! त्याचा रागाशीं काय संबंध.

**डॉ० कार्तिकेयः**–अहो हंसण्यांत सारखेपणा होता म्हणून मला तिच्या वर्तनाचा एवढा राग आला. त्या दोघींना सारखाच मृत्यु यावा अशी माझी फार इच्छा आहे. पण तसा योगायोग येणं कठीण. पैकीं एक तर मेली.

**पूर्णचंद्रः**–ती कशी मेली ?

**डॉ० कार्तिकेयः**–कशी मेली ! अहो मेली कसची, मारली. मी एकदा गांवाला गेलों होतों, तो ठरलेल्या वेळेच्या आंतच परत आलों; घरीं येऊन पहातों तों एक गुलजार गडी आणि माझी बायको एके ठिकाणीं. त्यासरशी माझं डोकं फिरलं; आणि मग काय, घेतला सुरा आणि भोंसकला त्या अवदसेच्या उरांत. ती धाडकन् खालीं पडली. जिकडे तिकडे रक्ताचा सडा झाला. मीही शांतपणानं तो सुरा त्या तरुणाला दिला; आणि त्याला सांगितलं की माझ्या बायकोनं तुला प्रेमाची खूण दिली आहे म्हणून समज. पुढें खटला झाला. पण मी जेव्हां न्यायाधीशांना खरी हकीकत सांगितली तेव्हां त्यांनीं मला सोडून दिलं आणि बायकोच्या शवाची व्यवस्था करायला सांगितलं. तिला अलीकडे भिन्न भिन्न व्यक्तींचे मुके आवडूं लागले होते, असं मला कळलं; तेव्हां तिचं शव दहन करण्यापेक्षां पुरावं असं मीं ठरविलं; हेतु इतकाच कीं, तिच्या शरीरावर किड्यांच्या उड्या पडून तिची मुक्यांची हौस त्यांनीं पूर्ण करावी.

**पूर्णचंद्रः**–एकंदरींत तुम्ही खुनी आहांत !

**डॉ० कार्तिकेयः**–मी खुनी आहें ! छे ! नाहीं, तीच खुनी आहे. ज्यावेळीं ती परपुरुषाच्या गळीं पडली, त्याचवेळीं तिनं माझा गळा कापला. हल्लीं दररोज ती मला दिसते. मला झोंपसुद्धां येत नाहीं. आणि मी नेहमीं पाण्याबाहेर काढलेल्या माशासारखा तळमळत असतों. पण ही आमची रडकथा तुम्ही कोठवर ऐकाल ? तुम्हाला उशीर नाहीं का होत ?

**पूर्णचंद्रः**–बरं तर येतों आतां. आपल्याला तसदी पडली त्याची माफी करा.

**डॉ० कार्तिकेयः**—तसदी कसची! पण जाणार कुणीकडे?

**पूर्णचंद्रः**—घरीं.

**डॉ० कार्तिकेयः**—घरीं कोण कोण आहे?

**पूर्णचंद्रः**—माझी बायको आहे.

**डॉ० कार्तिकेयः**—तर मग जा; जा; लवकर जा. तिच्या नरडीचा घोट घ्या. माझी तुम्हाला शपथ आहे. जा लौकर जा. तिच्या नरडीचा घोट घ्या.

( जातो. )

**पूर्णचंद्रः**—आपल्या बायकोच्या निंद्य वर्तनानं बिचाऱ्याचं डोकं फिरलं आहे. माझ्या लाडकीच्या अविचारामुळें त्याचा तिच्यावर राग आहे हेंही साहजिकच आहे. किती प्रेमळ मनुष्य पण तो आतां पक्का स्त्रीद्वेष्टा बनला आहे. स्त्रियांची निंदा करणं हा त्याचा धंदाच झाला आहे; तिकडे लक्ष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एक दिवस माझ्या देहाला असल्या क्षुल्लक वेदना झाल्या तर माझी अशी स्थिति झाली, मग ज्याच्या मनालाच एवढा धक्का बसला आहे त्याला वेड लागावं, यांत काय नवल! प्रेमलतेवर किडे पडल्यामुळें ती उपटून टाकण्याची पाळी यावी, याहून दुर्धर प्रसंग तो कोणता! पण या वेळीं माझ्या प्रेमलतेला मी आनंदाश्रुजल घालण्याकरितां जात आहें, आणि त्या ठिकाणीं एक देखील किडा असणं शक्य नाहीं; तेव्हां मला त्या प्रसंगाची भीति कशाला! ( जातो. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थळः**—बाग.

**पूर्णचंद्रः**—जाऊं का असाच एकदम घरांत. ती मला ओळखील का! खास नाहीं ओळखणार. मी मेलों आहें, अशी तिची समजूत आहे. तेव्हां आपण मागच्या दरवाज्यानंच घरांत जावं, आणि पद्माकर किंवा कृष्णकांत जर घरांत असतील तर त्यांना युक्तीनं भेटून आपली हकीकत कळवावी. म्हणजे काल्पनिक भीतीचे तसेच खऱ्या आनंदातिरेकाचे प्रकार होण्याला जागाच

रहाणार नाहीं. हा संध्यासमय माझ्या मनाला किती आनंद देत आहे. या मंद वाहणाऱ्या वायूवर आरूढ होऊन माझ्या बागेंतील कुसुमगंध मला सामोरा येत आहे, आणि मी आल्याची बातमी येतां येतां या वृक्षांना कळवीत आहे; त्यामुळें ते पहा कसे आनंदानं डोलत आहेत; आणि आपल्या पल्लवितकरांनीं मला जवळ येण्याविषयीं खुणावीत आहेत. माझी गुप्तपणें येण्याची इच्छा त्यांना कळल्यामुळेंच कीं काय, त्यांनीं ही मूकवृत्ति धारण केली आहे. या वेळीं सर्व पशुपक्षी आनंदानं आपल्या घरीं जाण्याकरितां निघाले आहेत. त्यांच्याच आनंदाचं प्रतिबिंब समान कार्यामुळें माझ्या-ही अंतःकरणावर उमटलं आहे. ते पहा आपल्या पिलांना वर्दी देण्याकरितां, आपले आनंदस्वर मुक्तकंठानं बाहेर काढीत आहेत. मीही आपल्या बाळाला मोठ्यानं हांका मारूं का ? बाळ, बाळ, ( दचकून ) पण हे कोण इकडे येत आहे ! थोडंसं आड उभं राहून कोण येत आहे हें पाहूं या. त्यांनीं माझा आवाज ऐकला तर नसेलना ! ( आड उभा रहातो. )

( कृष्णकांत व विलासिनी हातांत हात घालून हंसत हंसत येतात. )

**पूर्णचंद्रः**–अरे वा ! माझी प्रियाच इकडे येत आहे आणि कृष्णकांतही तिच्या बरोबर आहेच. ( नीट पाहून ) पण त्यानं तिचा हात आपल्या हातांत धरला आहे आणि तीं दोघंही आनंदांत आहेत ! पण हा मला भास तर होत नाहींना ! तीं पहा, कांहीं तरी बोलताहेत, हंसताहेत. खास, विलासिनीचंच हें हंसणं. पण ती हंसते आहे काय म्हणून ? यावेळीं तिच्यावर दुःखाचा गहजब उडाला आहे. तिचा नवरा मेला आहे, तिच्यावर आकाश कोसळलं आहे, असं असून ही हंसते आहे, खिदळते आहे. तिला वेड तर नाहींना लागलं ? माझ्या अकालीं मरणाचं दुःख तिला सहन झालं नाहीं. तिचं कोमल अंतःकरण खास फाटून गेलं आहे. नाहीं तर ती अशी हंसली नसती. रडून ओरडून तिनं आकांत करून सोडला असता. दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन ती अंधेरांत बसली असती. पण यापैकीं ज्या अर्थी कांहींच प्रकार नाहीं, उलट ती आनं-दानं मोठमोठ्यानं हंसते आहे, त्या अर्थी हिला खास वेड लागलं. काय हें निष्कपट प्रेम ! अहाहा, मला असं झालं आहे कीं, मी तिला केव्हां आलिंगन देईन आणि तिच्या अधरोष्ठांचं कधीं चुंबन घेईन.

**कृष्णकांतः**–प्रिये विलासिनी, तूं त्या अरसिक नवऱ्याच्या आलिंगनांतून

आणि त्याच्या चुंबनाच्या त्रासांतून कायमची मुक्त झालीस. आतां यापुढें तुझ्यावर या कृष्णकांताशिवाय दुसऱ्या कोणाचीही मालकी नाहीं.

**विलासिनीः**—कांहीं जिभेला हाड आहे का? माणसानं कांहीं वेळ पाहून बोलावं. कालचना ते गेले! मग, मी आज दुःखीकष्टी आहें एवढंसुद्धां तुम्हाला कळूं नये! तुम्ही माणूस आहांत कीं कोण आहांत? (तो तिला आलिंगन देण्यास पुढें होतो, ती त्याला झिडकारते.) चला व्हा दूर, माझ्या अंगाला हात लावाल तर खबरदार.

**पूर्णचंद्रः**—(स्वगत) अरे काळ्या! माझी प्रिया वेडी झाली आहे हें पाहून तिच्या पातिव्रत्याचा भंग करतोस. तुला शरम नाहीं वाटत. ती वेडांत देखील तुला झिडकारते, आणि तूं शुद्धीवर असून तिला आलिंगन देतोस, ठीक आहे. अरे पण ही एकीकडे हंसते आहे!

**कृष्णकांतः**—अरे ही रागावली. प्रिये, हा तुझा राग माझ्या ओळखीचा आहे. पण असं करणं तुला शोभत नाहीं. माझं तुझ्यावर निष्कलंक प्रेम आहे.

**विलासिनीः**—(त्याच्याजवळ येऊन) बरं कायहो कृष्णकांत, ते जर अगदीं बिनबोभाट मुकाट्यानं मेले नसते, तर काय बरं झालं असतं?

**पूर्णचंद्रः**—(स्वगत) हें कांहीं वेडाचं चिन्ह खास नव्हे. यांत कांहीं तरी काळंबेरं आहे. इथें कांहीं तरी घोंटाळा आहे.

**कृष्णकांतः**—(हंसत) काय व्हायचं काय? त्या नंदीबैलाला ह्यांतलं एक अक्षर तरी कळलं असतं का? त्याला अशी घमेंड होती कीं, जगांत आपल्याला कोणाची फसविण्याची प्राज्ञा नाहीं. मी तर त्याला बावळट मिजासखोर समजत होतों.

**पूर्णचंद्रः**—(स्वगत) बावळट, मिजासखोर, नंदीबैल, अंगाची आग आग व्हायला लागली.

**विलासिनीः**—ते गेले पण तुम्ही नका असं चुरचुर बोलूं. तुम्हांला तरी कुठें सारासार विचार आहे! तुम्हांला एवढं का कळं नये? आतां माझ्याकडे असं येणं कांहीं चांगलं नाहीं. लोक नांवं ठेवितील आणि नोकर माणसं देखील उद्यां कुजबुज करूं लागतील. हें पहा पहिले दहा दिवस मला सुतक धरलंच पाहिजे. आणखी वर्ष सहा महिने पांढरीं वस्त्रं नेसून सुतक्यासारखे घालविले पाहिजेत. अगदीं अज्ञातवासांत राहिलं पाहिजे. गोषा बरं! अगदीं पडदा!

**कृष्णकांतः**–भलतंच, वेडी कुठली ! असं मुळींच करायला नको. हा पहा मी तुला आतांच शिवतों. कसचें सुतक अन् कसचं काय !

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) काय इतकी सलगी ! चालूंदे.

**विलासिनीः**–मग काय करावं म्हणतां, काय म्हणतां सांगा पाहूं ? तुम्हांला मुळींच पोंच नाहीं. मी म्हणतें तेंच खरं.

**कृष्णकांतः**–पूर्णचंद्र मेला नसता तर बरं झालं असतं असं मला वाटूं लागलं आहे. तो कसा मला छान पडदा होता. तुझ्याकरितां मी त्या पडद्यांत राहिलों असतों. पण आतां काय त्याचं !

**विलासिनीः**–अग बाई ! काय वाजलं ? आपण उगीच या ठिकाणीं आलों. त्यांची ही फिरायची जागा होती. नको ग बाई ? चला घरांत. ते कालच मेलेना ! मला वाटतं ते इथें भूत तर होऊन नाहींना आले ?

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) भूत होऊन नाहीं जिवंत होऊन आलों आहें, आणि जिवंत समंध होऊन तुझ्या आणि तुझ्या जाराच्या बोकांडीं बसणार आहें.

**कृष्णकांतः**–तुला उगीच भास झाला.

**विलासिनीः**–मला खरंच त्यांच्याबद्दल वाईट वाटतं. कसं झालं तरी ते माझे पति होते ना ? ती गोष्ट मनांत आल्याशिवाय कशी राहील ?

**कृष्णकांतः**–आणि माझ्या मनांत तें आल्याशिवाय रहातं असं तुला वाटतं ? त्यानं तुझ्या चोरून घेतलेल्या चुंबनाबद्दल त्याला घोर यमयातना भोगाव्या लागतील. ( विलासिनी हंसत हातानें दिवे ओंवाळते. )

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) खासा न्याय. नवरे चोर, आणखी जार साव. नवऱ्यानं घेतलेलं चुंबन चोरी झाली, आणि जाराच्या मिठ्यांत कांहीं पाप नाहीं.

**कृष्णकांतः**–बरं पण, कायग, तूं त्याच्याशीं लग्नच कां केलंस ?

**विलासिनीः**–( स्वगत ) याचं उत्तर देऊन तो नवा विचार जन्माला येण्याच्या आधींच त्याला जागच्याजागीं ठेंचला पाहिजे. ( उघड ) कां केलं म्हणजे ? अहो करणं भागच पडलं. मला माझ्या बापाच्या गरिबीमुळें बहुतेक आजोळींच रहावं लागत असे. तेथलं आयुष्य अगदींच कंटाळवाणं. तें पुराण काय, भजन काय, तें कांहीं विचारूं नका. आरती,

धूपारती, शेजारती पण एक काहीं पुरती धड नाहीं. दुसरं कारण शौर्यसागर पिढीजाद सरदार, श्रीमंत; आणि मी, अगदींच कलाहीन भिकारी. मला-गरिबी सहन होईना. पण खरंच सांगतें कीं, मी गरीब असून देखील माझ्या सौंदर्यावर व हुषारीवर ते भाळले होते, त्याचा मीं फायदा घेतला.

**कृष्णकांत**:–पण तुझं त्यांच्यावर प्रेम होतं का ?

**विलासिनी**:–छे ! मुळींच नाहीं. आणि असलंच तर ८।१५ म्हणजे शिकस्त; आणि होतं प्रेम तें तरी तितपतच. लग्न करायचं कशाला ? सोयी करितां, सुखाकरितां. दौलत अन् दर्जा पाहिजे म्हणुन. लग्न करून मीं या गोष्टी मिळविल्या हें तुम्ही पहातच आहां ! ( हंसून ) कां लग्न करायचं त्याचा कांहीं डोक्यांत उजेड पडला का ? का अजून अंधारच आहे ?

**कृष्णकांत**:–( सुस्कारा टाकून ) माझ्याशीं पुनर्विवाह करून तुला यांतलं कांहींएक मिळायचं नाहीं !

**विलासिनी**:–मी तुमच्याशीं पुनर्विवाह करीन असं कधीं तरी बोललें होते का ? कृष्णकांत, तुम्ही माझे प्रियकर या नात्यानं जितके गोड आहांत तितके पति या नात्यानं नाहीं. शिवाय या वेळीं मी स्वतंत्र आहें. वाटेल तें करण्याला माझी मी मुखत्यार आहें. मला स्वातंत्र्याची गोडी चाखून पाह्यची आहे आणि शिवाय आणखी काय काय करायचं त्याची—

**कृष्णकांत**:–( तिला आलिंगन देऊन ) प्रिये विलासिनी, तुला खचित सांगतों कीं, मला फसविण्याची तुझी प्राज्ञा नाहीं. आजपर्यंत माझ्या प्रेमाला तूं उत्तेजन दिलंस. शब्दानं, स्पर्शानं हावभावानं तूं मला मोह पाडिलास आणि आतां कां माघार घेतेस ? पूर्णचंद्राची तूं बायको, तशीच तूं माझीही आहेस, इतकंच नव्हे तर माझी तुझ्यावर जास्त सत्ता आहे. कारण तूं माझ्यावर प्रेम करितेस. निदान तूं असं म्हणतेस तरी. तूं जरी आपल्या नवऱ्याला फसविलंस तरी माझ्याशीं दगलबाजी करण्याची तुझी छाती नाहीं. हें तूं पक्कं लक्षांत ठेव.

**पूर्णचंद्र**:–अरे नीच्या, भर ! भर आपल्या पापाचा घडा !

**विलासिनी**:–सोडा; मला जाऊं द्या. तुम्ही अगदीं हिरवट आहां. निष्ठुर, क्रूर नाहीं तर ! अगदीं रानटी आहां. माझ्या मनाला जबर दुखापत केलीत. कशा पण वेदना होत आहेत, त्याची तुम्हांला पर्वा नाहीं. चला व्हा दूर. खबरदार अंगाला हात लावाल तर. ( ती निसटून देते. तो तिला धरून आलिंगन देतो. )

**कृष्णकांतः**–लाडके, लाडके, चुकलों, क्षमा कर. मी तुला दुःख देण्याकरितां बोललों नाहीं. तूं सुंदर आहेस, आणि तुझ्या सौंदर्यानं मला वेड लाविलं आहे. मी तरी काय करूं ? विचार कर. आपण स्वतंत्र आहोंत; आपलं आयुष्य सुखकर करणं आपल्याच हातीं आहे. आपल्या सौख्याचा देव देखील हेवा करतील.

**विलासिनीः**–( हंसत हंसत लडिवाळपणानें पण ऐटींत ) कृष्णकांत, तुम्ही खास वेडे आहांत. मीं तुम्हाला माझ्या हृदयांत सांठवून ठेविलं आहे. याहून जास्त काय पाहिजे. वेडेग बाई वेडे ! अगदींच वेडे ! तुम्ही खरंच वेडे आहांत. अहो तुम्ही आनंदाच्या पर्वतावर बसलां आहांतना ? का नाहीं ?

**कृष्णकांतः**- लाडके, नाहीं कसं म्हणूं ? परंतु त्या आनंदाचा उपभोग घेतांना मला कोणी पहात नाहीं, याबद्दल वाईट वाटतं. मत्सराशिवाय प्रेम फिकं पडतं. तुझा नवरा नेहमीं आपल्या ऐटींत. त्यानं तुझी कधींच काळजी केली नाहीं. विलासिनी, माझं तुझ्यावर इतकं प्रेम आहे कीं, माझ्याशिवाय दुसऱ्या कोणींही तुला स्पर्श केलेला मला सहन होत नाहीं. तुझ्या पायाखालीं तुडविली जाणारी धूळ, तुझ्या शरीराभोंवतीं घिरट्या घालणारे हे हवेचे कण, तुझ्या अंगावर वास करणारीं हीं वस्त्रं आणि तूं धारण केलेले अलंकार यांचा देखील मी हेवा करितों. मला असं वाटतं कीं, तुझ्यासारख्या सुंदर तरुणीचा निरंतर सहवास घडावा म्हणून मुद्दाम या निर्जीव वस्तु तुझ्यासभोंवतीं गोळा झाल्या आहेत. तुझ्यावर हक्क सांगण्याची आतां कोणाची प्राज्ञा आहे ! तुझ्याकडे प्रणयदृष्टीनं पहाण्याची कोणाची छाती आहे ? " प्रिये विलासिनी, " असं फक्त मीच म्हणणार. दुसऱ्या कोणत्याही मनुष्याच्या तोंडून हे शब्द बाहेर निघूं देत, कीं त्या शब्दाच्या आघातांनीं उत्पन्न केलेल्या लाटांचा माझ्या कानापर्यंतचा प्रवास पुरा होतो न होतो, इतक्यांत मीही त्याचा इहलोकचा प्रवास पुरा करीन. आणि असं करीन तरच मी नांवाचा कृष्णकांत.

**विलासिनीः**–पुन्हां वेताळ आला पूर्वस्थलावर–आला का पुन्हां राग ! असंच का आतां रागवायचं ? रागवा, रुसा, काच वाटेल तें करा–चला व्हा दूर.

**कृष्णकांतः**–प्रिये लाडके, अशी दूर होऊं नको. मी रागावत नाहीं. ( आलिंगन देऊन ) हा पहा शांत झालों. प्रत्यक्ष ही चंद्रकांतमण्याची माळ

26।।65

या कृष्णकांताचे गळ्यांत पडल्यावर त्याचा संताप राहील कसा ? प्रिये, आतां घरांत चल. अंधार पडूं लागला. आज कांहीं चंद्र दृष्टीस पडला नाहीं. मला वाटतं उगवला तसाच मावळला. बाकी त्याला आज एवढंच काम होतं.

**पूर्णचंद्रः**–( बाहेर येऊन ) एवढंच काम होतं. असाच जाऊन नरडीचा घोट घेऊं का ? माझ्या अंगाची कशी आग आग होत आहे. सर्व नसा कशा ताड ताड उडत आहेत, शरीरांतील सर्व रक्तबिंदु डोक्याकडे धांव घेत आहेत. कल्पनेच्या मैदानावर सुडाच्या निशाणाखालीं कुकर्माच्या बंडाचा नायनाट करण्याकरितां हे केसरी पोषाख केलेले स्वारच धांवत आहेत असं वाटतं. मीही त्यांच्याबरोबर दौडत जाऊन त्या दोघांचे राई राईएवढे तुकडे करितों. ( दचकून ) अरेरे, मी निःशस्त्र आहें. मग हें होणार कसं ! हें मी कसं सहन करूं? त्या विषवृक्षाला बिलगलेल्या विषवल्लीनं आपल्या विषारी श्वासोच्छ्वासानं माझा संसारतरु करपवून टाकिला. हें मला कसं सहन होईल ? तें कांहीं नाहीं. निःशस्त्र असलों म्हणून काय झालं ? माझे दांत कसे शिवशिवत आहेत. तिचं नरडं काडकन् फोडायला कसे उत्सुक झाले आहेत. (विचार करून) पण असं करून काय होईल ? हा सूड नाहीं होणार, हा खून होईल. त्यांच्या निष्कपट प्रीतीचा मीं अविचारानं भलताच अर्थ केला, असं लोक म्हणतील. न्यायदरबारांत मीच खुनी ठरेन. आणि तिचा प्राण घेऊनही सुडाचं स्वारस्य मला चाखायला मिळणार नाहीं. पण तिचा प्राण तर घेतलाच पाहिजे. आणि तो इतक्या भयंकर रीतीनं घेतला पाहिजे कीं, तिच्या शरीरांतून उडणाऱ्या रक्ताच्या चिळकांड्यांनीं पातिव्रत्य भंग करण्याची कल्पना स्त्रियांच्या अंतःकरणांतून साफ धुतली जाईल. तिच्या शरीराबरोबर तिच्या मनाचे हाल हाल झाले पाहिजेत. तरच हा सूड गोड होईल. (विचार करून) पण मीं तरी या भानगडींत कां पडावं ! परमेश्वरावर हवाला ठेवून मी प्रकट होतों आणि वेळ पडल्यास न्यायाच्या दरबारांत मी कोण आहें हें शाबीत करतों. पण हें करून तरी मी काय करणार ? घटस्फोट ! घटस्फोट ! नाहीं, नाहीं, त्या अवदसेच्या बदकर्मानं माझ्या नांवाला फांसलेली काळोखी घटस्फोटानं नाहींशी होणार नाहीं. इतकंच नव्हे तर छिनाल बायकोचा नवरा म्हणून माझं काळं ठिक्कर झालेलं तोंड खग्रास चंद्रग्रहणाप्रमाणें कायमचं लोकांच्या दृष्टीसमोर राहील. हें मी कसं सहन करूं ! शिवाय ज्या लोकांत घटस्फोटाची चाल रूढ आहे त्या लो-

कांत बदफैली बायकांचा सुळसुळाट फार. हें माहीत असून जर मीं ही कीड या देशांत आपल्या हातांनीं आर्यस्त्रियांच्या पातिव्रत्यावर सोडली तर मी रौरव नरकांत जाऊन पडेन. असं जर आहे तर माझी बायको –माझी कसची–आमची बायको–आम्हां दोघांची बायको–मेलीच पाहिजे व त्याबरोबरच तो तिचा साथीदार छानछबेला मेलाच पाहिजे. पण हें व्हावं कसं ? ( विचार करीत हिंडतो. ) माझ्या मनांत विचार आणि विकार यांचा सारखा वाद माजून राहिला आहे. तो कार्तिकेच काय म्हणाला ! "**जा, तिच्या नरडीचा घोट घे.** " या वेळीं देवा ! आकाशवाणी होईल का ? मी विकारवश होऊन त्यांना पापाचे घुटके घेत असतांना भर चवाठ्यावर, सर्व जनता आणि सूर्यनारायण यांना साक्षी ठेवून, त्यांच्या घशांत अनीतीची धूळ कोंबून त्यांचीं तोंडं कायमचीं बंद करूं, किंवा त्यांच्या रक्ताचा सडा शिंपडून त्या धुळीला कायमची बसवून टाकूं ? म्हणजे पुन्हां कोणत्याही स्त्रीपुरुषावर ही धूळ खाण्याचा प्रसंग येणार नाहीं. ( विचार करून ) पण असं बेहोष होऊन अत्याचार केल्यानं सुडाची गोडी जाऊन तो विषासारखा कडू होईल. आणि त्याचीं कच्चीं व आंबट फळं मला चाखावीं लागतील. तें तर मला नको आहे. मला मधुर–गोड फळं पाहिजेत. आणि म्हणून तीं सुडाच्या झाडांवरच संतापाच्या उष्णतेनं पिकलीं पाहिजेत. ( विचार करीत बसतो व एकदम उठून ) बस्स हीच युक्ति ! असंच केलं पाहिजे. विकार आणि विचार यांच्यांत अंतिम साध्याबद्दल एकवाक्यता आहे, पण साधनाच्या मार्गांत भिन्नपणा आहे, आणि तो असणारच. एका मार्गांत घाई तर दुसऱ्यांत ढिलाई दिसते. पण जर शेवट एकच आहे तर वरवर दिसणाऱ्या ढिलाईकडे लक्ष कां द्यावं ? सुडाचे अनेक मार्ग आहेत. पण त्यांत जो सर्वोत्कृष्ट तोच मला पाहिजे. ( उसासा टाकून ) हाच मार्ग ठरला. परमेश्वरानं मला पुनर्जन्म दिला आहे, मला स्वातंत्र्य दिलं आहे, मला बुद्धि आणि विचारशक्ति दिलीं आहेत. इतकंच नव्हे तर माझ्या मृत्यु-पत्रानं त्या चांडाळणीला मिळालेल्या संपत्तीपेक्षां सहस्र पटीनीं अधिक संपत्ति नुकतीच मला दाखविली आहे. यांत त्याचा कांहीं हेतु तरी असला पाहिजे. पण दुसरा काय असणार ! विचारी पुरुषाच्या हातांतील लक्ष्मीला सर्व कांहीं साध्य आहे. मग सर्वोत्कृष्ट सूड कां नाहीं साधणार ? अलबत् साधलाच पाहिजे. बस्स, असंच करणार ! आजपर्यंत कधीं कोणीं ऐकिली नाहीं किंवा पाहिली नाहीं, व यापुढें कित्येक दिवसपर्यंत जिच्याबद्दल आश्चर्य, आदर व

कौतुक वाटत राहील, अशी सुडाची कल्पना माझ्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभी राहिली आहे. माझ्याप्रमाणें ज्यांच्या अब्रूला काळिमा लागली आहे, ज्यांचीं अंतःकरणं दुर्लौकिकानं जळत आहेत, आणि इतकं असूनही ज्यांच्या बायका पृथ्वीच्या पाठीवर छिनाल होऊन धिंगाणा घालीत वावरत आहेत, त्यांच्या अंतःकरणावर या सुडाच्या भयंकर कल्पनेचा कायमचा खोल ठसा उमटविण्याकरितां मी तिला दृश्यरूपानं लवकरच जगाच्या पुढें आणून दाखवितों. ( जातो. )

( पडदा पडतो. )

अंक दुसरा समाप्त.

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**–कुसुमपूरः–( सोशल क्लबच्या दिवाणखान्यासमोरील रस्ता. )

( पूर्णचंद्र व एक वकील प्रवेश करितात. )

**पूर्णचंद्रः**–बक्षीसाहेब, मीं पुष्कळ उपाय करून पाहिले, पण कांहीं उप झाला नाहीं. तुमच्यासारखाच एकाच्या सांगण्यावरून त्या विलायर आलेल्या दर्यापूरच्या डॉक्टराकडे डोळे दाखवायला गेलों होतों. त्याच्या धानं गुण यायचा बाजूलाच राहिला पण त्यानं माझे डोळे मात्र बिघ ठेविले. मी फार दिवसांपासून पहातों आहें, कीं एखादा मनुष्य केवळ विला जाऊन आला, एवढ्याच कारणामुळें लोक त्याची फाजील प्रतिष्ठा वाढवि

**बक्षीसाहेबः**–आपला त्याच्यावर राग दिसतो !

**पूर्णचंद्रः**–अलबत् ! ज्यानं माझ्या दृष्टीला कायमचा अपाय केला त्य कसा नाहीं राग येणार !

**बक्षीसाहेबः**–तेंही खरंच म्हणा; पण आमच्या इथले नवीन अ डॉक्टर करुणेश हे कांहीं तशांतले नाहींत. मला तर वाटतं कीं ते आपले हटकून बरे करतील. त्यांचा हातगुण चांगला आहे.

**पूर्णचंद्रः**–असेल, मी नाहीं म्हणत नाहीं. पण पायगुण वाईट असल त्याच्यायोगानं मी पुरताच धृतराष्ट्र होईन. अहो, तें कांहीं नाहीं. ( आ कडे बोट दाखवून ) या डॉक्टरणीचे माझ्यावर फार उपकार आहेत. ति मुळेंच मला मंडळींत मिसळतां येतं.

**बक्षीसाहेबः**–तसं असेल तर माझा कांहीं आग्रह नाहीं. पण म आतां त्यांची अनायासं क्लबांत गांठ पडतेच आहे, तेव्हां गोष्ट काढली अ

**पूर्णचंद्रः**–तें नांव काढूं नका ! हा दिसतो आहे हाचना क्लब ?

( मंडळी खेळत आहेत असा क्लबचा दिवाणखाना दृष्टीस पडतो. )

**बक्षीसाहेब**:—हाच. चला, आंत चला. आपल्या ओळखीचे इथें थोडे तरी लोक असतीलच.

**पूर्णचंद्र**:—छे, छे. तसा मुळींच संभव नाहीं. मी किती तरी वर्षे परमुलुखांत काढिलीं आहेत. आतां ज्या होतील त्या सगळ्या नव्या ओळखी.

**बक्षीसाहेब**:—बरं तर; मी आतां आपली या मंडळींची ओळख करून देतों. हे प्रोफेसर ब्रह्मगिरी. इथें दयासागर कॉलेजमध्यें प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र शिकवितात. मि. धरणीधर हे मोठे क्रिकेटपटु आहेत. सागर हायस्कुलांत असिस्टंट मास्तर आहेत. हे असे दिसतात, पण मोठे हुषार आहेत. हे डॉक्टर करुणेश! हे रावसाहेब गोपाळदास गुजर ऑनररी मॅजिस्ट्रेट. हे मि. गरुड, हे मोठे कंत्राटदार आहेत. हे रावसाहेब गदाधर, हे कलेक्टरचे चिटणीस आहेत. ते पलीकडे बसलेले पेन्टर आहेत. त्यांचें नांव—

**पूर्णचंद्र**:—नको, नको. ते आपल्या बुकांत गढलेले दिसत आहेत. त्यांना कशाला आपला उपद्रव हवा? शिवाय, इतकीं नांवें माझ्या म्हाताऱ्याच्या लक्षांत एकदम रहावीं कशीं? या आतां जरा बसूं या! (स्वगत) मला माहीतच कीं ही स्वारी इथें भेटायची म्हणून. (बसतात.) तुमच्या कुसुमपुरची हवा फार उष्ण दिसते बुवा! अझून मे महिना कुठल्याकुठें आहे तों इतक्यांत कोण हा उष्मा होत आहे.

**डॉक्टर करुणेश**:—तें कांहीं विचारूं नका! इथलं म्याक्झिममं टेंपरेचर १०८ ते ११० पर्यंत जातं. बाकी ही समुद्रकिनाऱ्याची हवा म्हणजे अशीच. त्यांतल्या त्यांत प्लेगच्या दिवसांमध्यें हा उकाडा नव्हता ही एक गॉडची फेव्हरच म्हणायची! तेव्हां जर प्लेगसारखेच सूर्यनारायणानं डोळे वटारले असते तर झोंपड्यांतून रहाणारीं माणसं माशासारखीं तडफडून मेलीं असतीं.

**पूर्णचंद्र**:—यंदां इथें प्लेगनं फारच प्रलय केला खरा!

**डॉक्टर करुणेश**:—तें कांहीं बोलायची सोय नाहीं. टेरिबल मीं कांहीं केसेस पाहिल्या. एका रात्रींत—अवघ्या सात आठ तासांत फार तर काय घड्याळ लावून अवघ्या तीन तासांत फेट्ल झाल्या पहा! इथें एक पूर्णचंद्र शौर्यसागर (कृष्णकांत लक्ष देतो.) म्हणून गृहस्थ होते. थरो जंटलमन् पहा! एके दिवशीं सकाळीं आपल्या पायानं पांच सहा मैल चालला आणि पिक्यूलिअर मौज अशी कीं, दोन तासांच्या आंत लागला, बेशुद्ध पडला—मेला!

**कृष्णकांतः**—( स्वगत ) पार झाला—गाडून टाकला—कुजला !

**पूर्णचंद्रः**—काय म्हणतां पूर्णचंद्र मृत्यूच्या पाशांत सांपडला ?

**गदाधरः**—असं झालं खरं.

**पूर्णचंद्रः**—त्याचं वय तिशीच्या आंत असेल नाहीं ? बिचाऱ्यावर अकालीं धाड पडली म्हणायची.

**ब्रह्मगिरीः**—मृत्यूपुढें तरुण, वृद्ध, राव, रंक हा भेदभाव मुळींच नाहीं.

**पूर्णचंद्रः**—पूर्णचंद्र आपल्याला सोडून गेले ही गोष्ट फार वाईट झाली. त्यांना भेटण्याचं माझ्या मनांत फार होतं. ( स्वगत ) पहा त्या गाढवानं कसे कान उभारले ते.

**ब्रह्मगिरीः**—आपला आणि त्यांचा परिचय होता वाटतं ?

**पूर्णचंद्रः**—त्यांच्या वडिलांचा व माझा बराच ऋणानुबंध होता !

**बक्षीसाहेबः**—काय म्हणतां ? मग एका बाबतींत आपण आम्हांला मदत करालच !

**पूर्णचंद्रः**—कोणत्या बुवा ?

**बक्षीसाहेबः**—पूर्णचंद्र फार विद्वान्, उदार, आणि मनमिळाऊ होते. तेव्हां त्यांच्याविषयींचा आदर आणि पूज्यबुद्धि व्यक्त करण्याकरितां त्यांच्या नांवाला शोभेल असं त्यांचं स्मारक करावं असा इथल्या कांहीं प्रमुख गृहस्थांचा विचार आहे. इतके दिवस प्लेगमुळें जो तो आपल्याच विवंचनेंत होता. त्यामुळें त्या स्मारकाचं स्मरण कुणाला झालं नाहीं. परंतु आतां स्थीरस्थावर झालेलं आहे. तेव्हां यापुढें तरी स्मारकाचं काम दिरंगाईवर टाकणं चांगलं नाहीं. म्हणून त्यासंबंधानं जारीनं खटपट करण्याचं आम्हीं कांहीं मंडळींनी योजिलं आहे. जाहिरसभा भरवून अगोदर आंकडे किती पडतात हें पहावयाचं आहे. पण अध्यक्ष होण्याला कुणीच तयार नाहींत, याला काय करावं !

**गरुडः**—मला त्याबद्दल यांचीच विनवणी करावीशी वाटते. यांच्यासारख्या गर्भश्रीमंत, वयोवृद्ध आणि अनुभवी गृहस्थांनीं जर अध्यक्षस्थान स्वीकारलं तर लोकांनीं स्मारकाला भराभर आंकडे टाकलेच म्हणून समजा.

**बक्षीसाहेबः**—आंकडे टाकल्याप्रमाणें लोक रोख पैसे टाकतील तेव्हां ना !

**गरुडः**—हो तेंही कांहीं खोटं नाहीं !

**बक्षीसाहेबः**-मग होणार ना आपण स्मारकसभेचे अध्यक्ष ? आपला आणि त्यांचा ऋणानुबंध होता, तेव्हां—.

**पूर्णचंद्रः**—या स्मारकाला मी मोठ्या आनंदानं द्रव्यद्वारां मदत करीन. पण हें अध्यक्ष होण्याचं घोंगडं कशाला माझ्या म्हाताऱ्याच्या गळ्यांत घालतां !

**गरुडः**—तें कांहीं नाहीं. आपण आमची विनंति मान्य केलीच पाहिजे !

**पूर्णचंद्रः**—बरं बघूं. पूर्णचंद्राच्या भेटीचा योग नव्हता. तेव्हां त्याच्या स्मारकाला मदत करूनच समाधान मानून घेतलं पाहिजे. पण तुम्ही त्यांचं स्मारक तरी काय करणार ?

**धरणीधरः**—माझ्या हातीं जर कुणी जमलेला फंड दिला तर मी एक नवीन जिमखाना काढून त्याला 'सागर जिमखाना' असं नांव देईन. त्यांतून सेंचरी काढणाऱ्या प्रत्येक क्रिकेटरला एकेक फक्कड बॅट बक्षीस देईन.

**गरुडः**—चोपणीं बक्षीस द्यायला का पूर्णचंद्र रोजंदारीचे मजूर होते वाटतं ? वारे धरणीधर ! मला वाटतं तुला धरणीधर म्हणण्याऐवजीं चोपणी-धर म्हटलं असतां जास्त शोभेल. ही कल्पना मला साफ पसंत नाहीं.

**धरणीधरः**—बरं बुवा ! आम्ही आपले खेळाडू. या विद्यामृतांत गटंगळ्या खाणाऱ्या प्रोफेसरांचा काय अभिप्राय आहे तो त्यांना विचारा !

**पूर्णचंद्रः**—काय प्रोफेसरसाहेब, आपला काय विचार आहे !

**ब्रह्मगिरीः**—मला वाटतं कीं खूपसे पैसे जमवून पूर्णचंद्रांच्या नांवानं एका मोठ्या पदार्थसंग्रहालयाची स्थापना करावी. व त्याला जोडून एक सुंदरसं उद्भिदुद्यान तयार करावं.

**गोपाळदासः**—हो अलबत्. उदमी ज्ञानाची आपल्या लोकांना फार जरूरी आहे. जो उठतो तो म्याट्रिक्युलेट होतो, आणि चार रुपयांची नोकरी पकडतो. कसलाही नंदी असला तरी व्यापारांत त्याहून अधिक कमाई करील. प्रोफेसर-साहेबांनीं सांगितलं त्याप्रमाणें उदमी ज्ञानाची आम्हांला फार फार नड आहे.

**ब्रह्मगिरीः**—मी उदमी ज्ञान नाहीं म्हणालों शेटसाहेब, उद्भिदुद्यान पाहिजे असं म्हटलं.

**गोपाळदासः**–उद्भिद्‌द्यान ! हें काय ध्यान आहे बुवा !

**ब्रह्मगिरीः**–त्याचा अर्थ बोटॅनिकल गार्डन.

**गोपाळदासः**–हां हां ! बंडगार्डन म्हणतां ! मग आमच्या कुसुमपुरांत बगीच्यांना काय दुष्काळ पडला आहे ? माधवबाग आहे, रमणबाग आहे, चिमणबाग आहे, लालबाग आहे. या चार बागांत मिळून हवी तितकी हवा खावी.

**गदाधरः**–( थट्टेनें ) शेटजींचं म्हणणं अगदीं रास्त आहे. आणि मी म्हणतों स्मारक कसं असावं तर विस्मरणाचं मारक असावं. समजा ! आपण स्मारकासाठीं बगीचा केला, आणि त्यांतलीं झाडं मरून गेलीं, तर काय त्या स्मारकांत अर्थ राहिला ?

**गोपाळदासः**–मी तरी तेंच म्हणतों.

**डॉ० करुणेशः**–आमच्या शेटजींची काय सूचना आहे पहा.

**गोपाळदासः**–मला असं वाटतं कीं, अलीकडच्या चळवळीला धरून एखादा साखरेचा नाहीं तर कांचकामाचा कारखाना काढावा. त्याची सोलएजन्सी वाटेल तर आपण घेऊं; बाकी मीं कांहीं एजन्सीच्या आशेनं ही कल्पना कांढली नाहीं हो !

**गदाधरः**–म्हणतो कोण ? तुमच्या मनांत कां उगीच चांदणं पडलं. पण काय हो शेटजी, दोन गिरण्यांची एजन्सी पुरे नाहीं का झाली ?

**डॉ० करुणेशः**–बरं पण गदाधर, तुमचं कसं काय, स्मारकादाखल देशी कारखाना काढायचा झाला तर काय कॉंट्रिब्यूट कराल ?

**गदाधरः**–हा बुवा जरा नाजूक प्रश्न आहे. तुम्हांला कारखानाच जर काढायचा असला तर त्याला जे आंकडे पडतील त्याच्याभोंवतीं एक आमचं मोठं पूज्य. म्हणजे बाकीचे आंकडे बाहेर गळून जायचे नाहींत. हो, आहे तें सांगतों. जाणूनबुजून खड्ड्यांत उडी कुणीं घालावी ?

**गरुडः**–मग एखादं कारंजं नाहीं तर पुतळा करावा.

**धरणीधरः**–अन्‌ त्याचं तुम्हांला कंत्राट द्यावं. तुमची खुबी मीं जाणली.

**पूर्णचंद्रः**–तें सारं बाजूला राहूं द्या. मी म्हणतों पूर्णचंद्राचं एखादं सुंदरसं ऑइल पेन्टिंग काढून याच क्लबांत ठेवून दिलं तर ?

**डॉ० करुणेशः**–ओ यस्‌, मला हेंच उत्तम दिसतं.

**बक्षीसाहेबः**–अन् आपल्यापाशीं पेन्टरही तसाच उत्तम आहे. अहो कृष्णकांत !

**डॉ० करुणेशः**–यांची इंट्रोडक्शन करून घ्यायला आम्हीं तर किती उत्सुक झालों होतों. अन् तुम्हांला कसं बुवा इतका वेळ राहववलं. ( कृष्णकांत पुढें येतो त्यास ) थोड्या दिवसांपूर्वीं ज्यांच्याविषयीं आंदोलांत वाचलं ते हे चंद्रगुप्त श्रीसागर ( पूर्णचंद्रास ) हे कृष्णकांत पेन्टर. आमचे पूर्णचंद्र आणि हे अगदीं जिवश्च कंठश्च स्नेही होते. ( हस्तांदोलन करितात. )

**पूर्णचंद्रः**–असं कां, बरीच ओळख झाली म्हणायची.

**डॉ० करुणेशः**–यांच्या हातून जसं तें काम हुबेहुब उतरेल तसं दुसऱ्या कोणाच्याच हातून उतरायचं नाहीं. अन् आपल्या जिवलग मित्राचं पेंटिंग म्हणून हे आपल्या क्लबाला फुकट देखील प्रेझेंट करितील.

**कृष्णकांतः**–माफ करा डॉक्टरसाहेब. एवढी शिष्टाई बस करा. आपण एक गरिबांना फुकट औषधं चारीत हिंडतां म्हणून सगळ्यांनीं आपले धंदे फुकटावारी करावे वाटतं ? पूर्णचंद्र माझ्याशीं स्नेह्यासारखा वागत होता. म्हणून मीं त्याचं चित्र तुम्हांला मोफत काढून द्यावं, हा न्याय कुठला ? अन् तेंही तो मेल्यावर ! जेथें प्रत्यक्ष माझ्या धंद्याशीं संबंध आला, तेथें मी मित्रबित्र कांहीं जाणत नाहीं !

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) या मांगालाच मी मित्र समजत होतों.

**धरणीधरः**–याचं नांव व्यवहार—पण या वादाखालीं पूर्णचंद्रांचं स्मारक कोणत्या स्वरूपाचं करायचं त्याचा कांहींच निर्णय झाला नाहीं.

**कृष्णकांतः**–मग टाकाना त्याला अर्धचंद्र देऊन.

**पूर्णचंद्रः**–तुम्हीं तरी एकापेक्षां एक वस्ताद आहां ! तुमची ही कळकळ पाहून पूर्णचंद्राच्या आत्म्याला खास कौतुक वाटत असेल.

**डॉ० करुणेशः**–चार तरुण मंडळी जमली म्हणजे हें असंच चालायचं; आपण केव्हां तरी दोघे चौघे मिळून सीरियसूली बसूं. अन् काय कायं करायचं तें नक्की ठरवून टाकूं. पण आपण प्रेसिडेंट मात्र झालं पाहिजे.

**बक्षीसाहेबः**–तें ठरलंच आहे. बरं चला आतां एखादा सेट खेळूं. आतां घंटा होईल. आपण कांहीं टेनीसबिनीस खेळतां कां नाहीं ?

**पूर्णचंद्रः**–अहो, माझं काय म्हातान्याचं विचारितां ?

**गोपाळदासः**–बरं कांहीं बिझिकबिझीक ?

**पूर्णचंद्रः**–खेळतां येतं. पण पत्त्यांचा कोणताच खेळ मला आवडत नाहीं. ( मानेनं नाहीं म्हणतो. )　( घंटा वाजते. )

**डॉ० करुणेशः**–चला, चला खेळायला, घंटा वाजली. काय सरदार-साहेब आपण खेळ पहायला येतां, का बसतां इथेंच पेपर्सबिपर्स वाचीत ?

**पूर्णचंद्रः**–इथेंच कांहीं पत्रंबित्रं पहात बसतों झालं.

**बक्षीसाहेबः**–बरं तर मग आम्ही जातों. कृष्णकांत, यांना काय लागेल तें आणून द्या बरं का. ( पूर्णचंद्र व कृष्णकांत यांखेरीज सर्व जातात. )

**कृष्णकांतः**–आपल्याला आजचा आंदोल आणून देऊं का ?

**पूर्णचंद्रः**–तुमचा आणून देऊन काय उपयोग ! माझे डोळे आहेत जरासे अधू. तेव्हां आपण जर आजचा अंक वाचला नसेल तर मेहेरबानी करून मला तेवढी तारेची खबर वाचून दाखवा झालं.

**कृष्णकांतः**–त्यांत कसली आली आहे मेहेरबानी ! अहो आज जरा चुर-चुरीत बातमी दिसते आहे.

**पूर्णचंद्रः**–कसली बुवा ! कांहीं खून, आग, आगगाड्यांची टक्कर, दंगा, दरवडा, जलप्रलय, का चोरी, मारामारी, बळजबरी, कां असंच कांहीं तरी !

**कृष्णकांतः**–आतां वाचून दाखवितों म्हणजे झालं. ' उग्रसेनास पकडलं. पोलिसांची चतुराई. वत्सलेचें पतिप्रेम व धाडस. आज बरींच वर्षें लोकांस त्राही त्राही करून सोडणारा, पोलिसच्या हातावर तुरी देऊन अनेक वेळां निसटलेला, प्रसिद्ध दरवडेखोर उग्रसेन यास पोलिसांनीं त्याच्या साथीदारासह मोठ्या शिकस्तीनें व खुबीदार रीतीनें पकडलें आहे. परंतु त्याची बायको वत्सला त्याला सोडविण्याचा प्रयत्न करीत असतांना पोलिसांच्या गोळीला बळी पडली. खटला लवकरच सुरू होईल' ( वर्तमानपत्र चाळतो. )

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) छत्रींतल्या संपत्तीला आतां माझ्याखेरीज कोणी धनी उरला नाहीं ही गोष्ट फार उत्तम झाली. तें ठिकाणही आतां निर्धास्त झालं.

**कृष्णकांतः**–आपण बिडीबिडी ओढितां कीं नाहीं ?

**पूर्णचंद्रः**-काढा कीं. ( विडी पेटवीत असतां ) तुमची ही डबी तर मोठी सुंदर आहे बुवा !

**कृष्णकांतः**-अहो कसली सुंदर आणि कसली काय ?

**पूर्णचंद्रः**-नाहीं, खरोखरच फार सुबक आहे. ही कुठें घेतली हो ? कल्हविली का आयती मिळाली ? आपणही असली एक घेणार. तुम्हीं या डबीला काय दिलं ?

**कृष्णकांतः**-( स्वगत ) तुला काय थेरड्याला त्याची पंचाईत. ( उघड ) मीं ती विकत घेतली नाहीं. ती मूळ शौर्यसागराची. तो प्लेगच्या दवाखान्यांत मेला, तेव्हां ही डबी व दुसऱ्या कांहीं सटरफटर वस्तु स्वयंसेवकांनीं त्याच्या बायकोजवळ आणून दिल्या.

**पूर्णचंद्रः**-अन् तिनं आपल्या नवऱ्याची आठवण म्हणून ही डबी तुम्हांला दिली असंच कीं नाहीं ?

**कृष्णकांतः**-हो.

**पूर्णचंद्रः**-आपल्या नवऱ्याची डबी तुम्हांला देण्याइतकी तिची आणि तुमची दाट ओळख आहे वाटतं ! ती वयानं अगदीं लहान असेल नाहीं ? काय बिचारीवर प्रसंग गुदरला पहा !

**कृष्णकांतः**-अगदीं लहान हो. अन् दिसण्यांत किती सुंदर आहे म्हणून सांगूं ! पूर्णचंद्राचं केवळ नशीब म्हणून असलं रत्न त्याला लाभलं. बाकी--

**पूर्णचंद्रः**-कां बरं ? त्याच्या अंगीं काय न्यून होतं ? लहानपणीं मीं त्याला पाहिलं होतं तेव्हां तोही देखणा आणि हुषार दिसत असे; पुढें देखील तो विद्याव्यासंगी व दानशूर निघाला होता असं मीं ऐकिलं आहे.

**कृष्णकांतः**-कबूल; तो विद्वान् होता, उदार होता, सरळ होता, सगळं खरं; पण जगांत रहायचं म्हणजे इतका फाजील सरळपणा उपयोगी नाहीं. इतक्या सरळ माणसांना मी तर खुळेच समजतों.

**पूर्णचंद्रः**-भले भले कृष्णकांत ! आजकाल सरळपणा म्हणजे खुळेपणा अशीच स्थिति झाली आहे अं ! एकंदरींत तुमच्या व माझ्या मतांत बरंच साम्य आहे. यावरून आपलं बरंच जुळेलसं दिसतं. बरं काय हो ! त्या खुळ्या पूर्णचंद्राला कांहीं मूलबाळ आहे का ?

**कृष्णकांतः**–आहे एक एवढासा शेंबडा पोरगा !

**पूर्णचंद्रः**–पूर्णचंद्र प्लेगच्या इस्पितळांत मेला म्हटलंत नाहीं का? मला त्याच्या मृत्यूची सगळी हकीकत सांगाल काय ?

**कृष्णकांतः**–हकीकत काय ? घरच्या गाडीवाल्याला प्लेग झाला. त्याची व्यवस्था करायला इस्पितळांत गेला. अन् तिथेंच मेला. स्वयंसेवकांनीं गाडून टाकला. ते बिचारे स्वयंसेवकही लगेच त्याच्या पाठोपाठ मेले. सगळ्यांना मिळून स्वर्गांतही प्लेगचं इस्पितळ उघडायचं होतं कीं काय कुणाला ठाऊक ?

**पूर्णचंद्रः**–तुमचा स्वभाव फार गमती दिसतो. आपलं खास सख्य जुळणार. काय म्हणत होतों हो ! पूर्णचंद्र मरायच्या वेळीं तुम्ही व त्याची बायको जवळ असालच ?

**कृष्णकांतः**–छे, छे ! त्यानं कुठें आम्हांला आपल्या मृत्यूची नोटीस दिली होती. बाकी मला जर अगोदर कळतं, तर मी त्याच्याकडे जायला चुकलों नसतों.

**पूर्णचंद्रः**–अन् तुम्हांला प्लेग झाला असता तर ?

**कृष्णकांतः**–लहानपणीं माझी एका ज्योतिषानं पत्रिका केली आहे. त्यांत असं म्हटलं आहे कीं मी कोणत्याही सांथीच्या रोगानं मरणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–मग ?

**कृष्णकांतः**–माझा कांहीं या ज्योतिषावर विश्वास नाहीं. पण मी तुम्हांला एक गंमत सांगतों. त्यानं असं भविष्य वर्तविलं आहे कीं, एका स्त्रीच्यापायीं माझ्या जिवलग मित्राकडून मी मारला जाईन. आजतागायत पूर्णचंद्राशिवाय माझीन् कोणाचीच मैत्री नाहीं. आणि तो तर गेला वर निघून. आतां मला मारण्यासाठीं थोडाच खालीं उतरून येतो आहे !

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) येतो आहे ! आलों आहें. (उघड) तुम्ही त्याच्याविषयीं असं तुच्छतेनं बोलतां, तो सरळ ऊर्फ मूर्ख होता असं म्हणतां तरी पण तुमचं त्याच्यावर प्रेम होतं !

**कृष्णकांतः**–प्रेम ? भलतंच; एवढा जाडा शब्द घालण्यासारखं कांहींच नव्हतं. आतां तो मला आवडत नसे असं नाहीं. माझीं बरींवाईट चित्रं

विकत घेऊन तो मला चांगला आश्रय देत असे. त्यामुळें आश्रिताला आश्रय-दाता जितका आवडायचा तितकाच तोही मला आवडत असे. यापलीकडे कांहीं नाहीं. पुढें पुढें त्याचं लग्न झाल्यावर तर ही स्थिति देखील कायम राहिली नाहीं.

**पूर्णचंद्रः**–कां बरं, त्याची बायको मधें आली वाटतं ?

**कृष्णकांतः**–लग्न झाल्यावर मनुष्य पूर्वींसारखा रहात नाहीं. पण इथेंच असं किती वेळ बसायचं ! आपली हरकत नसेल तर जरा मोकळ्या हवेंत जाऊं चला !

**पूर्णचंद्रः**–त्या मघांच्या मंडळींचा निरोप घेऊन आमच्या बंगल्याकडेच जाऊं झालं.

**कृष्णकांतः**–पुन्हां एकदां धूर सोडायचा आहे? ( विडी पेटवितो. )

**पूर्णचंद्रः**–कांहीं हरकत नाहीं. ( बाहेर येऊन ) तुम्हीं पेंटरचा धंदा करतां का ? आम्हांला एकदां तुमचीं पेंटिंग्ज पहायला केव्हां न्याल ?

**कृष्णकांतः**–केव्हांही. पण माझ्या अंगीं तसा कांहीं गुण नाहीं हो. अन्न नसला तरी मी कुठें त्याची पर्वा करितों आहें ! मी कांहीं पूर्वींसारखा पैशाचा भुकेला नाहीं. खरं म्हणाल तर मी ह्या धंद्याला ४।६ महिन्यांत राम राम ठोकणार आहें.

**पूर्णचंद्रः**–मग काय रामराम म्हणत बसणार वाटतं !

**कृष्णकांतः**–छट् ! जगलों वांचलों तर ती गोष्ट म्हातारपणासाठीं राखून ठेवणार आहें.

**पूर्णचंद्रः**–तर मग काय ? एखाद्या निपुत्रिक म्हाताऱ्या कुबेराला दत्तक जाणार ?

**कृष्णकांतः**–तसं कांहीं नाहीं.

**पूर्णचंद्रः**–तर मग काय एखाद्या श्रीमंत गतभर्तृकेच्या मांडीवर बसणार ?

**कृष्णकांतः**–नाहीं ! तिलाच—

**पूर्णचंद्रः**–आं ! समजलों. एखाद्या पैसेवाल्या बाईशीं लग्न करणार असेंच कीं नाहीं ?

**कृष्णकांतः**–हो. बाईशीं म्हणा, तिच्या पैशाशीं म्हणा. त्याचाच अर्थ तो. पण काय हो सरदारसाहेब, इतका पैसा असून आपण कसे लग्नावांचून राहिलां?

**पूर्णचंद्रः**–माझं बहुतेक आयुष्य परमुलुखांत गेलं. तिकडे मीं जी कांहीं बायकांची वर्तणूक पाहिली, तिच्यामुळें माझ्या मनांत जी कांहीं लग्नाची कल्पना होती, ती पार धुवून गेली आहे; माझी तर अशी समजूत झाली आहे कीं, जगाचा अंत झाला तरी बेहेत्तर, पण कोणत्याही पुरुषानं बायकोच्या नादीं लागूं नये.

**कृष्णकांतः**–आपलं हें भाषण ऐकून मला पूर्णचंद्राची आठवण होते. तो देखील असाच स्त्रीद्वेष्टा होता. पण त्याचं मत त्याला लवकरच बदलावं लागलं.

**पूर्णचंद्रः**–तर मग त्याची बायको खरोखरच सुरेख असली पाहिजे !

**कृष्णकांतः**–खरोखरच सुरेख आहे. आपण पहाल एखादे वेळेस. हो! तिच्या सासऱ्याची आणि आपली ओळख, तेव्हां सध्यां देखील तिच्य समाचारास आपण गेल्यास कांहीं वावगं दिसणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–माझं काय सोळंबलं आहे? तिला भेटण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. आणि जरी असली तरी ती पतिवियोगानं होरपळून गेली असेल. ती थोडीच माझ्यासमोर येणार आहे !

**कृष्णकांतः**–आपली आणि इतरांची गोष्ट सारखीच वाटतं ! आपलं वय आणि आपला पूर्वीचा संबंध, याकडे लक्ष देऊन ती मोठ्या आनंदानं आपल्याला भेटेल. बाकी खरं जर म्हणाल, तर नवऱ्याबद्दल तिला इतकं कांहीं वाईट वाटलेलं नाहीं.

**पूर्णचंद्रः**–नाहीं ?

**कृष्णकांतः**–अहो कां वाटावं ? ती तरुण आहे, सुंदर आहे, हौशी आहे; अशी स्त्री गेलेल्या नवऱ्याबद्दल किती दिवस रडत बसेल !

**पूर्णचंद्रः**–मला कांहीं बोवा बायकोच्या प्रेमाची मीमांसा कळत नाहीं. माझ्या समजुतीप्रमाणें बायकांची योग्यता मांजराच्या पिल्लाहून जास्त नाहीं. त्यांना गोंजारलं म्हणजे जशीं ती हात चाटतात आणि दुखवलं म्हणजे ओरडतात अन् ओरखडतात, तशी ही सगळी स्त्रीजात.

**कृष्णकांतः**–हेच थेट पूर्णचंद्राचे विचार. आपल्याला सांगितलं तर चम-

त्कारिक वाटेल कीं स्त्रियांविषयींच्या विचारांत जसं पूर्णचंद्राचं आणि तुमचं साम्य आहे तसंच त्याच्या आणि तुमच्या अंगलटींत आणि बोलण्याचालण्यांत-ही आहे.

**पूर्णचंद्रः**–खरं कीं काय? आपली मैत्री जुळण्याला हें आणखी एक कारणच झालं म्हणायचं.

**कृष्णकांतः**–आपण पूर्णचंद्रासारखे दिसतां हें जर मीं विलासिनीला सांगितलं—

**पूर्णचंद्रः**–विलासिनी कोण?

**कृष्णकांतः**–त्याची बायको.–तर आपल्याला केव्हां पाहीन असं तिला होऊन जाईल. काढूं ना मी तिच्यापाशीं आपली गोष्ट?

**पूर्णचंद्रः**–हें पहा कृष्णकांत, तुम्ही ज्याअर्थी माझ्याशीं पहिल्याच भेटीला इतक्या मोकळ्या मनानं बोलत आहां, त्याअर्थी विलासिनीच्यासंबंधानं एक काम तुमच्यावर सोंपवितों. पण तुमची आणि तिची लवकर गांठ पडणार नसेल?

**कृष्णकांतः**–छे, छे! मी आतांच तिकडे कांहीं कामाकरितां जाणार आहें. त्यासरसं आपलंही काम करून टाकीन.

**पूर्णचंद्रः**–असं! माझी कांहीं घाई नाहीं; हें पहा, फार वर्षांपूर्वीं माझ्यावर कांहीं प्रसंग गुदरला होता, तेव्हां पूर्णचंद्राच्या वडिलांनीं माझ्यावर अनंत उप-कार केले आहेत. आपल्या हातून झाल्यास त्याची फेड केल्यावांचून राहायचं नाहीं असा मीं तेव्हांच संकल्प केला होता. पण त्याप्रमाणें घडण्यापूर्वींच तो बिचारा गेला. पुढें त्याच्या मुलाला मी परदेशांत मिळविलेले हिऱ्यामाण-कांचे कांहीं दागिने द्यावे, आणि ऋणांतून मुक्त व्हावं असं योजून मी येथें आलों, पण पहातों तों तोही जिवंत नाहीं. तेव्हां माझ्या मनांत असं आलं आहे कीं, हा ऐवज त्याच्या बायकोच्या स्वाधीन करावा. हो! पूर्णचंद्र जि-वंत असता तर तो तिचाच झाला असता नाहीं का? आतां या बाबतींत तुम्हांला तसदी द्यावयाची ती एवढ्याकरितां कीं तुमची हरकत नसेल तर तुम्हीं हे जिन्नस तिच्याकडे नेऊन पोंचते करा.

**कृष्णकांतः**–त्यांत कसली तसदी आली आहे ! उलट ही कामगिरी मी मोठ्या आनंदानं करीन.

**पूर्णचंद्रः**–पण विलासिनी माझ्या जवाहिराचा स्वीकार करील ना ?

**कृष्णकांतः**–भलतीच शंका ! अहो बायकांना, विशेषतः तिला दागिने किती आवडतात याची तुम्हांला कल्पना नाहीं.

**पूर्णचंद्रः**–चला, आज आमच्याच बंगल्यावर जेवणखाण करा, आणि आमच्या गाडींतूनच घरीं जा म्हणजे झालं.

**कृष्णकांतः**–मी कांहीं आपल्या इच्छेबाहेर नाहीं.

**पूर्णचंद्रः**–तुम्हीं येत नाहीं म्हणून तुमच्या घरीं निरोप पाठवूं का ?

**कृष्णकांतः**–आहे कोण घरीं निरोप पाठवावयाला.

**पूर्णचंद्रः**- मग कांहीं हरकत नाहीं. चला ! ( जातात. )

---

# प्रवेश २ रा.

**स्थळः**–कमलेचें घर.

( पद्माकर व कमला बोलत आहेत. )

**पद्माकरः**–कमले, तें पत्र कुठें आहे ?

**कमलाः**–कोणतं पत्र ?

**पद्माकरः**–तें पूर्णचंद्रांचं !

**कमलाः**–काय बाई वेड तरी ! ज्या पत्रावर तारीख, सही, ठिकाण यांचा पत्ता नाहीं, त्याच्यावर विश्वास ठेवून इतके दिवस रोजच्या रोज चोरून त्या बागेंत संध्याकाळच्या खेप्या घालतां तें पुरं नाहीं का झालं ?

**पद्माकरः**–दे ग तें मला; मला आज पुन्हां एकदां तें पाहूं दे.

**कमलाः**-त्याला काय पहातां ? त्याचीं आजपर्यंत किती तरी बरं पारायणं झालीं असतील ! हातांत घेऊन घेऊन तो मेला कागददेखील झिजला आहे. मी सांगूं का त्यांत काय लिहिलं आहे तें ?

**पद्माकरः**-बोल, बोल, तुझ्या अधरामृतांत घोळन घोळून ते शब्द बाहेर येऊं देत म्हणजे ते गोड होतील. बोल. माझी तुला शपथ आहे.

**कमलाः**-तेवढ्यानंच ते खरे होणार असतील तर ऐका. त्यांत लिहिलं होतं कीं, " आज संध्यकाळीं बागेंत येऊन भेट, कांहीं महत्त्वाचं काम आहे. " का; मग जायचं का तिकडे ?

**पद्माकरः**-कमले, रोजच्याप्रमाण आज जाईनच; पण उद्यां ?

**कमलाः**-उद्यां कोण आड येतं आहे ? माझं न ऐकतां रोज जातां तसे उद्यांही जाल.

**पद्माकरः**-नाहीं. मीं आतां अशोकपुरास जाणार. म्हणून म्हणतों माझा नियम आतां अंतरणार. पण त्याचं काय आतां ? मी तिकडे गेल्यावर पत्र-बित्र पाठवीत जा.

**कमलाः**-तुम्ही तर अगदीं जायला निघालां. इथल्याइथें नाहीं का दुसरी नोकरी मिळत ?

**पद्माकरः**-नाहींग. मीं पुष्कळ खटपट केली. पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

**कमलाः**-तुम्ही गेल्यावर मला कसं चैन पडेल ?

**पद्माकरः**-मग काय करूं म्हणतेस ? असाच स्वस्थ बसून राहूं ?

**कमलाः**-मीं तसं कुठे म्हटलं. हो, खरंच. मला बरी आठवण झाली. आजच्या आंदोलांत एक जाहिरात आहे. तुमच्याजोगी नोकरी आहे.

**पद्माकरः**-माझा आंदोल आला का ?

**कमलाः**-तुम्ही अलीकडे वर्तमानपत्रं वाचतां कुठें ? मीं म्हटलं म्हणून तुम्हांला आंदोलाची आठवण तरी झाली.

**पद्माकरः**-कुठाय आंदोल, आण पाहूं. ( ती जाते. ) अहाहा, काय इचं माझ्यावर प्रेम आहे. परमेश्वरानं खरोखर हें रत्नच निर्माण केलं आहे. स्वभाव किती सरळ अन् मन किती कोंवळं आहे ! तसंच घरच्या कामाकाजांत कशी हुषार आहे. नीटनेटकेपणा तिला आवडतो पण ती नटत नाहीं. माझ्याशीं बोलतांना लडिवाळपणा करते, पण सभ्यपणा सोडीत नाहीं. अशी सुंदर स्त्री माझ्यावर अनुरक्त आहे, हें खरोखरच माझ्या भाग्योदयाचं पूर्व चिन्ह आहे. मला असं वाटतं कीं, इची माझ्यावर असलेली निष्ठा परमे-

खेरीला आवडून त्यानं ती जाहिरात तिला दाखविली. मला ने साहाय्य व्हावं अशी माझी इच्छा आहे. तिला अनुरूप असंच या वे ती करीत आहे. अरे, ही पहा आलीच. माझ्या अंगांतील निराशे काढून टाकणारी ही देवताच आहे. ये. कमले, पाहूं काय जा ती! ( कमला त्याच्या हातांत वर्तमानपत्र देते. तो वाचतो. )

# जाहिरात.

## गरजूंनीं अवश्य लक्ष द्यावें.

## अत्युत्तम संधि.

विचित्रपूरचे सरदार, कुसुमपूरचे रहिवाशी श्री. चंद्रगुप्त श्रीसाग २५ वर्षें परदेशांत गेले होते. त्या ठिकाणीं त्यांनीं आपल्या अलौकि अपार संपत्ति मिळविली आहे. ते नुकतेच येथें कायमचे राहावय आहेत. त्यांच्या घरीं नोकरचाकर ठेवावयाचे आहेत. ते येणेंप्र खासगी कारभारी, एक रीडर, दोन आचारी, दोन पाणके, चा चार मोतद्दार, दोन गाडीवाले, सहा गडी, एक मशालजी (श्मश्रूकरित ज्यांची काम करण्याची इच्छा असेल त्यांनीं येत्या वीस तारखेच आपलीं प्रशंसापत्रें घेऊन खालील पत्त्यावर यावें, म्हणजे समक्ष यं पगार ठरवून ताबडतोब काम दिलें जाईल. नोकरी कायमची असू उदार आहेत. तेव्हां गुणी मनुष्यांनीं आपलें कल्याण करून घेण्य वायां जाऊं देऊं नये. मालक स्वतः अविवाहित असल्यामुळें, बाईसाहेबांचा त्रास नाहीं.

**विशेष सूचनाः**—खासगी कारभारी, तरुण, तरतरीत, सु हुषार असावा.

व्यवस्थापक,

सर्वोपयोगी मंडळी.

घर नंबर ८९५ खुलाबाजार—

**कमला**:–या मंडळींचे कोण व्यवस्थापक आहेत तें आहे का माहीत ?

**पद्माकर**:–कोण आहेत ?

**कमला**:–आम्हांला बायकांना काय वरं माहीत ! पण मला वाटतं कीं तो तुमचा कोणी तरी स्नेही असावा. ही विशेष सूचना खास तुम्हालांच उद्देशून लिहिली आहे.

**पद्माकर**:–मायेच्या माणसाला असंच वाटतं.

**कमला**:–मग त्याचा तपास केला पाहिजे.

**पद्माकर**:–अलबत, केलाच पाहिजे. पाहूं या खटपट करून.

**कमला**:–खटपट करतांना माझी आठवण ठेवा म्हणजे यश येईल.

**पद्माकर**:–या प्रयत्नाला खास यश येणार, कारण त्यामुळें दोन प्रेमळ अंतःकरणं अधिक अधिक एके ठिकाणीं बांधिलीं जाणार आहेत. शिवाय आजपर्यंत माझं एकट्याचंच नशीव काम करीत असे. पण त्याचा जोर कमी पडूं लागला म्हणून दुसरं एक जोरदार नशीब त्याच्या मदतीला या वेळीं धांवून आलं आहे. मग कां नाहीं काम होणार ! मी लवकरच बाहेर जाऊन येतों. ( ती हंसते, तो जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**:–रस्ता.

**कृष्णकांत**:–( स्वतःशीं ) मी विलासिनीवर इतकं प्रेम करतों, तिच्याकरितां वाटेल तें करण्यास तयार होतों, पण तिचा हट्ट आहे तसा कायम आहे. मी श्रीमंत नाहीं म्हणून ती माझी लग्नाची बायको होण्याला तयार नाहीं. पण मी तिला चंद्रगुप्तांनीं दिलेले दागिने आणि जडजवाहीर नेऊन दिलं, त तिला माझ्याचमुळें मिळालं आहे. चंद्रगुप्ताला स्त्रियांचा सहवास नसल्यामुळें त्यानं ते जिन्नस इतक्या लौकर खास तिच्याकडे पाठविले नसते. कारण, या वेळीं ती दुःखांत आहे म्हणून या देणगीचा स्वीकार करणार नाहीं अशी त्याला भीति वाटत होती. पण मीं तिचं मन वळविण्याची जेव्हां

स्वतःवर हमी घेतली, त्या वेळीं त्यानं त्या जिनसा माझ्या हवालीं केल्या. (विचार करून) काय, ती माझ्याशीं पुनर्विवाह करणार नाहीं, मला असाच अर्धवट स्थितींत ठेवणार ? मी तिच्या इस्टेटीची व्यवस्था पाहणारा मुनीम एवढ्याच नात्यानं तिच्याजवळ राहूं ? त्या इस्टेटीची राजरोस मालकी मला मिळणार नाहीं ? विलासिनी माझी पत्नी होणार नाहीं ? छे ! छे ! ही स्थिति आतां मला मुळींच आवडत नाहीं. पण मी संपत्ति कोठून आणूं ? तो माझा थेरडा काका इतका चिवट म्हातारा आहे कीं, अजून १०–५ वर्षं खास मरत नाहीं. त्यानं मला आपली इस्टेट देण्याचं कबूल केलं आहे, पण ती मरायच्या वेळीं. तो जर या वेळीं मरेल तर किती बहार होईल ! पूर्णचंद्र तरुण होता म्हणून झटदिशीं मेला. पण हा म्हातारा कांहीं तसा झटदिशीं आटपणार नाहीं. म्हातारीं माणसं या मरणाच्या कामांत मोठीं दक्ष असतात. कांहीं तरी खटपट करून तीं आपलं आयुष्य वाढवीत असतात. मरतां मरत नाहींत. पण या गोष्टीचा विचार आज काय माझ्या उपयोगी ? दुसरी कांहीं तरी तोड काढलीच पाहिजे. (विचार करून) थोड्या दिवसांपूर्वी विलासिनी माझ्यावर रुसली होती. कारण काय तर माझं त्या कमलेवर प्रेम आहे असं तिला मेनकाबाईनीं सांगितलं. स्त्रियांना सवत सहन होत नाहीं हें खरं आहे. (विचार करून) या सवतीमत्सराचा या कामीं कांहीं उपयोग होईल का ? अलबत होईल. बस्स, असंच करायचं. मेनकाबाईनीं आज मला फारच गळ घातली आहे. त्यांची कमला मीं पाहिलेली आहे. पण लग्नाच्या दृष्टीनं तिला पाहण्याकरितां त्यांनीं मला फारच आग्रह केला आहे. ठरलं. हाच बेत. पण ती पोरगी हट्टी आहे. आणि शिकणं झाल्याशिवाय लग्नच करायचं नाहीं असं म्हणते, असं मावशी सांगत होत्या. काय ! या कृष्णकांताचं दर्शन झाल्याबरोबर कोणती उपवर कन्या याच्यावर भाळणार नाहीं ? माझ्या मोहक वाणीनं कोणती स्त्री गुंग होणार नाहीं ? माझ्या डोळ्यांत अशी कांहीं जादू आहे कीं, जगांतील प्रत्येक तरुणी माझ्यावर लुब्ध झालीच पाहिजे. मी कमलेला आपल्या प्रेमाच्या जाळ्यांत पकडतों, म्हणजे मेनकाबाई विलासिनीजवळ माझ्या लग्नाची कहाणी सांगतील. तिचा सवतीमत्सर असा परस्पर जागृत झाल्यानं, माझी अशी खात्री आहे कीं, ती आपलं सर्व ढोंग गुंडाळून ठेवून माझ्याशीं ताबडतोब पुनर्विवाह करायला तयार होईल. खरोखर, हल्लीं तिचं

मन पाण्यापेक्षांही प्रवाही झालं आहे, आणि त्यामुळें साहजिकच त्यांत जास्त चंचलपणा आला आहे. परिस्थितीच्या वातावरणानं त्यांत नानातऱ्हेचे तरंग उठत आहेत. हें परिस्थितीचं वातावरण माझ्या विवाहाच्या बातमीनं दूर होईल, आणि तिचा सवतीमत्सर जागृत होऊन त्याच्यायोगानं तिच्या मनाला उकळ्या फुटतील. अशा स्थितींत जर तिला कोणीं तिऱ्हाइतानं पाहिली तर त्याला असं वाटेल कीं या स्वाभाविक आनंदाच्या उकळ्या आहेत. पण त्या तशा नसून आंतल्या आंत प्रगट झालेल्या संतापाच्या असणार. या कृत्रिम उपायांनीं उत्पन्न झालेली विचारांची वाफ आपण कांहीं वेळ शोषून घेतली पाहिजे. या युक्तीनं तिच्या मनाची चलबिचल एकदम थंड होऊन तें एकदम बर्फाप्रमाणें घट्ट होईल, आणि मग इतर कल्पनांचा त्यांत मुळींच शिरकाव होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर तिच्या मनांत वागत असलेलं माझ्यावरील प्रेम कधींही नाश पावणार नाहीं. अरे, मी विचार करीत करीत या मेनकाबाईच्या घराजवळ आलों ! ( पडदा उघडतो. ) कसें काय मावशीबाई बरं आहे ना ?

**मेनकाबाईः**–या, कृष्णकांत बसा, आज सूर्य पश्चिमेला उगवला.

**कृष्णकांतः**–तुमच्या आग्रहानं त्याला तसं करणं भाग पडलं.

**मेनकाबाईः**–बसा, असे उभे कां ? ( तो बसतो. ) कमले, अग कमले, ए कमले ! ( ओ ऐकूं येते. ) अग ये इकडे ये हो, काम आहे.

**कमलाः**–( येऊन ) काय काम आहे ?

**मेनकाबाईः**–हे कृष्णकांत तुला पहायला आले आहेत.

**कमलाः**–त्यांनीं का मला कधीं पाहिली नाहीं ? आतां नव्यानं काय पहायचं ?

**कृष्णकांतः**–कमले, मी नेहमींच्या दृष्टीनं तुला पाहणार नाहीं. निराळ्याच दृष्टीनं तुला पाहायला आलों आहें.

**कमलाः**–आई, शर्थ झाली बाई ! तुझ्यापुढें मला इतक्यांत लग्न करायचं नाहीं म्हणून मीं तुला किती वेळां तरी सांगितलं असेल. पण तुझी काळजी कांहीं दूर होत नाहीं.

**मेनकाबाईः**–कमले, असं बोलूं नये हो. हे हंसतील तुला.

**कमला**:–तुमची माझी ओळख आहे तेव्हां तुम्ही मला हंसणार नाहीं; मी म्हणतें तुम्हींच आईला दोन शब्द सांगा, म्हणजे ती मला माझ्या मनाप्रमाणें वागूं देईल.

**मेनकाबाई**:–मी आंतून कांहीं फराळाचं घेऊन येतें.

**कृष्णकांत**:–नको, कांहीं नको.

**मेनकाबाई**:–छे, थोडं खाल्लंच पाहिजे, मी आतां घेऊन येतें. ( जाते. )

**कृष्णकांत**:–कमले, मी दुसऱ्या कोणाकरितां तुला पहायला आलों आहें अशी तुझी समजून झालेली दिसते. पण मी स्वतःच लग्न करणार आहें. आणि माझ्या मनांतून तुला—

**कमला**:– अस्सं, अस्सं; समजलं तुम्हीं काय म्हणतां तें. पण मला वाईट वाटतं कीं या कामांत तुम्हीं फार घाई केली.

**कृष्णकांत**:–काय घाई केली ? ती कशी ?

**कमला**:–मला विचारल्याशिवाय माझ्याबद्दल तुम्हीं विचार सुरू केले.

**कृष्णकांत**:–मी तुला आवडत नाहीं ! तूं माझ्यावर प्रेम करणार नाहींस. तुझ्यासारखी सद्गुणी, सुंदर आणि हुषार स्त्री मीं तर अद्याप पाहिली नाहीं. आणि म्हणूनच तुझी गरीबी मनांत आणतां तुझ्याशीं लग्न करण्याचं मीं ठरविलं आहे.

**कमला**:–तुम्हीं केलेलं माझं वर्णन कदाचित् खरं असेल. पण त्याबरोबर माझ्यांत स्पष्ट बोलण्याचा एक मोठा दुर्गुण आहे.

**कृष्णकांत**:–स्पष्ट बोलणं हा कांहीं दुर्गुण नाहीं.

**कमला**:–मग मी स्पष्ट बोलूं का ?

**कृष्णकांत**:–बोल. बोल. तूं जन्मभर माझ्याशीं स्पष्ट बोलावेंस अशी माझी इच्छा आहे. माझी भावि पत्नी खुल्या दिलाची आहे हें पाहून मला आनंदच वाटेल.

**कमला**:–खास वाटणार नाहीं. कारण, एक तर मी तुमची पत्नी होऊं इच्छित नाहीं. इतकंच नव्हे तर तुमच्यावर माझं कोणत्याही तऱ्हेचं प्रेम नाहीं, आणि तुम्हीं मला मुळींच आवडत नाहीं.

**कृष्णकांत**:–कमले, तूं काय बोलतेस याचा विचार केला आहेस ? या कृष्णकांताचा असा अपमान आजपर्यंत कोणींही केला नाहीं.

**कमला**:–पण मी करतें ना. तुमची मला भीति वाटत नाहीं.

**कृष्णकांत**:–तुझ्या आईची इच्छा तुला ठाऊक नाहीं असं वाटतं. मी या वेळीं हरएक प्रकारानं तुझं मन वळविण्याकरितां, फार तर काय तुला ताळ्यावर आणण्याकरितां या ठिकाणीं आलों आहें. मुकाट्यानं माझं म्हणणं कबूल कर म्हणजे तुला वैभवाच्या शिखरावर नेऊन बसवितों.

**कमला**:–अरे जा माकडा ! तूं काय माझं मन वळवितोस, आणि मला ताळ्यावर आणतोस ! तुझ्या पोकळ वैभवावर मी लाथ मारतें.

**कृष्णकांत**:–तोंड आटप. माझा राग फार कठिण आहे.

**कमला**:–( स्वगत ) आईला हांक मारूं का ? पण नको. या वेळीं हा तावडींत सांपडला आहे. याची चांगली शोभा केली पाहिजे. ( उघड ) मी तुमच्या बोलण्याला मुळींच भीक घालीत नाहीं.

**कृष्णकांत**:–(स्वगत) हें प्रकरण जरा भारी आहे. पडतं घेतलं पाहिजे. (उघड) हें पहा सुंदरी, तूं मला प्राणाहून प्यार आहेस. तुझ्याशिवाय मी जिवंत राहणार नाहीं. मी तुला वाईट वाटेल असं बोललों, त्याची क्षमा कर. तुझ्याशिवाय माझे प्राण कसे व्याकुळ होत आहेत.

**कमला**:–ते एकदम नाहींसे झाले तर फार बरं होईल. जगांतील व्यभिचारांची घाण तरी नाहींशी होईल.

**कृष्णकांत**:–काय म्हणतेस ? व्यभिचारांची घाण ! ठीक आहे. हा पहा मी तुझा हात धरतों आणि पहातों तूं कशी वठणीवर येत नाहींस ती ! ( तिचा हात धरावयास पुढें होतो. )

**कमला**:–खबरदार, परस्त्रीच्या वाटे जाशील तर ! एक पाऊल पुढें टाक कीं तुला काय तें सांगतें.

**कृष्णकांत**:–काय, तूं परस्त्री आहेस ? कुमारी नाहींस, तुझं लग्न झालेलं आहे ?

**कमला**:–( स्वगत ) हें चुकलं, सांवरून घेतलं पाहिजे. ( उघड ) तुला काय त्याची पंचाईत ! मुकाट्यानं चालता हो.

**कृष्णकांतः**–फार बेफाम झालीस ! हा पहा तुझा हात धरतों, कर पाहूं काय करतेस तें.

**कमलाः**–(त्याला झिडकारून ) मेल्या, टोणग्या, पशूदिखील विचारी असतात. पण तूं मनुष्य असून निर्लज्ज, अविचारी बनला आहेस. कामांध होऊन एका स्त्रीचा बळी घेतलास तेवढ्यानं तुझी तृप्ति झाली नाहीं वाटतं ! जगांतील सर्वच स्त्रिया तुझ्या मोहजालांत सांपडतील असं समजूं नकोस. अजून पातिव्रत्य शिल्लक आहे. बायका म्हणजे परसांतली भाजी नव्हे कीं वाटेल त्यानं हवी तेव्हां ती खुशाल तोडावी. तुला असं वाटतं कीं जग आंधळं आहे, आणि तुझीं पापकर्मं अगदीं बिनबोभाट चालली आहेत ! अजून तरी सावध हो. आणि मित्रद्रोहाच्या पातकाबद्दल पश्चात्तापानं जळून जा. माझ्यासारख्या गरीब अबलेच्या पाठीस लागून पापांत कां कुजतोस ! तुझ्या शरीरांतून निघणारी दुर्गुणांची दुर्गंधी इतकी विषारी आहे कीं. तुझ्याजवळचे सर्व सद्‌गुण त्यामुळें वठून गेले आहेत. तूं मूर्तिमंत पापाचा पुतळा बनला आहेस. चांडाळा, तुझीं नीच कृत्यं इतकीं अघोर आहेत कीं अघोर कर्मं करणाऱ्या राक्षसांच्या अंगावर दिखील तीं पाहून शहारे येतील.

**कृष्णकांतः**–वा, रागाचा आव तर खूप आणला आहेस. पण तुला ठाऊक नाहीं कीं स्वर्गांतील देवांगनादिखील ज्याच्यावर मोहित होतील अशा एका सुंदर तरुणाला तूं झिडकारते आहेस.

**कमलाः**–स्वर्गांतल्या देवांगना मोहीत होतील, पण पृथ्वीवरच्या होणार नाहींत. तुला पृथ्वीवर एकही स्त्री आपला पति म्हणून कबूल करणार नाहीं. इतकंच नव्हे तर ज्या पापांत तूं पचतो आहेस त्याचाच शेवटचा कडू जहर घोंट तुझ्या घशांत उतरेल; आणि त्यांनच तुला अघोर मृत्यु येईल. हे पतिव्रतेचे शब्द ध्यानांत ठेव. तुला स्वर्गाच्या दारांतूनच नरकांत ढकलून देतील. आणि देवांगना तुझ्यावर मोहित न होतां तुझ्याकडे पाहून हंसतील. फार तर काय पण नरकांतील किड्यांच्या बायकादिखील तुझ्याजवळ येणार नाहींत. त्यादिखील तुझं दर्शन अपवित्र मानतील. जा, चालता हो. येथून आपलं तोंड काळं कर. आई, आई, कायग करते आहेस तूं आंत ? लवकर येग बाई.

**मेनकाबाई**:–काय झालं ? अन् तूं रागावली आहेस कां ? डोळे कशानं लाल झाले ?

**कृष्णकांत**:–मेनकाबाई, मी सध्यां घरीं जातों. पुन्हां येऊन भेटेन.

**मेनकाबाई**:–थांबा, थांबा, ही कारटी तुम्हाला कांहीं बोलली कां ? थांबा—( तो जातो ) पोरी कायग झालं ?

**कमला**:–आई माझं डोकं तापलं आहे, शांत झालं म्हणजे सारं सांगतें.

**मेनकाबाई**:–बरं, बरं सांगहो. ( जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**पूर्णचंद्र**:–( स्वगत ) कोणाचं पाप अधिक भयंकर ? तिचं का त्याचं ? त्याचं ? नाहीं. तिचं. त्यानं आपली कामवासना तिच्या नजरेस आणिली, त्या वेळीं तिनं ती जागच्याजागींच ठेंचली असती तर तो कांहीं तिच्यावर जुलूम करीत नव्हता; पण तोही नीचच आहे. दोघांनाही सारखीच शिक्षा पाहिजे. क्लबांतील भेटीच्या वेळीं माझ्याबद्दल–त्याच्या मृत्यु पावलेल्या जिवलग स्नेह्या-बद्दल–त्याच्या अन्नदात्याबद्दल, त्यानं जर थोडीशी पूज्यबुद्धि दाखविली असती तर मींही त्याजवर दया करून त्याची शिक्षा सौम्य केली असती. पण आतां काय त्याचं. ती शिक्षा अमलांत आणण्याकरितां मी मासे मारणारा कोळी बनलों आहें. तो समुद्रकिनाऱ्यावर ज्याप्रमाणें शांतपणानं आपलं काम करतो त्याप्रमाणें मलाही या संसारसमुद्राच्या किनाऱ्यावर राहूनच माझं काम करावयाचं आहे. स्नेहाचं जाळं मीं भिरकावून तर दिलंच आहे. त्याप्रमाणें गळाला दागिन्याचं अमिष लावून तोही फेंकून ठेवलाच आहे. जाळ्यांत कृष्णकांताला पकडतों आणि गळानं विलासिनीला बाहेर खेंचतों; दोघांनाही कांठावर जिवंत सोडतों म्हणजे पाण्याबाहेर माशांची काय स्थिति होते याची त्यांना चांगली कल्पना येईल. सुडाला प्रारंभ तर झालाच आहे. (विचार करून) मीं कृष्णकांताला त्याच्या घरीं दुपारींच चार वाजतां येईन असं सांगितलं होतं. ( घड्याळ पाहून ) चार वाजायला आलेच. पद्माकर ( पद्माकर येतो. ) तुला कृष्णकांतांचं घर माहीत आहे ?

**पद्माकर**:–आहे सरकार.

**पूर्णचंद्रः**—चल माझ्याबरोबर तेथपर्यंत.

**पद्माकरः**—चालतच जायचं आहे, कां गाडी जोडायला सांगूं ?

**पूर्णचंद्रः**—चालतच गांव पहात पहात जायचं आहे.

**पद्माकरः**—चलावं सरकार. ( छत्री उघडून देतो. )

**पूर्णचंद्रः**—हें शहर फारच रमणीय आहे.

**पद्माकरः**—विशेषतः हा भाग चांगला आहे. हेंच कृष्णकांताचं घर.

**पूर्णचंद्रः**—मी आल्याची वर्दी द्या. हें कार्ड घ्या.

**पद्माकरः** ( कार्ड आंत पाठवतो. ) सरकार, माझं काम झालंना ?

**पूर्णचंद्रः**—चल माझ्याबरोबर आंत. आपण बरोबरच परत जाऊं.

**पद्माकरः**—आपला हुकूम मला शिरसावंद्य आहे, पण मी—

**पूर्णचंद्रः**—पण मी काय ? स्पष्ट बोल.

**पद्माकरः**—माझ्याबद्दल कृष्णकांतांचं मत चांगलें नाहीं. आणि मीही त्यांचा—

**पूर्णचंद्रः**—द्वेष करतों असंच कीं नाहीं ?

**पद्माकरः**—आपलं मन दुखविल्याबद्दल माफी असावी.

**पूर्णचंद्रः**—ठीक आहे. बरोबर ६ वाजतां गाडी पाठवून दे. ( तो जातो. ) काय ! हा पद्माकर देखील कृष्णकांताचा द्वेष करतो ! याचा द्वेष जुना आहे की नवाच आहे ! माझी अशी खात्री आहे कीं, तो फार दिवसांपासूनचा आहे. कृष्णकांताच्या वाईट वर्तनाबद्दल त्याला कांहीं तरी कुणकुण माहीत होती खास. पण माझ्या मनाला दुःख वाटेल म्हणून तो गप्प बसला असावा. त्याची माझ्यावर फार भक्ति आहे. असा एकनिष्ठ माणूस फार दुर्मिळ. इतका सच्चा आणि सरळ नोकर विलासिनीजवळ टिकणं हें कसं शक्य व्हावं !

( कृष्णकांत येतो. )

**कृष्णकांतः**—हें काय हें ? आपण बाहेर काय म्हणून उभे ? मला फार वाईट वाटतं कीं, आपल्याला फार तसदी पडली. आपण एकदम आंत कां नाहीं आलां ?

**पूर्णचंद्रः**—तसं करणं शिष्टाचाराविरुद्ध आहे.

**कृष्णकांतः**—यावं यावं, असं इकडूनच यावं.

**पूर्णचंद्रः**—( स्वगत ) ही वाट माझ्या ओळखीची आहे; पण अनोळखी माणसाप्रमाणें मला चांचपडत चाललं पाहिजे.

**कृष्णकांतः**—या ठिकाणीं चित्रांचा अगदीं गोंधळ उडाला आहे, आपल्याला

दाखविण्याकरितां मी व्यवस्थेनं मांडतोंच आहें. कांहीं कांहीं चित्रं तर अजून तशींच अपुरीं धूळ खात पडलीं आहेत. गेल्या तीन चार महिन्यांत हातांत ब्रश घेतलाय कुणीं ?

**पूर्णचंद्रः**–हीं सर्व चित्रं विक्रीकरितांच ठेवलीं आहेत ना ?

**कृष्णकांतः**–होय. पण तीं कांहीं इतकीं चांगलीं नाहींत.

**पूर्णचंद्रः**–( चित्रें पहात पहात स्वगत ) हा कृष्णकांत किती देखणा आहे. याचा चेहरा अगदीं रेखलेला आहे. तसेच याचे डोळेही पाणीदार आहेत. एखादी आळशी सुखाला लांचावलेली सुंदर तरुणी याच्यावर भाळणारच. ( उघड ) कायहो कृष्णकांत, तुम्ही चितारी तर आहांतच; पण स्वतःच चित्रही आहांत.

**कृष्णकांतः**–कसचं, कसचं, आपण म्हणून माझी स्तुति करतां; पण तें जाऊं द्या. मीं तुमचं काम फत्ते केलं.

**पूर्णचंद्रः**–विलासिनीकडचं ?

**कृष्णकांतः**–तुम्ही अगदीं बरोबर ताडलंत. तें जडजवाहीर पाहून ती आश्चर्यानं थक्कच झाली. त्या रत्नाची चकाकी पाहून तिला जो आनंद झाला त्याचं मला तर वर्णनच करतां येणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–तुम्ही केव्हां काल रात्रीं तिच्याकडे गेला वाटतं ?

**कृष्णकांतः**–हो गेलों होतों सहज १०।१५ मिनिटें. थोडंसं काम होतं. तिला दागिने दिले आणि परत आलों. फार वेळ बसलों नाहीं; पण तिचा तुम्हांला असा निरोप आहे कीं, तुह्मी भेटल्याशिवाय मला हे दागिने स्वीकारणं बरं वाटत नाहीं. ती दुःखी असल्यामुळें जरी नेहमीं कोणाला भेटत नाहीं तरी तुम्ही शौर्यसागरांच्या घराण्याचे फारा दिवसांचे स्नेही म्हणून तुम्हांला भेटण्याला कांहींच हरकत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–हा तिचा चांगुलपणा आहे. इतकं मोह पाडणारं आमंत्रण मला कधींच आलं नव्हतं. पण नाइलाज आहे. मला कांहीं तें स्वीकारतां येत नाहीं, निदान हल्लीं तरी. हें पहा, विलासनीला यत्किंचितही न दुखवितां तिच्या कानाला गोड लागेल अशा मंजुळ आवाजानं गोड गोड बोलून तिला ही हकीकत सांगा. तिचं मन दुखवूं नका हो, तें फार नाजूक झालं असेल.

**कृष्णकांतः**–खरंच कां तुम्ही तिला भेटणार नाहीं ! तिची इच्छा तुम्ही साफ मोडणार !

**पूर्णचंद्रः**–अलबत खास मोडणार, मला कुसुमपुरास पुष्कळ काम आहे तिकडे आधीं पाहिलं पाहिजे. त्यांतून असं पहा, मी पडलों म्हातारा; परदेशीं राहिलेला; मला इकडची चालरीत माहीत नाहीं; शिवाय मी सफईदार खोटं बोलणं अजून शिकलों नाहीं. मला वेळ फावला म्हणजे बायकांशीं कसं वागावं हें मी मुद्दाम शिकेन, आणि मगच विलासिनीला भेटेन, तोंपर्यंत तुम्ही आहांतच तिची समजूत करायला.

**कृष्णकांतः**– ( हंसत हंसत ) तुम्ही फारच विचित्र आहां बुवा; मलातर असं वाटतं कीं तुम्ही बायकांचा द्वेष करतां.

**पूर्णचंद्रः**–द्वेष हा शब्द जरा कडक झाला, मी फक्त त्यांच्याकडे दुर्लक्ष करितों. माझी अशी समजूत आहे कीं, बायको हें एक पुरुषाच्या डोक्यावर ओझंच आहे, तें सुबक बांधलेलं व हलकं दिसतं, पण खरोखर तें भयंकर जड असून चिरडून टाकणारं आहे.

**कृष्णकांतः**–माझं मत तुमच्या उलट आहे. पण तुमच्याशीं मी वाद-विवाद करीत नाहीं. आपण मोठे आहांत, आपल्या मतानं आपलं म्हणणं बरोबर असेल. पण मी इतकंच म्हणतों कीं, मनुष्य जेव्हां तरुण असेल, त्याचं सर्व आयुष्य त्याच्या नजरेसमोर एखाद्या उद्यानाप्रमाणें विस्तारलेलं दिसत असेल, तेव्हां स्त्रियांचं प्रेम आणि हास्य हीं तेथील फुलावर पडलेला सूर्यप्रकाशच आहे असं मला वाटतं. तुमचाही तरुणपणचा असाच अनुभव असेल. तुम्हीही प्रेमाच्या पाशांतून सुटलां नसाल.

**पूर्णचंद्रः**–( हंसत ) तसाही थोडा प्रकार होता, पण ज्या स्त्रीचं माझ्यावर प्रेम होतं, ती महान् साध्वी होती. माझी तिच्याशीं लग्न करण्याची योग्यताच नव्हती. तिच्या सद्गुणांबद्दल जेव्हां माझी पूर्ण खात्री झाली, तेव्हां मीं आपली किंमत ओळखून तिचा नाद सोडला.

**कृष्णकांतः**–( आश्चर्यानें ) स्त्री सद्गुणी आहे म्हणून तिचा नाद सोडणं म्हणजे फारच चमत्कारिक आहे बुवा !

**पूर्णचंद्रः**–चमत्कारिक आहे, अजब आहे; पण मला तेवढं कारण पुरेसं झालं. पण हा विषय नाहीं कां पुरे झाला ! तुमची चित्रं आम्हांला विकत घ्यायचीं आहेत.

**कृष्णकांतः**–माझीं चित्रं कांहीं चांगलीं नाहींत. पण हा एक देखावा पहा, हा सूर्यास्ताच्या वेळचा आहे. हें द्रौपदीवस्त्रहरण, ही कृष्णकदुंकलीला, ही विश्वामित्रमेनका. ( सिगार देतो. )

**पूर्णचंद्रः**–हें पहा; मी कांहीं तीं सारीं पहात बसत नाहीं. तुम्हीं नांवाजलेले कुशल कारागिर आहांत. बस्स आहे, मग तुम्ही तिकडे वारांगनांची बैठक, पऱ्यांचा नाच, काय वाटेल तें काढलेलं असूं द्या; मी या चित्राचे प्रत्येकीं ५० रुपये देतो. बस्स होतील ना ? कां आणखी कांहीं पाहिजेत ?

**कृष्णकांतः**–छे; हेच फार आहेत !

**पूर्णचंद्रः**–हे तर घ्याच; तुमच्या गुणापुढें काय त्यांची किंमत ? ( घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं येतो. ) गाडी थांबल्यासारखी वाटते; आवाज ओळखीचासा वाटतो, खास माझीच गाडी आहे. पण इतक्या लौकर कशाला धाडली !

**कृष्णकांतः**–(साशंक मुद्रेनें) काय तुमची गाडी आहे ! पाहून येतो. (जातो )

**पूर्णचंद्रः**–मात्रा लागूं पडणार ! ही गाडी माझी होती, पण आतां माझी नाहीं. ती आली खास. माझा तर्क आतां यापुढें चुकणं शक्य नाहीं. सुडाच्या मार्गावर हल्लीं इतका उजेड पडला आहे कीं, त्यांतील पुढच्या इत्थंभूत गोष्टी मला स्पष्ट दिसत आहेत. अगदीं शेवटीं थोडासा अंधार आहे, पण तेथपर्यंत पोंचल्यावर तोही भाग स्पष्ट दिसेल. हल्लीं माझ्या स्थितींत केवढं अंतर पडलं आहे ! ज्याला मी माझ्या काळजाचा घड समजत होतों, तोच हा कृष्णकांत नीच, दुष्ट, विषयी, हलकट, असा माझ्या समोर उभा आहे. ज्याच्यावर प्रेम करण्यांत मला मोठा अभिमान वाटत होता, तो माझा दोस्त, काळा कुळकुळीत फत्तर, आपलं घाणेरडं अंतःकरण माझ्यापुढें उघडं करून दाखवीत आहे. हा मनुष्यरूपी पशु, चालता बोलता हाडांचा सांपळा, रुधिर मांसाचा नीटनेटका गोळा, माझ्या ऐहिक सुखांत आपली विषारी चोंच खुपसून त्याचा विध्वंस करणारा काळा कावळा–छे; असं बेहोष होऊन उपयोगी नाहीं. मना, तयार हो; जगांतील उच्छृंखल कामवासना दुःखाच्या बुरख्यांत तुला दिसणार आहे, असत्याची चालती बोलती पुतळी या वेळीं येथें प्रकट होणार आहे. मूर्तिमंत पापाच्या देवीचा या ठिकाणीं अवतार होणार आहे. तिची यथा-

स्थित पूजा करायला तयार हो. असं बावरूं नकोस. आलीच वाटतं! अहाहा! स्वर्गींची अप्सराच आहे. हिचं वैधव्य देखील हिला शोभाच देत आहे. हिचं हें शुभ्र कपाळ, हें गौरवर्ण शरीर आणि पांढरं पातळ पाहून ही नुकतीच चंद्रलोकाहून आली आहे असं वाटतं; केवळ सौंदर्याची खाण आहे. या वेळीं माझे देखील डोळेच दिपले. ( कृष्णकांत व विलासिनी येतात. )

**विलासिनीः**—माझा अंदाज कांहीं चुकणार नाहीं, ही शौर्यसागरांची विलासिनी, आपल्या मामंजींच्या एका जिवलग स्नेह्यांना नमस्कार करते आहे. ( नमस्कार करून दूर होऊन ) असंच ना भाऊजी ?

**पूर्णचंद्रः**—मीच तो हतभागी चंद्रगुप्त श्रीसागर; मी तुला कोणत्या तोंडानं आशीर्वाद देऊं !

**विलासिनीः**—तोंडानं आशीर्वाद देण्यापूर्वीं आपण विनमोल देणगी पाठवून हातानंच आशीर्वाद दिला आहे. तो माझ्या हातांत आल्यापासून आपल्याविषयींची माझी पूज्यबुद्धि मीं केव्हां व्यक्त करून दाखवीन असं मला झालं होतं. तोंडानं दिलेले आशीर्वाद अगदीं पोकळ असतात, पण तसे हातांनीं दिलेले नसतात हो. आपण इथें येणार, हें भाऊजींनीं सांगितलं, तेव्हां मीं आपल्याला इथेंच भेटायचा विचार केला. या अबलेच्या हातून आपले उपकार कसे फिटतील कोण जाणे !

**पूर्णचंद्रः**—यांत माझे उपकार कसले ! तुमचेच माझ्यावर आहेत. मीं पाठविलेल्या क्षुल्लक दागिन्यांचा तूं स्वीकार केलास, याबद्दल मीच तुझा ऋणी आहें. तुझ्यावर असाच प्रसंग आहे कीं, या वेळीं रत्नाचं तेज पाहून तुझ्या अंगाला कांपरं सुटावं. पण तूं शहाणपणानं सर्व दुःख गिळलं आहेस. तुझ्या दुःखांत मीही वांटेकरी आहें असं नेहमीं समजत जा. परमेश्वरालाच ही ताटातूट करणं आवडलं इथें आपण काय करणार ? पूर्णचंद्र हयात असतांना त्याच्याकडून हे दागिने जर तुला मिळाले असते तर किती मौज झाली असती. तुझ्यासारख्या उच्च दर्जाच्या स्त्रीनं माझ्यासारख्या क्षुद्र अनोळखी मनुष्याच्या यःकश्चित् देणगीचा स्वीकार केला हें पाहून मला मोठा अभिमान वाटत आहे.

**कृष्णकांतः**—वहिनींनीं आपल्याला मोठं अचुक गांठलं. आमचं ठरलंच

होतं; कारण तुम्ही त्यांचं आमंत्रण कधीं स्वीकाराल त्याचा कांहीं नेमच नव्हता, म्हणून अशी युक्ति केली. बरं केलं कीं नाहीं ?

**पूर्णचंद्रः**–फारच छान. त्यांतून विलासिनीनं माझी ओळख करून घेण्यांत जी आतुरता दाखविली त्यामुळें तर मला अगदीं दोन बोटं स्वर्ग उरला आहे. वास्तविक या वेळीं दुःखांत ती चूर होऊन एकांतांत अश्रु ढाळीत बसायची.

**विलासिनीः**–( रडत ) गेले हो गेले, ते मला सोडून गेले; कसे हो निष्ठुर झाले ! या वेळीं जर ते असते तर त्यांनीं तुमचा केवढा आदरसत्कार केला असता ! त्यांची पितृभक्ति मोठी विलक्षण होती. आणि तुम्ही त्यांच्या वडलांचे स्नेही, तेव्हां तुमची किती बरदास्त ठेवली असती म्हणून सांगूं ! पण आतां काय त्याचं, ते हा लोक सोडून गेले हें मला खरं सुद्धां वाटत नाहीं. किती जलद आणि भयंकर मरण ! त्यानं माझ्या मनाला जबर जखम केली आहे, ती कांहीं केल्यानं बरी होणार नाहीं. आतां मी काय करूं ? ( रडूं लागते. )

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) अवदसा रडते आहे. डोळ्यांत अश्रूंचं सैन्य कसं जय्यत तयार आहे ! हुकुमाचा अवकाश कीं बाहेर पडलेच. कवाईत— बिवाईत कांहीं लागत नाहीं. कसे शिस्तीनं धांवत आहेत; पण हे नक्राश्रु आहेत. स्वार्थाकरितां आणि पोकळ डौलाकरितां बाहेर आले आहेत. ही खोटी लढाई आहे. यांत खऱ्याचा गंध देखील नाहीं. इची कींव करूं का द्वेष करूं हेंच कळत नाहीं ! ( उघड ) विलासिनी, हें काय हें ? अशी रडतेस काय म्हणून ! तुझ्यासारख्या सुशील तरुणीनं किती वेळ दुःख करायचं ? माझ्या स्वतःबद्दल म्हणशील तर तुझ्या नवऱ्याच्या मृत्यूबद्दल मला अतिशय वाईट वाटतं. पण मी तुला सांगतों कीं तूं कष्टी होऊं नकोस. अशी निराश काय होतेस ? तुझं दुःख खरं आहे, पण तें आतां अगदींच निरुपयोगी आहे. तुझं सर्व अयुष्य अजून जायचं आहे, परमेश्वर तुला सुखाचे दिवस लवकरच दाखवील.

**विलासिनीः**–आपण म्हणतां तें सारं खरं. आहे हो, पण सुखाचे दिवस जवळ आणणं आपल्याच हातीं आहे. आपण माझ्या घरीं येऊन त्यांची सुरुवात कां करीत नाहीं ? मग येणार ना उद्यां ? उद्यां यालना ? यायचं म्हटलं उद्यां घरीं ? अगदीं दुजाभाव धरायचा नाहीं हो ! माझं तें आपलंच घर आहे, मग असं परक्यासारखं काय म्हणून करायचं ? आपल्या-

शिवाय मला मायेचं पांघरूण कोण घालील ? उद्यां खास यायचं ठरलंच हो मग ! असंच ना ? हो असंच तर काय !

**कृष्णकांतः**–आपल्याला स्त्रियांचा सहवास आवडत नाहीं हें वहिनींना ठाऊक नाहीं.

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांत, तुम्ही म्हणतां तें अगदीं खरं आहे. स्त्रियांचा मीं तिटकारा करतों खरा, पण या बोलावण्यापुढें मीं हातच टेंकले.

**विलासिनीः**–आतां कसं बरं बोललांत ! याचा अर्थच असा आहे कीं उद्यां आपण माझ्या घरीं येणार खास. कृष्णकांत भाउजी, यांच्या बरोबर तुम्हीही या हो ! कुणीतरी बरोबर हवं. अगदीं लवकर सकाळीं यायचं हो ! म्हणजे माझा चिमुकला शशी दाखवीन. अगदीं थेट तिकडल्यासारखा आहे ! पण मी बराच वेळ विचारणार होतं–बरी आठवण झाली. आपले डोळे अधू आहेत म्हणून कां ही आरशी लाविली आहे ?

**पूर्णचंद्रः**–विलासिनी, उजेडच सहन होत नाहीं पहा ! पण त्यामुळें कुरकुरून काय होतं ? वयपरत्वें असं होणारच.

**विलासिनीः**–आपण कांहीं वृद्ध दिसत नाहीं. आपल्या चेहेऱ्यावर एक देखील सुरकुती नाहीं !

**पूर्णचंद्रः**–काय वृद्ध नाहीं ? केंस देखील पिकले.

**विलासिनीः**–पुष्कळ तरुण माणसांचे असे पिकतात. पण तुह्मांला हे शुभ्र केंस फारच शोभतात. बरं येतें हो आतां. ( जाते. ते तिला पोंचावतात. )

**पूर्णचंद्रः**–( हंसत ) कायहो विचार कसला करतां, इंद्राच्या दरबारांत नाचणाऱ्या अप्सरांचा ! कोणत्या तिलोत्तमेचं मनन चाललं आहे ? मला वाटतं, तुमच्या मनांतील विचारांच्या वादळाचं वर्णन करायला तुमच्याजवळ शब्दच नाहींत. मला त्यांत कांहींच नवल वाटत नाहीं. ही स्त्री खरोखर अगदीं अप्रतिम आहे बुवा !

**कृष्णकांतः**–मी तुम्हाला सांगत नव्हतों ! अहो, साऱ्या पृथ्वींत असलं रत्न नाहीं. तिला नांव ठेवायला जागाच नाहीं. तुमच्यासारख्या स्त्रीद्वेष्ट्याला देखील तिनं गार करून सोडलं. अहो, तुम्ही देहभान विसरलां होतां; आह्मां कुठें ! मी सांगत नव्हतों ! पण आतां मात्र नुसतं सांगत नाहीं–बजावतों–निक्षून सांगतों.

**पूर्णचंद्रः**–वजावतां, निक्षून सांगतां ! मला ! काय सांगतां तरी काय ? आणि वजावतां तरी काय ? कुणाबद्दल सांगणार ? विलासिनीबद्दल कांहीं नाहीं ना ?

**कृष्णकांतः**–मी तुम्हांला एवढंच तिच्याबद्दल सुचवून ठेवतों कीं, समजा, ती तुमच्याकडे पाहून हंसली, एखादा गोड शब्द बोलली तर त्याचा भलताच अर्थ समजूं नका. तुम्ही नवीन आहांत म्हणून सांगतों कीं, तिच्या गोड भाषणाला भुलून त्यावर भलत्याच कल्पनांची इमारत बांधूं नका.

**पूर्णचंद्रः**–( मोठ्यानें हंसून ) तुमची इषारत अगदीं अस्थानीं आहे. एखाद्या सुंदरीचं मन मी आकर्षण करून घेईन, इतका मी सुंदर दिसतों ? शिवाय माझ्याकडे पहा मी तिचा बाप शोभेन बाप ! तुम्हांला राग येऊं देऊं नका. तमचा देखील बाप शोभेन. पण तिचा प्रियकर छेः, अगदीं असंभवनीय–

**कृष्णकांतः**–पण तुम्ही वृद्ध दिसत नाहीं असं ती म्हणाली ?

**पूर्णचंद्रः**–म्हणाली खरी; पण तें उगीच मला बरं वाटावं म्हणून ! मीं भलताच अर्थ केला नाहीं. कृष्णकांत, तुमच्या रमणीय–रेंखलेल्या शरीराशीं माझ्या कुरूप ओंगळ शरीराची तिनं जेव्हां तुलना केली असेल, तेव्हां तिला काय वाटलं असेल याची मला पूर्ण कल्पना आहे.

**कृष्णकांतः**–(रागानें) काय बोललांत हें! विलासिनी मला माझ्या बहिणीसारखी आहे. तिचा पति मेला आहे, तेव्हां तिची मला काळजी घेतलीच पाहिजे. ती अल्लड आहे म्हणून तिला तिच्या कल्याणाकरितां जपलं पाहिजे. मी काय म्हणतों तें आपल्या लक्षांत आलंच असेल. मी आपल्याशी फाजील सलगीनं बोलतों याची क्षमा करा.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) स्वारी पुन्हां खुलली. आणखी काय मुक्ताफळं बाहेर पडतात तीं पडूं देत.

**कृष्णकांतः**–पण काचहो सरदारसाहेब, अनाचार, अनाचार, म्हणून लोक ओरडतात पण अनाचार म्हणजे काय ? मी म्हणतों कीं मतभेदामुळें हें अनाचाराचं खूळ माजलं आहे. एकाच स्त्रीवर जन्मभर प्रेम करणं हा मोठा सद्गुण समजतात. पण त्यांत काय विशेष आहे ? समजा कीं जर वीस तरुणींच्या वांटणीस येईल इतकं प्रेम एखाद्याजवळ असेल तर त्यानं त्याची वीस

ठिकाणीं वांटणी कां करूं नये ? हा ज्याच्या त्याच्या कर्तबगारीचा प्रश्न आहे. एका ठिकाणींच स्त्रियांनीं प्रेम ठेवावं अशी समाजांत वेडगळ रूढि आहे, पण आपण ती मोडली पाहिजे.

**पूर्णचंद्रः**–जगांत कांहीं थोड्या पतिव्रता असतील.

**कृष्णकांतः**–पण त्यांत त्यांना काय सौख्य आहे ! देवबीव सारं थोतांड आहे. आप मेलं आणि जग बुडालं. आपण जोंपर्यंत जिवंत आहोंत तोंपर्यंत खाना, पीना, और मजा मारना; हाच खरा धर्म आहे. चार्वाक सुद्धां असंच म्हणतो.

**पूर्णचंद्रः**–तुमचाही धर्म हाच आहेना ?

**कृष्णकांतः**–अलबत्; माझाचत्ता काय ? साऱ्या कुसुमपुरांत हाच धर्म आहे. कांहीं जुन्यापुराण्या लोकांत थोड्याशा वेडगळ कल्पना आहेत, पण नवीन सुशिक्षित लोकांना त्यांचा विटाळ देखील नाहीं.

**पूर्णचंद्रः**–पुरे करा बुवा ! माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे. हल्लीं जिकडे तिकडे नास्तिकपणा माजला आहे. अलीकडची सुधारणाच अशी आहे कीं जें कांहीं आपल्या सोईला येत नाहीं, तें सर्व छाटून टाकायचं. सोईला पटतील तेच खरे सद्गुण. कुणीकडून तरी जनापवाद टळला म्हणजे झालं. लोकांची निंदा बंद पाडली म्हणजे मग वाटेल तें करावं. त्याला पूर्ण मुभा !

**कृष्णकांतः**–आपण अगदीं बरोबर बोलतां. बायकांची अब्रूच पहाना किती जलद जाते ! पण एखादी स्त्री जर हुशार असेल तर सारा गांव धुंडाळून पुन्हां पतिव्रता म्हणून मिरवेल. अजागळ आणि भावड्या पोरींचीं कृत्यं तेवढीं बाहेर येतात. मी तर असं म्हणतों, ज्या गांवांत चैनी पुरुष आहेत त्या गांवांत चैनी स्त्रियाही असल्याच पाहिजेत.

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांत, तुम्हीं फार व्यवहारचतुर आहांत. तुमच्या भाषणावरून असं दिसतं कीं बायकांनीं नवऱ्याशिवाय वाटेल त्या दुसऱ्या मनुष्याला आपलं प्रेम अर्पण केलं तर तुम्हांला कांहीं वाईट वाटणार नाहीं.

**कृष्णकांतः**–बिलकुल वाईट वाटणार नाहीं. अहो, तें नेहमींचंच आहे. तो नवरा मात्र सदोदित आपल्या वेडगळपणाचं प्रदर्शन करीत हिंडत असतो. त्याला वाटतं आपल्या नांवाला काळोखी लागली ! पण बिचाऱ्याला एवढी अक्कल नाहीं कीं, निरुपाय म्हणून स्वस्थ बसावं. उगीच बभ्रा करूं नये. चालाः

खरा उपाय म्हणजे आपल्या बायकोचा प्रियकर गांठून त्याच्याशीं तह करणं हाच होय. तहनाम्यावर दोघांना सारख्या अनुकूल अशा शर्ती घालाव्या; आणि बिनबोभाट निम्मी पाती कबूल करावी. यांत सर्वांची सोय होऊन सौख्याला बाध येत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) हें फार झालं, माझ्याच्यानं ऐकवत नाहीं. ( उघड ) हा सूड घेण्याचा अगदीं शिष्टसंमत मार्ग आहे–नाहीं ?

**कृष्णकांतः**–इतकंच नव्हे तर सन्माननीय आहे–राजमान्य आहे. एक-मेकांच्या अंगांतील रक्त काढणं हें निर्दय पशूंनीं करावं; माणसांना शोभत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–काय ? पशूंनीं करावं ! ( स्वगत ) याचे शरीरांतील प्राण खेंचून घेऊन मातीला माती मिळवून टाकतों म्हणजे धरणीचा भार तरी कमी होईल. याच्या वास्तव्यानं ही पहा भूमि कांपते आहे. पण दुभंग होऊन याला गिळून कां टाकीत नाहीं ! माझ्या मनाची चलविचल सुरू झाली. इथून पाय काढला पाहिजे ! नाहींतर भलताच प्रसंग ओढवेल.

**कृष्णकांतः**–आपण असे कांपतां कां ? अशी हुडहुडी कां भरली ? थंडी नाहींना वाजून आली ? आपण अगदीं थकल्यासारखे दिसतां. कांहीं होत तर नाहीं ना ? थोडी व्हिस्की सोडा देऊं का ?

**पूर्णचंद्रः**–कांहीं जरूर नाहीं, पूर्वीच्या आजाराचा शेष उरला आहे. त्यामुळें असं कधींकधीं होतं. काळजी करूं नका. तुम्हीं मला माफ करा. मला आतां गेलंच पाहिजे. मी जातों; चित्र न्यायला गडी पाठवून देईन; म्हणजे तुम्हांला तसदी नको.

**कृष्णकांतः**–तसदी कसची त्यांत; मी—

**पूर्णचंद्रः**–हें पहा, मला माझ्या मनाप्रमाणें वागूं द्या. तुम्ही माझा स्वभाव जाणतां; मी गडी पाठवीन त्याच्याजवळ चित्र द्या म्हणजे झालं. ( जातो. )

**कृष्णकांतः**–ही शिकार जर कायमची हातीं आली तर पैशांची ददात नाहींशी होईल. पण ती विलासिनी याच्याबद्दल काय बरं म्हणाली "तुम्ही म्हातारे दिसत नाहीं " आणि हा म्हातारा दिसत नाहीं खराच. याच्याबद्दल तिच्या मनांत प्रेम उत्पन्न झालं कीं काय ? छे, या थेरड्यावर कांहीं ती भाळायची नाहीं. पण याची

संपत्ति तिला पाहिजे खास; मग पैशासाठीं याच्याशीं ती पुनर्विवाह करील ? छे, हें असं कसं होईल! ती जरी रंभा असली तरी हे शुक्राचार्य आहेत ना. पण एवढं खरं कीं, विलासिनी आणि मी याच्या पैशाला जळवासारखे चिकटणार. याचं बोलणं चालणं, हावभाव, विचार, उंची, आकार, चेहेरा हुबेहूब पूर्णचंद्रासारखा आहे. फक्त केंस तेवढे पांढरे आहेत. डोळे आरशीमुळें ओळखूं येत नाहींत. हा काय प्रकार आहे कांहीं कळत नाहीं. पूर्णचंद्र मेला याबद्दल कांहींच वाद नाहीं. त्याचं उद्यां स्मारक देखील उभं राहील. मला असं वाटतं कीं, हा शौर्यसागरांचा जवळचा नातेवाईक असावा. उद्यां आपण विलासिनीच्या घरीं पूर्णचंद्राच्या वडिलांची तसबीर आहे, त्याच्याशीं याचं स्वरूप बारकाईनं ताडून पाहूं, म्हणजे बराच उलगडा होईल. मीं याला प्रथम पाहिलं तेव्हां मला वाटलं कीं, पूर्णचंद्राचे वडील पिशाच्च होऊन आले आहेत. जाऊंद्या ते विचार, आपल्याला काय करायचं आहे ! कोणी का असेना, द्रव्य देतो आहे, बस्स आहे. मग तो प्रत्यक्ष पूर्णचंद्र जरी जिवंत होऊन आला असला तरी देखील हरकत नाहीं.

( पडदा पडतो. )

अंक तिसरा समाप्त.

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

( पूर्णचंद्र प्रवेश करतो. )

**पूर्णचंद्रः**–पांडवांना वनवासापेक्षां अज्ञातवास अधिक जाचला त्याचं वर्म आज मला कळलं. आपल्या स्त्रीची विटंबना पाहून ज्याप्रमाणें त्यांना वेळ आली नाहीं म्हणून स्वस्थ बसावं लागलं, त्याप्रमाणेंच माझी स्थिति झाली आहे, पण माझी स्थिति त्यांच्याहून भयंकर आहे. माझी बायको आपण होऊन पापाला प्रवृत्त झाली आहे, तिनं आपखुषीनं अधोगतीचा मार्ग स्वीकारला आहे. काय तिचा तो लाघवीपणा ! मला घरीं बोलावण्यांत किती धिटाई ! आपल्या स्वरूपावर केवढा विश्वास ! मोहक भाषणानं दुसऱ्याला गुरफटून टाकण्याची हातोटी तिला चांगली साधली आहे. हा कृष्णकांत तर तिच्या इतका तावडींत सांपडला आहे कीं, ती त्याला कुत्र्यासारखा खेळवीत असेल. माझ्यावर तिनं आपलं मोहनी-अस्त्र सोडायला पहिल्याच भेटीला सुरुवात केली आहे. विलासिनी, तूं गुलाबाचं फूल आहेस. ज्यानं तुझा सुगंध ग्रहण करावा अशी तुझी या वेळीं प्रबल इच्छा आहे तोच त्याचा पूर्णपणें मालक होता. त्याची मूर्ति कायम आहे पण कीर्ति तूं आपल्या निंद्य वर्तनानं कधींच नाहींशी केली आहेस, म्हणून तुला नाहींशी करण्याकरितां दुसऱ्या नांवानं तो तुझ्यापुढें आला आहे. या वेळीं तुझ्या इच्छेप्रमाणें तुझ्या मोहजालांत शिरतों. पण ताबडतोब तें जाळं तोडून टाकून कायमचं निरुपयोगी करून ठेवतों. तूं नाजूक फूल आहेस, पण तुझा वास इतका उग्र आहे कीं, तो जितक्या लवकर नाहींसा होईल तितका फार चांगला. माझी खटपट चालू आहेच. अरे पण हें काय आहे ? ही करंडी कसली ? आणली कोणी ? पद्माकर, ( पद्माकर येतो. ) हें काय आहे ?

**पद्माकरः**–हें पत्र आणि ही करंडी शौर्यसागरांच्या बंगल्यावरून आतांच आलीं आहेत. ( पत्र देतो. )

**पूर्णचंद्रः**–( पत्र वाचतो. ) ( करंडी फोडून फुलें व फळें पाहून ) ही करंडी इथून घेऊन जा. उचल. यांतील फळफळावळीला एकप्रकारची घाण येत आहे, ती मला सहन होत नाहीं.

**पद्माकरः**–साहेब, हीं फळं चांगलीं आहेत. आज आपली प्रकृति खास नादुरुस्त आहे. मी डॉक्टरला बोलावून आणूं का ? आपला चेहरा अगदीं उतरला आहे. मी अधिक बोललों त्याची मला क्षमा करा. तोंडपुजेपणानं बोलत नाहीं. आपली मला काळजी फार वाटते. आणखी आपल्यावर निष्ठा ठेवायला मला दुसरंही एक कारण आहे.

**पूर्णचंद्रः**–पद्माकर, हें तूं काय बडबडतो आहेस ? कसलं कारण आणि कसली निष्ठा. सांग पाहूं काय कारण आहे तें ?

**पद्माकरः**–आपण माझ्या पूर्वीच्या धन्याप्रमाणें मला दिसतां.

**पूर्णचंद्रः**–पण मी तुझा पूर्वीचा धनी नव्हेना ?

**पद्माकरः**–तसं नसतं तर बरं झालं असतं ! आपण माझे नवे धनी खरे पण थेट जुन्या धन्यासारखे दिसतां; फरक एवढाच कीं जुने तरुण होते आणि नवे वृद्ध आहेत.

**पूर्णचंद्रः**–मीच तर पूर्णचंद्र नाहीं ना ?

**पद्माकरः**–महाराज, ते कैलासवासी झाले हें जरी मला खरं वाटत नाहीं तरी ते तुम्ही कसे असाल ! दोघांत मात्र विलक्षण सारखेपणा आहे.

**पूर्णचंद्रः**–जा, करंडीची मीं सांगितल्याप्रमाणें व्यवस्था कर. माझ्या-बद्दल इतकी काळजी तूं करूं नको. ( पद्माकर जातो. ) याला जसा भास होतो तसा त्यांनाही होतो आहे; पण याच्या आणि त्यांच्या वर्तनांत केवढा जमीनअस्मानाचा फरक आहे ! माझी बायको माझ्या बागेंतील फळं मला नजराणा म्हणून पाठविते ! ( हंसतो. ) तिनं फारच लवकर लगट सुरू केली. माझ्यासारख्या एका अनोळखी पुरुषाबद्दल ही इतका आदर आणि इतकी कळकळ कां दाखविते ? केवळ मी श्रीमान् आहें म्हणून. हा सारा लक्ष्मीचा खेळ ! हे सर्व सुवर्णाचे प्रताप ! हें सुवर्ण मान्यांची मानहानि करून त्यांच्या माना वांकवील, गर्विष्ठांचा गर्व उतरून त्यांची बेपर्वाई घालवील, स्वतंत्रतेचा पूर्णपणें आस्वाद घेणारे पुरुष देखील लक्ष्मीच्या साम्राज्यांत गुलाम होतात, मग ज्यांना जात्याच परमेश्वरानं परतंत्र केलं आहे त्या स्त्रियांचा त्या ठिकाणीं

काय पाड ? सुवर्णाकरितां आपल्या सुवर्णाला डाग लावून स्त्रिया आपलं सौंदर्य विकतील. बिंबाधरेचं चुंबन पाहिजे असेल तर त्याला एका माण-कापेक्षां अधिक किंमत पडणार नाहीं. सुवर्णकेतकी रंगाची अंगना जर आलिंगन देण्यास तयार नसेल, तर तिच्या अंगावर सोन्याच्या अलंकारांचं आणखी एक पूट चढवून द्या म्हणजे ती तुम्हांला कायमची चिकटून राहील. हे कांचना, पृथ्वीच्या पोटांत, मातींत, गारगोटींत तूं लोळत पडला होतास ! तुला हिऱ्यांचा, रत्नांचा आणि माणिकांचा सहवास घडावा म्हणून तेथून बाहेर काढलं; तुला स्त्रियांच्या नाजूक शरीरावर वास्तव्य करण्याची पर-वानगी दिली, पण तूं कृतघ्नपणानं त्यांच्याच सद्गुणाला लांछन आणण्यास कारण होतोस, तुला काय म्हणावं ? अतिशय सहवासानं त्यांचे दुर्गुण तुला समजले म्हणून त्यांना पुरत्या अधोगतीला नेतोस, किंवा स्वतः अपवित्र नाहीं असं सिद्ध करण्याकरितां अग्नींत दिव्य करण्याची तुझी अजब कला सतींनीं साध्य केली म्हणून तुला हेवा वाटून तूं हा दावा साधतोस ? पण तुला तरी काय म्हणून दोष द्यावा ? तूं निर्जीव आहेस ? सजीव प्राणी-देखील एकमेकांचा हेवादावा करतात. त्यांतल्यात्यांत ज्याला विचारशक्ति देऊन परमेश्वरानं श्रेष्ठत्व दिलं आहे त्या मानवी प्राण्यांत तर ह्या दुर्गुणांना ऊत आला आहे. सर्व प्राणिमात्रांत मनुष्याला उच्चस्थान कां असावं याचं मला नेहमीं मोठं गूढ पडे, पण माझी अशी खात्री आहे कीं, स्वार्थ आणि धूर्तता हे दोन पंख बुद्धीला लावून कल्पनेच्या जोरानं या श्रेष्ठ पदांवर मनु-ष्यानं उड्डाण केलं आहे. या मनुष्याच्या सहवासाचा मला अगदीं वीट आला, त्यापेक्षां पशूंचा सहवास शतपट बरा. पशु खोटं तरी बोलत नाहींत, मेल्या-नंतर त्यांच्या कातड्याला कांहीं तरी किंमत आहे; पण मनुष्य मेल्यानंतर त्याचं शरीर जर जाळलं नाहीं, तर तें कुजून रोगांची मातृभूमि आणि किड्यांचं वसतिस्थान व्हावयाचं ! मला तर मनुष्यापेक्षां पशुच श्रेष्ठ वाटतो. पण हा विचार या वेळीं करून मला काय करायचं आहे ? आतां मला एकच कर्तव्य उरलं आहे, त्याच्या सिद्धीकरितां मला मन शांत ठेवलं पाहिजे. कोण आहे रे तिकडे. ( पद्माकर येतो. ) जेवणाची तयारी झाली म्हणजे मला हांक मार आणि तोंपर्यंत आजचीं वर्तमानपत्रं आणून दे.

---

# प्रवेश २ रा.

( नलिनी प्रवेश करते. )

**नलिनी**:–' मन चिंती तें वैरीही न चिंती ' असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. माझ्या मनांत नाना तऱ्हेच्या कल्पना येत आहेत. यांच्या डोक्यांत हें हिमालयांत जायचं वेड कुठून शिरलं कोण जाणे ! बायकाचं दर्शन नको म्हणून हे घराबाहेरदिखील पडायचे नाहींत, ते दारांत तरी उभे राहूं लागले आहेत. माझ्याबद्दल त्यांचं प्रेम आतां पुरतं जागं झालं आहे. मग त्यांना सांगूं कां मी कोण आहे तें ! नको ग बाई, पुन्हां जर त्या वेडाची लहर आली, तर इतके दिवस श्रम केलेले फुकट जाऊन पुढें श्रम करायला जागाच राहणार नाहीं. काय विलक्षण हा प्रसंग माझ्यावर आला आहे. कुमुदिनीबाईंना जर मूल झालं असतं तर मी कशाला या घरांत तरी आलें असतें ! बाईंनीं आग्रह करून त्यांना हें लग्न करायला लावलं; आणि मग स्वतःला पोर होण्यासाठीं पिंपळाचे पार झिजवले; देवदेवऋषी केले, अंगारेधुपारे झाले. दाईत दोरे तर इतके गळ्यांत बांधले कीं खरे गळेसर जरी तुटून पडले तरी त्यांतले मणी दोन दोन दिवस खालीं पडत नसत. आणि भलभलत्या लोकांच्या नादीं लागून मां–नकोग बाई त्याची आठवण सुद्धां नको; त्यामुळें माझ्या पुढें भूतकाळचं भूत उभं राहतं. पण एक परी, ही भूतकाळची भुताटकी पुरवली; वर्तमानकाळानं बोकांडीं बसून वरती मान करूं दिली नाहीं तरी चालेल; पण भविष्यकाळानं आ पसरला म्हणजे त्याच्या काळ्या कुट्ट जबड्यांत धीट पुरुषांच्यानंही डोकावून बघवत नाहीं. तिथें माझी काय कथा ! देवा तुझ्या प्रेमाच्या दहीहंडीचा स्फोट–भक्ताचं रहस्य उघड करणारा तो गोपाळकाला—जसा त्यांना गोड लागतो, तसा त्यांच्या प्रेमाच्या दहीहंडीचा स्फोट—माझं रहस्य उघड करणारा आमच्या चरित्राचा काला–परिणामीं मला गोडच लागेलना ! आज काय होईल तें होवो, त्यांना लग्न करा असा आग्रह करूं या; आणि पाहूं त्याचा परिणाम कसा होतो तो. या वेळीं आशा आणि निराशा माझ्या समोर कशी फुगडी खेळत आहे. त्यामुळें मलाही खेळावंसं वाटून, संसाराची झालेली धूळ मीं हातीं घ्यावी, त्यांत प्रेमाचा ओलावा मिसळून मीं त्याची चूल बोळकीं

करावीं, लुटुपुटीची भातुकली खेळावी, आणि अशा या खेळांतील मनानं मांडलेल्या संसारावर आशेची नजर जाऊन तिच्या जादूनं तो मला माझा भविष्यकालांतील रम्य संसार भासावा; पण ताबडतोड आशा पाठमोरी झाल्याबरोबर त्याला निराशेची दृष्ट लागून त्याचे तुकडे तुकडे व्हावे, असा या फुगडीचा भयंकर परिणाम मला भोगावा लागत आहे. बायांनो, थांबवा ही फुगडी. तुमचा खेळ होतो, पण माझा जीव जातो. बाई निराशे, तूं माझ्या नेहमीं जवळ रहाणारी, माझी वैरीण जरी आहेस, तरी तुला सांगतें कीं, ही आशा अमर आहे; ती घेरी येऊन पडली तर कांहीं मरणार नाहीं; पण तुझा मात्र फुकट कपाळमोक्ष होईल. पण असं होतांना आशेचं तोंड कुणी-कडे असेल ! अगबाई ! हें पहा त्यांच्याचकडे आहे. मग काढतें तर ती गोष्ट. ( डॉ० कार्तिकेय प्रवेश करतो. ) ( हंसत ) हें पहा, असं कडकडीत ब्रह्मचर्य व्रत पाळून तुम्ही आपल्या संसाराची माती कां करितां ? तुम्ही श्रीमंत आहां, तरुण आहां, तुम्ही लग्न करा, कशावरून तुमच्या नलिनीसारखी बायको तुम्हांला मिळणार नाहीं ?

**डॉ० कार्तिकेयः**–हें पहा कमलाकर, मी आतां फिरून त्या पाशांत पडूं इच्छित नाहीं. माझा निर्वंश होईल ना ? होऊं दे. इतकंच काय पण माझं अनुकरण करून अविवाहित पुरुषांनीं पृथ्वी गजबजून गेली, जननमर-णाचा कांटा मरणाच्या बाजूकडे जास्त झकन कालांतरानं पृथ्वीच्या पाठीवरून मनुष्यजात नाहींशी झाली तरी बेहेत्तर आहे. विधात्याला जर याची कांहा पर्वा वाटत असेल तर त्यानं याला खुशाल कांहीं उपाय करावा. बस्स. आपण आतां हिमालयांत जाणार आणि त्या ठिकाणीं कांहीं काळ तपश्चर्या करीत बसणार.

**नलिनीः**–हाच जर तुमचा विचार असेल तर मीही येतें तुमच्याबरोबर.

**डॉ० कार्तिकेयः**–नको, नको. तुम्ही नको. माझ्या एकनिष्ठ सेवेबद्दल मी तुम्हाला माझी सर्व इस्टेट बक्षीस देतों. तुम्ही लग्न करा आणि राहिलेला काळ सुखानं घालवा. परमेश्वर तुम्हांलाही सुंदर आणि सद्गुणी स्त्री देईल.

**नलिनीः**–मला तुमची इस्टेट नको, कांहीं नको. तुम्ही इथून निघून गेलांत म्हणजे मीही आपल्या आयुष्याचं सार्थक करण्याकरितां दुसरा कांहीं मार्ग धरीन.

**डॉ० कार्तिकेयः**—बरं तें असो. त्याला अजून अवकाश आहे. मी सध्यां तिकडे जाण्याची पूर्वतयारी करीत आहें. त्यांत एक गोष्टीची कमतरता आहे, तुम्ही जर मदत कराल तर ती गोष्ट अंशतः तरी मिळण्याचा संभव आहे.

**नलिनीः**—बोला, मी वाटेल तें करायला तयार आहें.

**डॉ० कार्तिकेयः**—माझ्या बायकोचा केवळ ती स्त्री म्हणून मीं जीव घेतला, ही गोष्ट अलीकडे, विशेषतः तुम्ही आल्यापासून, माझ्या मनाला खात आहे. ती सद्गुणी होती असं मला हल्लीं फार फार वाटतं. रागाच्या आवेशांत तिला मारून टाकण्याऐवजीं जर मीं तिला घरावाहेर घालवून दिलं असतं, तर बरं झालं असतं.

**नलिनीः**—समजा ती जिवंत असती, तर तुम्हीं तिच्यावर प्रेम केलं असतं ?

**डॉ० कार्तिकेयः**—तुम्हीं तिच्यासारखे दिसतां एवढ्यानंच जर मला केव्हां केव्हां आनंद वाटतो, तर कदाचित् ती जिवंत असती तर मीं तिच्यावर प्रेमही केलं असतं, नाहीं कुणीं म्हणावं ! पण आतां काय त्याचं !

**नलिनीः**—( सुस्कारा टाकून ) मी तुमच्या पत्नीसारखा दिसतों, व त्यामुळें तुमच्या अंतःकरणाला झालेल्या जखमा भरून न येतां जशाच्या तशाच कायम रहातात याचं मला फार फार वाईट वाटतं. पण याला कांहीं माझा इलाज नाहीं. त्या दिवशीं तुमची दागिन्यांची पेटी आंवरतांना सहज मौजेनं तुमच्या बायकोची नथ मीं आपल्या नाकांत अडकविली, त्याबरोबर 'थेट नलिनी' म्हणून केवढ्यांदां ओरडलांत. तसंच परवां तुम्हीं मला तुमच्या बायकोचे गोट, सलकडीं म्हणून घालायला दिलेत आणि मग माझा हात तुमच्या बायकोच्या सारखा दिसतो म्हणून तिची आठवण काढून दुःखी कष्टी झालांत. घ्या हीं आपलीं सलकडीं का गोट काय ते परत. मीं पुन्हां तुमच्या बायकोच्या कोणत्याही जिनसेला हात लावणार नाहीं असा निश्चय केला आहे. पाहिजे असेल तर मी माझ्या सुंदर केसांना रजा देऊन संन्यास घेतों, म्हणजे तितकं आमच्यामधील सादृश्य कमी होईल; आणि माझे मोकळे केंस पाहून तुम्हांला तुमच्या न्हाऊन आलेल्या बायकोची आठवण होणार नाहीं.

**डॉ० कार्तिकेयः**—नका नका. असं बोलूं नका. तुमच्या दर्शनानं मला होणारा आनंद, सखेद जरी आहे, तरी असं बोलून तो नाहींसा करूं नका

इतकंच नव्हे तर हिमालयांत जाण्यापूर्वी तिचा एक फोटो मला पाहिजे आहे. तुम्हीं जर स्त्रीवेष घेऊन तुमचा मला फोटो घेऊं द्याल, तर तो मी आपल्या बायकोचा म्हणून आपल्याजवळ ठेवीन म्हणजे तिची आणि तुमची मला कायमची त्या ठिकाणीं आठवण राहील. तुम्हांला राग येईल म्हणून मी तुम्हाला हें विचारायला कचरत होतों.

**नलिनीः**–हात्तिच्या ! एवढंच का ? यांत मला तर कांहींच अवघड वाटत नाहीं. बोलवा एखाद्या फोटोग्राफरला. पण तुम्ही मात्र संभाळा हो. नाहीं तर बायकोच जिवंत होऊन भेटायला आली आहे असं समजून भलभलतंच बोलूं लागाल, आणि लोकांत मात्र हंशा होईल.

**डॉ० कार्तिकेयः**–छेः ! अजून मी इतका का वेडा राहिलों आहें ?

**नलिनीः**–पण काय हो डॉक्टर, मी स्त्रीवेष घेतल्यानंतर खरंच कां तुमच्या बायकोसारखा दिसेन ? मीं तुमची बायको पाहिली असती तरी बरं झालं असतं. म्हणजे आरशांत पाहतांना माझी तरी खात्री झाली असती. मला वाटतं कीं तुमच्या बायकोला पाहिलेल्या एक दोन माणसांना आपण बोलावूं या; म्हणजे त्यांनाही मौज वाटेल. शिवाय तो प्रसंग असाच आहे कीं, त्या वेळीं खरोखर जर मी तुम्हांला तुमच्या बायकोसारखा दिसलों, तर तुमच्या अंतःकरणाला धक्का बसून तुम्ही बेहोष होण्याचा संभव आहे; तेव्हां तुम्ही तुमच्या एखाद्या डॉक्टर स्नेह्यांना बोलवा. प्रसंगीं त्यांचाही उपयोग होईल. शिवाय ज्यांच्याविषयीं तुमच्या मनांत आदर आहे अशा एखाद्या पोक्त गृहस्थांना जर बोलावणं शक्य असेल तर तेंही वावगं होणार नाहीं. कारण, अशा पोक्त मनुष्यासमोर राग किंवा अनुराग प्रकट होण्याला विचकतात.

**डॉ० कार्तिकेयः**–तुम्हींच हें सुचवितां म्हणून मी तसा प्रयत्न करतों. पण माझ्यांत अजून वेडाची लहर कायम आहे अशी तुम्हांला शंका वाटते एकूण !

**नलिनीः**–छेः छेः ! तसं कांहीं नाहीं. ( जातात ).

---

# प्रवेश ३ रा.

**स्थलः**—विलासिनीचें घर.

( विलासिनी पूजा करीत बसली आहे. जवळ ब्राह्मण उभा आहे असा पडदा उघडतो. )

**विलासिनीः**–( स्वगत ) या पूजेचा मला आतां अगदीं कंटाळा आला आहे. पण त्या चंद्रगुप्तांच्या मनावर माझ्या धर्मनिष्ठेची छाप बसावी म्हणून मी इतका वेळ या तुळशीचें टाळकं धरून बसलें आहें. कोणत्या तरी गोष्टीची मेली संवयच असावी लागते. ( विचार करून ) पण ते अजून कां बरं आले नाहींत ! त्यांचा बेत तर फिरला नसेल ना ! या कृष्णकांतानं कांहीं खो नसेलना घातला ! त्याच्या मत्सरी स्वभावाचा मला अगदीं वीट आला आहे. मीं त्यांना हजारों वेळां बजावून सांगितलं कीं, माझ्याशीं लग्न करण्याच्या भानगडींत पडूं नका. आपलं प्रेम त्यामुळें दृढ न होतां फुकट त्यांत माझा बदलौकिक मात्र होईल. तो अतिशय श्रीमंत असता आणि त्याची माझी ओळख नसती तर गोष्ट निराळी. प्रेमानं तो विचारा वेडा झाला आहे; पण मी तरी काय करूं ? पुनर्विवाह करून राहिलेलं आयुष्य व्यवस्थित संसारांत अब्रूनं घालविण्याची मला चांगली सोन्यासारखी संधि आली आहे. माझ्यासमोर एक अनोळखी, श्रीमंत अविवाहित गृहस्थ दिसत असतांना त्याला टाकून कृष्णकांताशीं लग्न करण्याची कल्पना माझ्या स्वप्नांतदेखील यायची नाहीं. पण प्रिया, कृष्णकांता, तुम्ही मला अतिशय प्रिय आहां. मीं एकच काय पण लौकिकाकरितां कितीही पुनर्विवाह केले तरी तुमच्याशीं वागायची तशीच वागेन हें माहीत असून कां बरं व्यर्थ धडपड चालविली आहे. त्या दिवशीं बिचाऱ्यानं त्या मावशीच्या कार्टीकडून फुकट अपमान करून घेतला. अशानं का मी भिणारी बायको आहें. आज ते इथें आले म्हणजे त्यांना थोडंसं चिडवलंच पाहिजे. त्यांना राग आला म्हणजे मला फार मौज वाटते. पण हें काय हें ! अजून कसं कुणी येत नाहीं !

( एक दासी येते. )

**दासीः**–बाहेर मंडळी आली आहेत.

**विलासिनी**:–( येऊन येण्याविषयीं खूण करते व आपण डोळे मिटून जप करते. कृष्णकांत व पूर्णचंद्र येतात. )

**कृष्णकांत**:–किती साध्वी स्त्री आहे ही.

**पूर्णचंद्र**:–मला वाटतं पतिवियोगापासून इचं चित्त देवाकडे विशेष लागलं असावं.

**कृष्णकांत**:–पूर्वीपासूनच आहे. पतिसेवा आणि पूजाअर्चा यांत यांचा सारा वेळ जात असे. हल्लीं पतिसेवा अंतरली, तेव्हां देवपूजेंतच वेळ घालवितात.

**पूर्णचंद्र**:–वा, फार छान ! देवाची उपासना फक्त खोटं बोलणारांना बाधते. असत्य भाषण करून देवपूजा करणं म्हणजे आपण होऊन नागव्या तलवारीच्या धारेवर जाऊन पडण्यासारखं आहे. ईशसेवा हें सुदर्शन सज्जनांच्या सभोंवतीं त्यांच्या संरक्षणाकरितां आणि सौख्याकरितां सदैव फिरत राहील. पण ज्यांचा सारा जन्म निंद्य वर्तनांत गेला आहे त्यांनीं ऐन संकटाचे वेळीं जर त्याच्या मदतीची अपेक्षा केली तर तें त्यांच्याकडे ढुंकूनदेखील पाहणार नाहीं. इतकंच नव्हे तर त्याच्या कक्षेंत पाऊल टाकणाऱ्या दुर्जनांचा तें निःपात केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं.

**कृष्णकांत**:–असं कां बरं असावं ?

**पूर्णचंद्र**:–तुम्ही तर नास्तिक आहांत. तुम्ही देवालाच ओळखीत नाहीं मग त्याची सेवा दूरच राहिली. पण तुम्हांला सांगून ठेवतों कीं पापी लोकांची पूजाअर्चा म्हणजे निव्वळ ढोंग. त्यांचं ध्यान म्हणजे बकध्यान. अरे, हे पहा, इचा जप संपला. ( विलासिनी डोळे उघडते. )

**विलासिनी**:–हें काय हें ! भाउजी, हे पाहुणे या घरांत परके, पण तुम्ही तर घरचे होतांना. मग खुर्च्या कां बरं नाहीं आणवल्या ? प्रल्हाद जा, कोणाला तरी दोन खुर्च्या घेऊन यायला सांग. आपण केव्हां आलां ? बराच उशीर झाला ? ( हंसते. )

**पूर्णचंद्र**:–तूं ध्यानस्थ बसली होतीस तेव्हां आलों. ( हंसत. ) भेटतो आहे का परमेश्वर तुला ?

**विलासिनी**:–कां नाहीं भेटणार. ( हंसत ) माझ्या घरीं चालत आला आहे, आणि माझ्यासमोर प्रत्यक्ष उभा आहे.

( पूर्णचंद्र व कृष्णकांत एकमेकांकडे पाहतात. )

**कृष्णकांतः**–मला कुठें नाहीं दिसत तो ?

**विलासिनीः**–अहो विष्णु म्हणजे लक्ष्मीपति. हे आपले पाहुणे लक्ष्मी-पति आहेत. मला वाटतं देवानं माझ्याचकरितां हा अकरावा अवतार घेतला आहे. ( हंसते. ) ही सारी थट्टा आहे हो. मीं खरंच लक्ष्मीनारायणाचं ध्यान करीत होतें.

**पूर्णचंद्रः**–योग्य वेळीं तो तुला पावेल. संपलीना पूजा ?

**विलासिनीः**–झालीच म्हणायची. आपण बसायचं होतं. ( पूजा आटपते तीर्थ घेते. ) आपले पाय पुन्हां या घराला लागले हें मला फार बरं वाटलं.

**पूर्णचंद्रः**–माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्याला हें इहलोकचं नंदनवन पुन्हां पहायला मिळालं, हें मी माझं भाग्यच समजतों. या वेळीं माझं पूर्वचरित्र माझ्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभं राहिलं आहे. आणि त्याचा इतका स्पष्ट भास होतो आहे कीं जणूंकाय येथून जाऊन मला दोन तीन महिनेच झाले आहेत.

**कृष्णकांतः**–काय म्हणतां, मोठंच आश्चर्य !

**पूर्णचंद्रः**–खरंच आश्चर्य आहे. वास्तविक गतगोष्टी मनुष्यांनीं नेहमीं विसरून जाणं हेंच नैसर्गिक असून त्यांना हितावह आहे. पण या ठिकाणीं मीं घालविलेल्या रम्य कालाची आठवण इतकी जागृत आहे कीं ती कधींही बुजणार नाहीं.

**विलासिनीः**–आपल्याला येथून गेल्याला किती दिवस झाले.

**पूर्णचंद्रः**–झालीं २०।२२ वर्षं.

**विलासिनीः**–मग आपण त्यांना—

**पूर्णचंद्रः**–पूर्णचंद्राला ना ! पाहिलं होतं. अगदीं लहानपणीं. पण त्या वेळीं देखील तो चांगला हुषार, पाणीदार आणि तरतरीत दिसत असे. त्याच्या बापाचा तो फार लाडका होता. त्याच्या आईशींसुद्धां माझं बोलणंचालणं असे.

**विलासिनीः**–खरंच कां, त्या कशा होत्या ?

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) या भ्रष्ट स्त्रीसमोर माझ्या आईच्या नांवाचा उच्चार करून मीं तें फुकट बाटविलं. ( उघड ) ती फारच सुंदर होती. पण तिला आपण सुंदर आहोंत हें माहीत नसल्यामुळें सौंदर्याचा ताठा तिच्या अंगांत मुळींच नव्हता. या एका वाक्यांत तिचं सारं चरित्र आहे. स्वार्थ बाजूला

ठेऊन सर्वांना सुख देणं हेंच तिचं कर्तव्य असे. तिच्या सभोंवार सद्गुण, सच्छील आणि सद्वर्तन यांचा सुगंध सारखा कायम असे. ती अगदीं तरुण-पणींच वारली.

**कृष्णकांतः**–( स्वगत ) हा गृहस्थ स्त्रियांचा द्वेष करणारा असून पूर्णचंद्राच्या आईची जेव्हां एवढी स्तुति करितो आहे, तेव्हां इथें कांहीं तरी पाणी मुरतं आहे खास. शिवाय याचा चेहरा थेट पूर्णचंद्रासारखा आहे, फार तर काय, पण बोलणं चालणं देखील अगदीं त्याच्यासारखं आहे, या सारखेपणाबद्दल मला आश्चर्य वाटतच होतं. हे राजश्री पूर्णचंद्राचे खासगी वडील दिसतात. ( उघड ) ती मेली तेव्हां किती वर्षांची होती बरं.

**पूर्णचंद्रः**–असेल फार तर २५ वर्षांची.

**कृष्णकांतः**–दैववान् होती, म्हणूनच नवऱ्याचं प्रेम कायम असतानांच ती मरण पावली. नाहीं तर कुणीं सांगावं ?

**पूर्णचंद्रः**–( संताप आवरून ) तुम्ही काय बोलतां ? याला कांहीं अर्थ आहे का ? मीं जिचं आतां वर्णन केलं, ती एक जुन्या चालीची बालबोध घराण्यांतली बायको होती. माझ्या स्त्रीस्वभावाबद्दलच्या कल्पना कदाचित् चुकीच्या असतील. मी आधुनिक समाजाच्या नीतिशास्त्रांत तुमच्या इतका पारंगत नाहीं. हल्लीं नीतीची व्याख्या बदलली आहे म्हणे.

**विलासिनीः**–हें पहा, या यांच्या बोलण्याकडे आपण मुळींच लक्ष देऊं नये. तोंडाला येईल तसं बहकतात. पण खरोखर त्यांच्या मनांत कांहीं नसतं. त्यांना तसं वेडंवाकडं बोलण्याची संवयच लागली आहे. आपण जसे आतां त्रासलां, तसा प्रकार आमच्या घरीं नेहमीं होत असे. पण तिकडची यांच्यावर बहाल मर्जी होती. तें असो. मी माझ्या शशीला आणूं का ? आपणाला मुला-पासून त्रास तर होत नाहीं ना ?

**पूर्णचंद्रः**–छेः, छेः, उलट आनंदच होतो. मुलं प्रेमानं आपल्याकडे पहात असलीं म्हणजे सूर्यप्रकाशांत उमललेल्या टवटवीत गुलाबाच्या फुलाप्रमाणें दिसतात.

**विलासिनीः**–फुले, शशीला घेऊन ये. ( शशीला आणते. ) याचा चेहरा थेट तिकडच्या सारखा आहे. पण हा तुमच्या जवळ राहिला कसा ! परकी

माणसाजवळ दिला कीं रडायला लागतो. याला तिकडचा फार लळा होता. अन् त्यांची मूल घेण्याची तऱ्हा देखील अशीच असे. तरीच बाई राहिला !

**पूर्णचंद्रः**–हा मुलगा फार अशक्त दिसतो.

**विलासिनीः**–जन्मापासूनच असा, त्याची चणच लहान आहे.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) खास या पोराची आबळ होत आहे. यांच्या पशुतुल्य वर्तनांत याची यांना आडकाठी होते. ( उघड ) जा, याला घेऊन जा.

**विलासिनीः**–भाउजी, मी आंत जाऊन येतें. तोंपर्यंत बाहेरच दिवाणखान्यांत बोलत बसा. पुरुषांना नेहमीं लोकांची कुचेष्टा करण्यांत गम्मत वाटते. आणि बायकांच्या देखत त्यांना वाईट साईट बोलतां येत नाहीं. मी ही आलेंच परत. ( जाते. ) ( ते बाहेरच्या बाजूस येतात. )

**पूर्णचंद्रः**–फारच खुप सुरत बायको आहे ! किती हुषार. कृष्णकांत, तुम्ही खरे दैववान् अहांत. तुमची निवड फारच गोड आहे बुवा.

**कृष्णकांतः**–( रागानें ) काय काय म्हणतां; अहो, नीट विचार करून बोला. असं भलतं बोलणं चांगलं नाहीं.

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांत, आतां लाजतां कां ? तुमचं प्रेम कांहीं अस्थानीं नाहीं. शिवाय तें शुद्ध आणि निष्कपट आहे. तिनं तुमचा स्वीकार न करणं म्हणजे निव्वळ वेडेपणा आहे. तुमच्यासारखा पति मिळणं हें मी तर तिचं सुदैव समजतों.

**कृष्णकांतः**–खरंच कां हें ? तुम्हांला देखील वाटतं ना कीं तिच्यावर—

**पूर्णचंद्रः**–बोला प्रीति करितों म्हणून. आणि कां करूं नये ? फार तर काय पण प्रत्यक्ष पूर्णचंद्राला देखील याबद्दल आनंद वाटेल. आपल्या एका जिवलग मित्राबरोबर विलासिनीनं पुनर्विवाह केला आहे; हें पाहून स्वर्गांत त्याच्या आत्म्याला खास शांति मिळेल. तुमच्या प्रेमाला गोड फळं येवोत, अशी मी मनापासून इच्छा करितो. ( कृष्णकांत आनंदानें हसतो. ) ( स्वगत ) हांस, दुर्दैवी प्राण्या हंसून घे. तुझी हंसण्याची हौस पुरवून मग तुला पुरण्याची तयारी करितों. माझ्या भाषणानं याच्या चेहऱ्यावरची संशयाची छटा पार नाहींशी झाली. आतां हा माझ्या पुरा कह्यांत आला. जेवतांना माशी पोटांत जाऊन ज्याप्रमाणें एखादा मनुष्य तें अन्न भराभर बाहेर ओकत

त्याप्रमाणें हा आतां ओकायला लागेल. पण तो ओकतांना त्याचं **डोकं दाबून** धरण्याचेऐवजीं माझंच डोकं मला दाबून धरलं पाहिजे.

**कृष्णकांतः**—सरदार साहेब, मला क्षमा करा. मी आपल्याशीं उद्दामपणानं आणि असभ्यतेनं वागलों याबद्दल मला फारच वाईट वाटत आहे. माझं मन अगदीं बहकून गेलं होतं. पण तुम्हीं तें ताळ्यावर आणलं. तुम्ही मला पाहिजे तर वेडा, मत्सरी म्हणा; पण विलासिनीला पाहून तुमचा स्त्रीद्वेष पार मावळला, आणि मला असं वाटायला लागलं होतं. कीं तुम्ही तिला पटकावणार. या तुमच्या अपराधाबद्दल—

**पूर्णचंद्रः**—बोला बोला आतां मनांत कांहीं ठेऊं नका !

**कृष्णकांतः**—आपण रागावणार नाहींना !

**पूर्णचंद्रः**—छेः हो. असल्या गोष्टीबद्दल कोणी रागावतो का ?

**कृष्णकांतः**—माझ्या मार्गांतला तुमचा कांटा गुपचुप निघण्याकरितां तुम्हांला कोणत्या रीतीनं दूर करावं याचा मी विचार करीत होतों.

**पूर्णचंद्रः**—किती मोकळं मन आहे तुमचं !

**कृष्णकांतः**—मत्सरानं मला अगदीं घेरलं होतं.

**पूर्णचंद्रः**—तरुण प्रणयी जनांचा हा स्वभावच आहे. ते विनाकारण आपल्याला दुःख करून घेतात. मला तुमचं फारच कौतुक वाटतं, पण माझ्यासारखे तुमचे केंस पिकले म्हणजे तरुणीच्या मधुर बोलापेक्षां गिनीचे मधुर बोल तुम्हांला अधिक गोड लागतील. मीं तुम्हांला किती वेळां सांगितलं आहे, कीं स्त्रियांच्याबद्दलचे नाजूक विचार माझ्या मनांतच येत नाहींत.

**कृष्णकांतः**—तर मग मी तुम्हांला माझं हृद्गत सांगतोंच. माझं विलासिनीवर प्रेम आहे. खरंच जर विचाराल तर तिच्याबद्दल मला जें कांहीं वाटतं, त्याचा बोध होण्याला प्रेम हा शब्द अगदीं कुचकामाचा आहे. तिचा हस्तस्पर्श माझं शरीर रोमांकित करितो, जणूं काय तिला खडी ताजीम देण्याकरितां त्यांना कायमचेच हुकूम दिले आहेत. तिचं मिठ्ठास भाषण माझं काळीज हालवून सोडतं. त्यामुळें सर्व अवयवांची शक्ति फक्त कर्णेंद्रियाच्या ठिकाणीं एकवटून जाते. तिचा नेत्रकटाक्ष तर माझ्या मर्मींच लागतो, आणि त्यामुळें घायाळ होऊन मी देहभान विसरतों. इतकेंच नव्हे तर तिच्या चरणीं लीन होऊन तद्रूप होऊन जातों. तिच्याबद्दल मला काय वाटतं,

याची कल्पनाच करतां यावयाची नाहीं. तिच्या हालचालीवर माझी सर्व हालहवाल अवलंबून आहे. ती हवालदील असली कीं मी बेदील होतों. तिचा चेहरा दिलखुष असला कीं मी दिलदार होतों. सारांश माझा आनंद ती, माझं सौख्य ती, माझा उल्हास ती, माझा प्राण ती, माझं सर्वस्व ती आहे. ती, ती, बस्स ती. तिच्याशिवाय हें त्रिभुवन मला—

**पूर्णचंद्रः**–शांत हो, अरे भल्या गृहस्था शांत हो ! ज्या वेळीं असं रक्त तापतं त्या वेळीं डोकं थंड ठेविलं पाहिजे. पण कायहो, तिचं तुमच्यावर प्रेम आहे असं तुम्हांला वाटतं का ?

**कृष्णकांतः**–वाटतं का ? तिचं माझ्यावर– पण जाऊं द्या. मी त्याबद्दल कांहींच बोलूं इच्छित नाहीं. तुम्हांला एवढंच सांगतों कीं—नवऱ्यावर तिचं मुळींच प्रेम नव्हतं.

**पूर्णचंद्रः**–हें मलाही माहीत आहे, अगदीं वरवर पहाणारालासुद्धां ही गोष्ट समजण्यासारखी आहे.

**कृष्णकांतः**–तो पूर्णचंद्र म्हणजे अजागळपणाची गाळीव मूर्ति होती अगदीं बेअकली. असल्या सुंदर तरुणीशीं लग्न करण्यावांचून त्याचं काय खोळंबलं होतं कुणाला ठाऊक !

**पूर्णचंद्रः**–जाऊं द्या, तो मेला, गेला. त्याची निंदा कां करतां ? त्याच्या अंगीं कितीही दोष असले तरी तो जिवंत होता तोंपर्यंत त्याची बायको त्याच्याशीं एकनिष्ठपणानं वागत होतीना ? तो मरेपर्यंत तिनं पातिव्रत्याचें व्रत पाळिलं होतं, असंच कीं नाहीं ?

**कृष्णकांतः**–हो अलबत बरोबर; असं तर खरंच.

**पूर्णचंद्रः**–आणि तुम्ही त्याचे अगदीं विश्वासांतले, आणि जिवलग मित्र होता. त्या वेळीं, त्याच्या बायकोचे डोळे पाहून तुम्हांला बिलकूल मोह पडला नाहीं. तुम्ही तिच्याशीं अगदीं सख्या भावाप्रमाणें वागत होतां ?

**कृष्णकांतः**–हो तसाच वागत होतों.

**पूर्णचंद्रः**–बरं तर मग त्याच्या विधवा स्त्रीवर तुमचं प्रेम जडलं आहे, याला त्याची संमति मिळेल असं मला वाटतं. ती पूर्णपणें शुद्ध आणि निष्कलंक आहे, असं तुम्ही म्हणतां म्हणून मी परमेश्वराजवळ अशी प्रार्थना करितों

कीं अशा निर्मल आणि निष्पाप स्त्रीला तिच्या योग्यतेप्रमाणें चांगलं बक्षीस मिळूं दे. शिवाय मी तुम्हांला आश्वासन देतों कीं, मी तिच्यावर प्रेम करणार नाहीं. पण—

**कृष्णकांतः**–पण काय ?

**पूर्णचंद्रः**–पण ती जर माझ्यावर प्रेम करील, तर मी उलट न करणं म्हणजे जरा गैरच होईल. तिथें माझा नाईलाज आहे. ( हंसतो. )

**कृष्णकांतः**–( आश्चर्यानें ) ती तुमच्यावर प्रेम करील ! थट्टा करितां तुम्ही. ती खास असली गोष्ट करणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–मी तरी तेंच म्हणतों. स्त्रिया पुरुषांच्या नादीं लागल्या असं आजपर्यंत कधींच झालं नाहीं. पण हें निसर्गाच्या उलट आहे. वेल नेहमीं वृक्षांकडे येते. वृक्ष वेलीकडे जात नाहींत. नदी समुद्राकडे जाते. वीज मेघांच्या गळीं पडते, पण पुरुष मात्र स्त्रियांची मनधरणी करितात. कृष्ण-कांत, तुम्हांला या कामांत मुळींच धास्ती नाहीं. तुमच्या प्रेमाचा विजय होणार. अरे पण ही पहा विलासिनी इकडेच येत आहे. ( विलासिनी येते. ) हें कोण ओरडत आहे ?

**विलासिनीः**–हे आमच्या तिकडचे लाडके कुत्तोजीपंत. त्यानं मला अगदीं सळो कीं पळो केलं आहे. मालक गेल्यापासून सारखा रडत असतो. त्याला शशीच्या खोलींतच निजायला पाहिजे. मी अगदीं त्रासून गेलें आहे.

**पूर्णचंद्रः**–कुठें आहे तो कुत्रा ?

**विलासिनीः**–त्याला त्या तिकडे बांधून ठेवलं आहे. कुणाला हात लाऊं देत नाहीं. एका गड्याच्या मात्र संवयीचा आहे. मला आणि भाऊजींना तर समोर उभं राहूं देत नाहीं. लागलाच अंगावर येतो.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) तुम्ही फार गुणी माणसं पडलां. ( उघड ) मला कुत्र्याचं शास्त्र माहीत आहे. तो ओरडणार नाहीं अशी युक्ति करीन. (स्वगत) अहाहा माझा कुत्रा इमानी राहिला, पण माझी बायको आणि मित्र बेइमानी झालीं अं. असो.

**विलासिनीः**–वः मग फार चांगलं होईल. रात्रीं थोडीशी स्वस्थ झोंप तरी मिळेल. बरं पण थोडासा फराळ करायचा होता.

**पूर्णचंद्रः**–नको, नको, माझी प्रकृति आधींच बिघडली आहे. मी आतां घरींच जातों.

**विलासिनीः**–हें घर आपलंच आहे. असं कांहीं एक न घेतां परत जाणें मला बरं वाटत नाहीं. मी तर जेवायलाच रहा म्हणणार होतें. आतां नऊ वाजले आणखी थोड्या वेळांत जेवायचं होईल.

**पूर्णचंद्रः**–हें घर माझं आहे. तरी पण या वेळीं मला इथून गेलंच पाहिजे. मी पुन्हां केव्हां तरी जेवायला येईन. माझ्या मनांत बिलकुल दुजाभाव नाहीं. तूं अशी कष्टी होऊं नकोस.

**विलासिनीः**–मग नाहींच ना माझं ऐकत.

**पूर्णचंद्रः**–नाहीं. माझ्या प्रकृतीची काळजी मला घेतलीच पाहिजे. मी जातों आतां. उगीच ऊन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**विलासिनीः**–आपली मर्जी. ( तो जातो. कृष्णकांत खुर्चीवर बसतो. विलासिनी त्याच्या मागें उभी राहते. पूर्णचंद्र आड लपून उभा राहतो. )

**कृष्णकांतः**–तूं अगदीं निर्दय आहेस. मला असं वाटायला लागलं होतं कीं तूं त्या श्रीमंत वृद्ध सरदारावर खास भाळलीस.

**विलासिनीः**–( हंसत ) खरंच आहे तें. त्यानीं जर ती घाणेरडी आरशी काढून टाकली, तर ते खरोखरच याहून सुंदर दिसतील. त्यानीं दिलेलीं हिरे-माणकें–अहाहा फारच छान. मला तर तीं फारच आवडलीं, आणखी मिळतील तर बरं होईल.

**कृष्णकांतः**–समज त्यांनीं तुला आणखी रत्नं दिलीं, तर तूं त्यांच्या नादीं लागशील ? खास नाहीं. काय वेड बिडतर नाहीं लागलं तुला ? अग, तो किती गर्विष्ठ आहे, याची तुला कल्पना नाहीं. तो म्हणत होता कीं, बायकांनीं आपण होऊन माझ्यावर प्रेम केलं तर मी त्यांच्यावर उलट प्रेम करीन. ' नाहीं तर नाहीं. बोल पुढें काय म्हणतेस तें ?

**विलासिनीः**–( हंसून ) काय म्हणायचं काय ? ते म्हणतात तेंच खरं आहे. इतकंच नव्हे तर त्यांतच प्रेमाची गोडी आहे. पण हा काथ्याकूट करून काय करायचं आहे ? आज गडे जेवयाला इथेंच रहायचं.

**कृष्णकांतः**– मी रहाणारच आहें. आणि तूं त्या म्हाताऱ्याकडे पाहून

गालांतल्या गालांत फार हंसत होतीस म्हणून त्याची खोड मोडणार आहें, तूं अतिशय चंचल मनाची स्त्री आहेस. मला तुझा कांहींच भरंवसा येत नाहीं.

**विलासिनी**:–हं पुरे पुरे. माणसानं मेलं किती बोलावं ? तुम्हांला खास संशयाचं भूत लागलं आहे. म्हणून असे भुताटल्यासारखे बडबडतां. उगीच तोंडाला येईल तें बोलावं याला कांहीं कुणी शहाणपणा म्हणत नाहीं. जळूं दे मेलं तें. पण कायहो, ते वृद्ध गृहस्थ कुणासारखे दिसतात ? मला तर ते थेट तिकडच्या सारखेच वाटतात. त्यांची वागण्याची तऱ्हा अन् बोलण्या–चालण्याची ढब दिखील तिकडच्याप्रमाणें आहे. शशी दिखील त्यांच्याजवळ गेल्यावर रडला नाहीं !

**कृष्णकांत**:–तूं म्हणतेस तसा मलाही एक दोनदां भास झाला. त्या दोघांत अप्रिय वाटणारं सादृश्य आहे, हें खरं; पण त्यांत कांहीं मोठं नवल नाहीं. पुष्कळ लोक असे सारखे दिसतात. एकाला झांकून दुसऱ्याला बाहेर काढावं. पण मला तर वाटतं, कीं तो पूर्णचंद्राचा दूरचा नातेवाईक असावा. चुलत काका म्हणा किंवा चुलत चुलत काका म्हणा. तें जाऊं दे; पण एवढं खरं, कीं तो म्हातारा चांगला गृहस्थ आहे असं मला वाटतं. त्याच्याजवळ कुबेरासारखी संपत्ति आहे. आपल्याला कोणीतरी वडील मनुष्य पाहिजेच होतं. तो हा अनायासं चालून आला आहे. मी त्याच्याशीं चांगली दोस्ती जमवितों. चला आतां फार भूक लागली.

**विलासिनी**:–मग जेवायचं झालंच आहे.

**कृष्णकांत**:–पण एक गोड पाहिजे आधीं. त्याशिवाय जेवण गोड लागणार नाहीं.

**विलासिनी**:–तुम्हांला गोडाचा वींट कसा येत नाहीं कुणाला ठाऊक ! चला आधीं जेवा मग गोड घांसाला गोड आहेच. ( स्वगत ) पण यांच्या मत्सरी स्वभावामुळें या प्रेमाचा शेवट गोड होणार नाहीं, अशी मला भीति वाटते. चलायचंना घरांत. ( त्याचा हात धरून त्याला घेऊन जाते. )

**पूर्णचंद्र**:–या दोघांनींहि मला ओळखलं नाहीं हें ठीक झालं. आतां माझं पुढील कार्य निर्विघ्नपणें पार पडणार.

---

# प्रवेश ४ था.

स्थळः—मेनकेचें घर.

( मेनका व कमला येतात. )

**मेनकाः**—पोरी, त्या दिवशीं जसा आगजाळेपणा केलास तसा आज करूं नको हो.

**कमलाः**—आई, मला तूं लहान तोंडीं मोठा घांस घेतेस असं म्हणशील, पण तुला खरंच सांगतें, तुला गडे माणसाची पारख नाहीं.

**मेनकाः**—समजलं, तुझीं सारीं बोलणीं माझ्या ध्यानांत येतात. पण हें स्थळ मला फार प्रयासानं सांपडलं आहे. मी कांहीं तें हातचं सोडायची नाहीं. अग तूं एवढी मोठी घोडी झालीस, चांगलीं बुकं पोथ्या वाचतेस, तुला श्रीमंतीची किंमत कळूं नये, मोठं नवल आहे बाई ! जा नथ घालून तें जरीकांठीं लुगडं नेसून ये. तुला दाखवायला घेऊन जायचं आहे. ( कमला जाते. ) काय करावं बाई, या पोरीनं मला तर अगदीं दमवलं. तिच्या डोक्यांत काय हें भिकारडं वेड शिरलं आहे. त्या चंद्रगुप्तांच्या घरीं रोज लग्नाच्या मुलींच्या झुंडीच्याझुंडी येतात, पण अद्याप मुलगीच पसंत होत नाहीं. ते म्हातारे आहेत पण कसे सुटसुटीत आहेत. लक्ष्मी तर त्यांच्या घरीं पाणी भरीत आहे. घरांत दुसरं माणूस कोणी नाहीं. तेव्हां राजाराणीशीं गांठ. कसं छान स्थळ आहे. पण या पोरीच्या कपाळीं येईल तेव्हांना. काय बाई तें म्हणे फार बोलतच नाहींत, मग त्यांच्या मनांत काय असेल तें असो. मी गेलें होतें तेव्हां केव्हांतरी मुलगी दाखवा असं ते म्हणाले. आज दिवस चांगला आहे. पण पद्माकर कसा अजून येत नाहीं ! त्याचं तिथें कसं नामी जुळलं आहे. जेऊन खाऊन पगार अगदीं खिशांत पडतो. तो तिकडे रहावयाला गेला, हें मला फार बरं वाटलं. नाहीं तर तो अगदीं घरजांवई होण्याच्या बेतांत आला होता.

( पद्माकर येतो. )

**पद्माकरः**—कां मावशी कसला विचार चालला आहे. जांवई शोधून काढतां वाटतें !

**मेनकाबाईः**—अरे शोधून काढला आहे पण हातीं येईल तेव्हांना ?

**पद्माकरः**—काय म्हणतां शोधून काढला आहे. मग आतां नडलं आहे कुठें ?

**मेनकाबाई**:-त्यांना मुलगी दाखवायची आहे.

**पद्माकर**:- ( हंसत ) मग मी नेऊं का दाखवायला? किती लांब जायचं आहे, आणि वेळ किती लागेल? कारण माझ्यामागें कामं फार आहेत. आमचे यजमान वृद्ध दिसतात, पण असे तापट आहेत कीं, माझ्यासारख्या तरुणाची दिखील ते काम करतां करतां तिरपिट उडवितात.

**मेनकाबाई**:-अरे त्यांनाच कमलेला दाखवायची आहे हो, पण दाखवयाला न्यावी कशी, कोणत्या वेळीं, म्हणून तर तुला बोलावलं आहे.

**पद्माकर**:-( आश्चर्यानें ) मावशीबाई, हें कां स्थळ शोधून काढलं आहे असं असं!

**मेनकाबाई**:-तुझ्या नाहींच तें मनास येणार, कारण—

**पद्माकर**:-कारण काय माझं कमलेवर प्रेम आहे असं तुम्हांला वाटतं हेंच कीं नाहीं?

**मेनकाबाई**:-मला तसा चांगला संशय आहे.

**पद्माकर**:-संशयचना? मग असूं दे.

**मेनकाबाई**:-तूं जर हें काम केलंस तर माझा संशय दूर होईल. तूं फक्त तिला नेऊन त्यांना दाखीव. मी मग पुढल्या पुढें बाकीचं सारं करीन

**पद्माकर**:-मावशी, या कामीं तुम्हाला यश यायचं नाहीं. मग उगीच कां बरं खटपट करतां?

**मेनकाबाई**:-( रागानें ) तुला हें काम करायचं असेल तर हो म्हण. तुला मीं तुझे आईबाप मेल्यापासून आपल्याजवळ ठेऊन घेतलं. इतके दिवस माझ्या घरीं घरच्यासारखा राहिलास. त्याची फेड करायची वेळ आली असतांना भलत्याच कल्पना मनांत आणून माघार घेतोस! तूं माझ्या चुलत आते-बहिणीच्या मामेजावेचा पुतण्या. कायरे तुझा माझा संबंध!

**पद्माकर**:-अशा रागावूं नका. पण ज्या ठिकाणीं मोठमोठ्यांची डाळ शिजली नाहीं, तिथें कमलाबाईची शिजेल असं तुम्हांला कसं वाटतं? त्यांच्या-पुढें कसं वागायचं, त्यांच्या प्रश्नाला कशीं उत्तरं द्यायचीं, यांच्यासारख्या तालमी करून तयार झालेल्या मुलींची त्यांच्यासमोर त्रेधा उडते, हें आम्ही आपल्या डोळ्यांनीं पहातों आहों. त्यांतून तुम्हाला बरं वाटत असेल तर तुम्हीं

केलेल्या उपकारांची फेड म्हणून तुमच्या मुलीला श्रीमंत नवरा मिळवून देण्याकरितां, मी तिला घेऊन जातों. शिवाय असं केल्यानं तुमचा संशय दूर होईल. हो, एक पंथ दो काज. अरे ही पहा कमलाबाईच इकडे येत आहे.

( कमला येते. )

**मेनका**:–आतां कसं बरं बोललास. कमले, पद्माकर नेईल तिकडे त्याच्याबरोबर जा हो. त्याला मीं सारं सांगून ठेवलं आहे. ( पद्माकराला खोंचून नेऊन ) तुझे यजमान जर कृष्णकांतासारखा जर कांहीं प्रकार करूं लागले तर जवळपास ऐसहो. ( उघड ) जा. बाळे, या वेळीं तुझं दैव उद्याला येवो, आणि तुझ्या गुणाला आणि स्वरूपाला योग्य असा तुला श्रीमंत नवरा मिळो. ( जातात. )

**स्थळ**:–रस्ता–(पद्माकर व कमला बोलत येतात.)

**कमला**:–पण हें तुम्ही कबूल कां केलं ?

**पद्माकर**:–माझी खात्री आहे कीं माझे धनी कांहीं वृद्ध–तरुणी विवाहाला आपण स्वतः उदाहरण घालून उत्तेजन देणार नाहींत.

**कमला**:–मग आईला त्यानीं मुलगी दाखवायला कां सांगितलं ?

**पद्माकर**:– ते कुणाचेंच मन दुखवीत नाहींत.

**कमला**:–या कामीं आपली खात्री आहेना. नाहींतर उपकाराची फेड राहील बाजूला; आणि अपकाराची जोड मात्र मिळेल. फट् म्हणतां ब्रह्महत्या व्हावयाची.

**पद्माकर**:–माझी खात्री आहे. तूं मुकाट्यानं चलना माझ्याबरोबर. या वेळीं तुझ्या म्हातारीचा संशय चांगलाच दूर करतों. तिच्या मनाप्रमाणें तुला दाखवायला आणल्यामुळें, तिला असं खास वाटेल कीं, मीं तुझा नाद सोडला. मला तुझ्याकडे आतां उजळ माथ्यानं उघड यायला कांहीं हरकत नाहीं. चोरून भेटीचा मला आतां अगदीं वीट आला आहे, म्हणून राजरोस माग होण्याकरितां या संधीचा मीं फायदा घेतला आहे.

**कमला**:–बरंच कारस्थान आहे.

**पद्माकर**:–चल, हें आमचं घर आलंच. माझ्या खोलींत नेऊन तुला बसवतों आणि तूं आल्याची वर्दी यजमानांना देऊन येतों.

---

# प्रवेश ५ वा.

**स्थळः**–डॉ० कार्तिकेय यांचें घर.

( कृष्णकांत व पूर्णचंद्र एका बाजूनें प्रवेश करतात व डॉ० कार्तिकेय आणि नलिनी दुसऱ्या बाजूनें येतात. )

**कृष्णकांतः**–माझी पक्की खात्री आहे कीं ही त्याची बायकोच आहे म्हणून. त्या मेनकाबाई म्हणत होत्या कीं डॉ० कार्तिकेयची बायको कांहीं समुद्रांत बुडून मेली नाहीं; ती तशीच किनाऱ्याला लागली. ती तिच्या मुलीची मैत्रीण आहे.

**पूर्णचंद्रः**–आणि तो पद्माकरसुद्धां असंच कांहीं म्हणत होता. म्हणून तर ही मौज पहायला मीं डॉक्टर कार्तिकेयांची चिठ्ठी आली, तेव्हां यायचं ठरवून ठेवलं होतं.

**कृष्णकांतः**–या डॉक्टरच्या स्नेहाबद्दल मला संशय येतच होता. वास्तविक, मीं धंदा सोडून दिला आहे. पण असं एखादं विचित्र काम आलं म्हणजे दोन पैसे मिळून थोडी गंमत होते. ( कॅमेरा लावतो. )

**डॉ० कार्तिकेयः**–( नलिनीस उद्देशून ) या हो ! नुसता फोटो काढायला येऊन बसायचं, त्याला देखील दोन माणसांसमोर स्त्रीवेष घेऊन यायला लाजतां, आणि म्हणे नाटकांत माझा जन्म गेला. हें कुणाला खरं तरी वाटेल का ?

**नलिनीः**–( आंतून ) नका मला आग्रह करूं. तुमच्या शहारांतला दुसरा कोणताही फोटो काढणारा आला असता तरी मला त्याचं कांहीं वाटलं नसतं ; परंतु या गृहस्थांच्यासमोर मी नाहीं येणार.

**डॉ० कार्तिकेयः**–( कृष्णकांतास ) ए कृष्णकांत, कायरे, आमच्या या मित्राची व तुझी ओळख आहे वाटतं ?

**कृष्णकांतः**–त्यांचं चरित्र मला माहीत आहे.

**डॉ० कार्तिकेयः**–या हो ! असे बाहेर या. या गृहस्थांना तुमची माहिती आहेच. यांच्याशीं दोन शब्द बोला. तुम्हीं बायकोचं सोंग घेतलं म्हणून कांहीं बायको होत नाहीं. ( नलिनीला हात धरून बाहेर आणतो. )

**कृष्णकांतः**–संशय नकोच.

**डॉ० कार्तिकेयः**–काय ? संशय कसचा ? ( नलिनीस ) या हो, बसा, या खुर्चीवर बसा.

**नलिनीः**–नाहीं. ठीक आहे. मला नाहीं फोटो काढून घ्यायचा.

**डॉ० कार्तिकेयः**–पण कारण काय ? यांना तर तुमची सर्व माहिती असं हे म्हणतात.

**नलिनीः**–मलाही त्यांची सर्व माहिती आहे म्हणून.

**डॉ० कार्तिकेयः**–अस्सं काय ? कायरे यांच्या कंपनींत पडदे रंगवायला जाऊन कांहीं गुण उधळलेले दिसतात. त्याशिवाय हे आमचे मित्र एवढे रागवायचे नाहींत.

**कृष्णकांतः**–ए डॉक्टर, तूं खरोखर वेडा आहेस. अरे, हा स्त्रीवेषधारी पुरुष नसून ही स्त्री आहे, आणि तुझी बायको नलिनी आहे. हें तुला ओळखूं नये ? मोठं आश्चर्य आहे.

**डॉ० कार्तिकेयः**–फसलास रे फसलास ! या सारखेपणानं खासाच भ्रांतिकृत चमत्कार केला म्हणायचा.

**कृष्णकांतः**–हा भ्रांतिकृत चमत्कार नसून खरा मतिविकार आहे, आणि तुझ्यासारख्या डॉक्टरला झाला आहे. आम्हांला वाटलं होतं कीं, तूं निवळलास. पण अद्याप तुझा मेंदू कांहीं साफ झाला नाहीं. सृष्टीचं, विशेषतः मनुष्याचं सूक्ष्म निरीक्षण करणं हें आपल्या दोघांच्याही धंद्यांतलं मुख्य तत्त्व असून, तूं केवळ सोंगानं फसलास तेव्हां तुला काय म्हणावं ! मी तुला सांगतों, अरे हा पुरुष नसून ही स्त्री आहे, आणि म्हणून स्त्रियांच्या अंगीं दबा धरून बसलेलं लज्जेचं पिशाच्च पुरुषांच्या दर्शनाबरोबर इच्या अंगांत संचारलं आहे. बायकांच्या हालचाली जाणण्यांत तुझ्यापेक्षां मी अधिक दर्दी आहें. आडदांडपणानं स्त्रीजातीचं रहस्य कळत नाहीं.

(डॉ० कार्तिकेय कावराबावरा होतो, नलिनी व कृष्णकांत यांच्याकडे पाहतो.)

**नलिनीः**–आपण कां विनाकारण त्रास करून घेतां ? यांना जाऊं द्या. मी तुम्हांला सर्व हकीकत सांगेन.

**डॉ० कार्तिकेयः**–नाहीं, नाहीं. यांच्या देखत या गोष्टीचा उलगडा

झालाच पाहिजे. सरदारसाहेब, क्षमा करा. आपल्याला या भानगडींपासून त्रास होईल, पण हें प्रकरण काय आहे हें समजण्याकरितां आपणही मला या वेळीं मदत करावी.

**पूर्णचंद्रः**–आहे, मी लक्ष्यपूर्वक सर्व ऐकत आहें. मी मोठ्या आनंदानं तुम्हांला मदत करीन.

**डॉ० कार्तिकेयः**–काय, कृष्णकांत, ही स्त्री आहे आणि माझी बायको असून तुम्ही एकमेकांचीं चरित्रं जाणतां ! ( नलिनीकडे पाहून ) मग, मीं दिलेली जलसमाधीची शिक्षा न भोगतां कुलटे, ( दचकून ) छेः नाहीं, या कृष्णकांताच्या बोलण्यावर नाहीं माझा विश्वास बसत. जा, तुम्ही घरांत जा; त्या अवदसेचा भास उत्पन्न करणारा हा स्त्रीवेष जाळून खाक करा; आपण आपला नेहमींचा पुरुषाचा पोषाख घालून या, तोंपर्यंत मी सर्व खुलासा करून घेतों. ( तोंड फिरवून ) बोल कृष्णकांत, बायकोच्या निंद्य वर्तनानं प्रज्वलित केलेल्या स्त्रीद्वेषाच्या प्रखर अग्नींत माझ्या प्रेमाचा तरु पार वठून गेला होता. त्याला या माझ्या स्नेह्यांनीं पुनः नवीन पालवी आणली. ती खुडून टाकायला तुजजवळ काय आधार आहे ? माझ्या अंतःकरणांतील आटून गेलेला प्रेमाचा झरा पुनः वाहूं लागल्यावरोबर त्याला परमेश्वरचरणीं अर्पण करून, स्त्रीहत्येचं पातक त्या तीर्थांत धुवून टाकण्याकरितां मी हिमालयांत जाण्याची तयारी करीत होतों, अशा वेळीं माझ्या मित्रावर भलतेच आरोप करून माझा आशाभंग करायला तुझ्याजवळ काय पुरावा आहे ? ( मागें पाहून ) अरे अजून तुम्ही इथेंच. जा, जा. तो वेष पालटून या. ( कृष्णकांतास ) कां बोलत कां नाहींस ?

**कृष्णकांतः**–अरे डॉक्टर, ही स्त्री आहे यांत संशय नाहीं. इचं चरित्र मला ठाऊक आहे, याचं कारण, ही आमच्या गांवची म्हणून. इच्या बापानं इला प्रथम मला देऊं केली होती. पण इच्या आईनं मी सुशिक्षित नाहीं, म्हणून लग्न मोडलं. नंतर तुझ्याशीं इचं लग्न झालं; नंतरची हकीकत तुला माहीतच आहे.

**पूर्णचंद्रः**–डॉक्टरसाहेब, हे म्हणतात हें खरं आहे. कारण हीच हकीकत मला माझ्या खासगी कारभाऱ्यानं सांगितली. ही तुमची स्त्री असून ही महान् साध्वी आहे असं तो म्हणत होता. आणि म्हणूनच तिच्या दर्शनाकरितां, मी तुमच्यासारखाच स्त्रीद्वेष्टा असूनही, या ठिकाणीं नुसती चिठ्ठी

पाठविल्याबरोबर आलों आहे. ( डॉक्टर आश्चर्यचकित होतो व इकडे तिकडे पहातो. ) या कृष्णकान्तांना ती ओळखते हा कांहीं तिचा अपराध नाहीं. मुली, ये अशी पुढें ये. आणि या कृष्णकान्तांना तूं कशी ओळखतेस याची सर्व हकीकत सांगून आपल्या नवऱ्याचा संशय दूर कर. ( डॉक्टर तिच्याकडे पाहतो व ती येऊन त्याचे पाय धरते. )

**नलिनीः**–महाराज ! मला अभय द्या ! हे म्हणतात त्याप्रमाणें खरोखरच मी या चरणांची दासी आहें.

**डॉ० कार्तिकेयः**–हेंच जर खरं असेल तर सोड माझे पाय आणि अशी दूर उभी रहा; आणि या कृष्णकान्तांची व तुझी ओळख आहे, आणि त्यांच्या समोर यायला तूं कां भ्यालीस याचा खुलासा करून माझा संशय दूर कर.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) शाबास, डॉक्टर शाबास. या नीचाची आणि तुझ्या बायकोची ओळख आहे एवढं देखील तुझ्या संशयाला कारण बस्स आहे अं ! ( उघड ) बोल, मुली बोल, तुझ्या मनांत काय असेल तें स्पष्ट बोल.

**नलिनीः**–यांची माझी ओळख नाहीं. पण मी यांना ओळखतें. यांचं चरित्र मला माहीत आहे, पण त्याचा माझ्या चरित्राशीं फार दूरचा संबंध आहे. चार मंडळींत माझ्यासारख्या स्त्रीनं त्याचा उच्चार दिखील करणं ही शरमेची गोष्ट आहे. यांना जाऊं द्या. मी इकडची खात्री करून देईन.

**डॉ० कार्तिकेयः**–नाहीं.. यांच्या समोर यायला तूं कां भ्यालीस त्याचा यांच्यासमोरच खुलासा झाला पाहिजे. त्याशिवाय माझं मन शांत होणार नाहीं.

**नलिनीः**–मी यांच्यापुढें यायला भ्यालें याचं कारण हें मला ओळखतील म्हणून. मला इतक्यांतच आपल्याला ओळखं द्यायची नव्हती.

**डॉ० कार्तिकेयः**–नाहीं नाहीं ! हा प्रकार आज नाहीं उद्यां उघडकीस आलाच असता. एवढ्यानं माझं समाधान होणार नाहीं. याला आणखी कांहीं तरी कारण आहे. बोल काय भानगड आहे. या कृष्णकांताला मीही चांगलाच ओळखतों. अशा लपंडावानं मी फसणार नाहीं.

**नलिनीः**–मग सांगूंच खरं कारण ? त्याचे परिणाम सोसायला आपण तयार आहांत ना ?

**डॉ० कार्तिकेयः**–हो हो ! तयार आहें.

26116 5

**नलिनी**:–ऐकावं तर मग.—हा कृष्णकांत इतका हलकट आणि पाजी मनुष्य आहे कीं, त्याची दृष्टि आपणांवर कधींही पडूं द्यायची नाहीं असा मीं व माझी मैत्रीण कमला हिनं निश्चय केला आहे. हा सार्‍या स्त्रीजातीचा अपराधी आहे. आपल्या जिवलग स्नेह्याचा केंसानं गळा कापून आपल्या बाहुपाशांत त्याच्या स्त्रीला गुरफटवणारा हा नराधम पशु आहे असं आम्ही समजतों. हा आपलं काळं तोंड त्या काळ्या फडक्यांत झांकून घेऊन तद्रूप अंतःकरणानं माझ्याकडे बघत आहे असं माहीत असतांना त्याच्याकडे टक लावून पाहणं माझ्याच्यानं होणार नाहीं. पूर्णचंद्र शौर्यसागर लवकरच हा लोक सोडून गेले हें एका अर्थी बरंच झालं. नाहींतर या कसाबाच्या करणीचा यत्किंचितही सुगावा लागल्याबरोबर तुमच्याप्रमाणेंच त्यांचा मेंदू जळून त्यांना वेड लागलं असतं. ते जिवंत असतांना मत्सरानं भरलेल्या या कामांधाची पापवासना उतूं जाऊन हळूहळू जगाच्या पुढें नाचूं लागली होती; ती ते मेल्याबरोबर जननिंदेच्या भीतीनं दुःखाच्या पडद्याआड दडून घरांत तरी बसली आहे. असल्या नीच मनुष्याच्या अपवित्र स्पर्शानं माझं चित्र देखील भ्रष्ट झालेलं मला खपत नाहीं. म्हणून मी पुढें यायला भीत होतें.—हें तरी कारण पटून आपला संशय दूर होतो आहे का ?

**पूर्णचंद्र**:–कृष्णकांत, हें काय! विलक्षणच झालं हो !

**कृष्णकांत**:–हुंः, ही आपल्या नवऱ्याला पातिव्रत्याची ऐट दाखविण्याकरितां कांहीं तरी बडबडत आहे झालं ! तुम्हीच सांगा, यांत एक अक्षर तरी खरं आहे का ? डॉक्टर, ठीक केलीत. आम्ही आतां येतों. तुम्ही वेडगळ, आणि तुमचं हें फटकळ कुटुंब, घाला आतां सांवळा गोंधळ झालं.

**डॉ० कार्तिकेय**:–बस्स बस्स. पुरे कर आतां तुझं शहाणपण.

**पूर्णचंद्र**:–( स्वगत ) हा एक अकल्पितच रंग उडाला; पण तो देखील खुनाइतकाच लाल आहे. ( उघड ) डॉक्टर, जाऊं द्या, ही तुमची स्त्री फार थोर मनाची बायको आहे. तिनं तुमचं वेड घालविण्याचा जो उपाय योजला होता, तोही फार धाडसी होता. त्यांत तिला यश आलं. ती पतिव्रता आहे, हें उघड दिसतच आहे. बाकी या कृष्णकांतांच्यासंबंधानं ती जें कांहीं बोलली, त्यांतलं मर्म माझ्याइतकं कुणीच जाणणार नाहीं हें खरं आहे; कारण मी कृष्णकांतांना पूर्णपणें ओळखतों. त्यांच्यावर या बाईनीं केलेल्या आरो-

पांची मी नीट छाननी करून, त्यांची वाट लाविली असती, पण, त्याची ही वेळ नव्हे. सध्यां तुम्ही आपल्या स्त्रीचा स्वीकार करा आणि आनंदानं रहा. आतां आम्ही तुमच्या एकांताच्या आड येत नाहीं. कृष्णकांत, चला आपण घरीं जाऊं.

**कृष्णकांतः**–वाः ! डॉक्टर, बहार केलीत ! हें आमचं सामान तरी एवढं पाठवून द्याल का !

**डॉ० कार्तिकेयः**–अलबत् पाठवीन; ठीक आहे. या झालेल्या प्रकाराबद्दल मला फार फार वाईट वाटतं.

( पूर्णचंद्र व कृष्णकांत हंसत हंसत माना हलवीत जातात. )

( डॉक्टर कार्तिकेय व नलिनी स्तब्ध खालीं माना घालून उभीं रहातात. )

**डॉ० कार्तिकेयः**–( सुस्कारा टाकून स्वगत ) ही माझी पत्नी असेल अशी कल्पना देखील माझ्या मनाला आजपर्यंत शिवली नाहीं ! ( उघड ) प्रिये–पण स्त्रीजातीला प्रिय वाटेल असं बोलण्याची संवय मोडल्यामुळें हे शब्द माझ्या तोंडांत अडखळत आहेत.

**नलिनीः**–अजून संशयच आहे ना ?

**डॉ० कार्तिकेयः**–संशय फिटला, आणि त्याबरोबर डोळ्यांचं पारणंही फिटलं. पण, तुझ्या देहाचं ओझं समुद्रांत फेंकून देण्याकरितां पायांनीं उचलल्यामुळं ते भारावले आहेत—बेशरम झाले आहेत, ते जागचे हालत नाहींत, त्याला मी काय करूं ?

**नलिनीः**– त्या वेळीं मी तुमच्या खांद्यावर बसून समुद्रावर सहल करायला गेलें म्हणून माझ्या पायांचे श्रम मुळींच खर्चीं पडले नाहींत. ते वांचलेले श्रम–ते माझे भुईंत ठेवलेले श्रम–या संसाराचा नवा डाव खेळतांना मी बाहेर काढीन. म्हणजे तुमच्याकडे धांवत यायला मला दुप्पट जोर येईल. माझे पाय कांहीं बेशरम होणार नाहींत. कारण, माझ्या मनावरचा स्वतःबद्दलचा सर्व भार मीं या आपल्या चरणीं वाहिला आहे. खरंच गडे, त्यानंच आपले पाय जागचे हालत नाहीं. मीच येतें कशी ! ( धांवत जाऊन आलिंगन देण्याकरितां हात पुढें करते. )

**डॉ० कार्तिकेयः**–( स्वगत ) देवा, या प्रेमावर माझा काय अधिकार आहे ?

**नलिनीः**–काय, पुन्हां संशयाची लाट आली का ? प्रेमाच्या भरतीबरोबर माझ्याकडे येऊं पहाणाऱ्या दयेच्या सागराला, मी जवळ आल्यामुळें अशी ओहोटी कां लागली ?–का मीं पुरुषवेष घेतल्यामुळें लोकांना पुरुषाच्या हृदयाचा भास उत्पन्न करणारं माझं हृदय, आपल्या मर्दानी हृदयासमोर, मीं कितीही जोर केला, तरी समान धर्मामुळें असंच थबकून राहिलं? महाराज, माझ्या हृदयाचा घाट मर्दानी नाहीं, हें समजल्यामुळेंच आपलं हृदय त्याला ओढून घेत आहे; अशा वेळीं त्यांतून वहाणारा प्रेमाचा ओघ एकजीव होऊं नये, म्हणून का या हातांचा घट्ट विळखा आपण त्याच्याभोंवतीं घातला आहे ? आपली मर्जी असेल तर तो तसाच राहूं दे. मी आपल्याला तसंच आलिंगन देतें. ( आलिंगन देऊन ) या हाताला दोहों बाजूंनीं चिकटलेल्या या दोन हृदयांतून वहाणारा प्रवाह प्रत्यक्ष जरी एकजीव झाला नाहीं, तरी या हातांत त्याचं सामर्थ्य वृद्धिंगत झाल्यामुळें योग्य वेळीं तो देदीप्यमान स्वरूप धारण करील, अशी मला आशा आहे. आपण नका मला आलिंगन देऊं.

**डॉ० कार्तिकेयः**–तेंच खरं ! नलिनी, दूर हो. मीं हिमालयांत जाण्याचा बेत केला आहे तोच माझ्या अंतःकरणांत या वेळीं दृढमूल होत आहे. माझ्या हृदयांत प्रेम उत्पन्न झालं आहे, पण तें विषयाचं नव्हे. माझ्या प्रेमाचं नांवच मी बदलतों म्हणजे तुझा घोंटाळा होणार नाहीं. त्याला भक्ति म्हण. संसारांत मीं उत्पन्न केलेल्या संकटांनीं, माझ्यावर लादलेल्या ब्रह्मचर्यव्रताच्या तेजांत, माझे डोळे दिपल्यामुळें मी आगाऊच आंधळा झालों आहें, प्रेमानं आंधळा होण्याला माझ्याजवळ डोळेच नाहींत. नुसती दृष्टादृष्ट झाल्याबरोबर, दृष्टवस्तूचं यथार्थ ज्ञान होण्याकरितां नेत्रांच्या साहाय्यानं त्यांतील ज्ञानमय पीतपटावर सूक्ष्म मूर्ति उमटविणारे प्रकाशाचे किरण केंद्रीभूत होतांना प्रेमाची ऊब प्रणयी जोडप्याला प्रथमभेटीच्या वेळीं भासवितात. पण तो प्रकार राजेरजवाड्यांच्या प्रेमाचा.—पाश्चिमात्यांच्या परिचयांतला प्रेमी नाटककाराच्या शृंगाराचा; सहवासानं वाढत जाणाऱ्या खऱ्या प्रेमाचं स्वारस्यही न जाणणाऱ्या मला मूढ पशूला त्याचा काय उपयोग ? पण या वेळीं ती प्रेमाची बऊ–नव्हे आंच–माझं अंतःकरण जाळीत आहे. डोक्याला डोकीं लावून आपण

किती प्रेमाश्रू काढले—आपल्या भावी संसाराचं पुण्याहवाचन ठेवण्याकरितां आपले प्रेमगंगेनं भरलेले हे कलश एकमेकांना चिकटवून त्यांतून निघणारे प्रवाह एकजीव करून किती वेळ जरी वहात ठेविले, तुझ्या मधुर वाणीनं उच्चारलेल्या वेदतुल्य मंत्रांनीं त्या प्रवाहांना पावन करून प्रत्यक्ष अमृत केल्यामुळें नदीप्रमाणें एकरूप होण्याचं विसरून जाऊन, पर्जन्याप्रमाणें अश्रुधारांचा त्यांनीं जरी वर्षाव केला, तरी वठून गेलेल्या माझ्या संसारवृक्षाला कधींही अंकुर फुटणार नाहींत.

**नलिनी**:–महाराज, मग आपण करणार तरी काय ?

**डॉ० कार्तिकेय**:–मीं हिमालयांत जाणार. त्या ठिकाणीं मन शांत करण्याकरितां तपश्चर्या करणार, त्या वेळीं तेथील वनस्पतींचा अभ्यास करून माझ्या धंद्याच्या द्वारां माझ्या देशाकरितां मी आपला देह झिजविण्यास मी कदाचित् परत येईन. ज्यांचा संसार कोणत्याही कारणानं आटोपला असेल, त्यांनीं पुन्हां संसाराची बेडी राजीखुषीनं आपल्या पायांत अडकवून घेऊन देशसेवेच्या मार्गांत अडखळत चालूं नये, त्या शृंखलांचा रुणझुण नाद हाच ब्रह्मनाद मानून त्यांत रमून जाऊं नये असं मी आजपर्यंत म्हणत आलों आहें; आणि मीं तर आपला संसार आपल्या हातांनीं छिन्नविच्छिन्न केला आहे, तेव्हां हा अकस्मात् आलेला संसाराचा घाला मला प्रिय आहे तरी देखील माझ्या विचारांशीं विसंगत आहे, म्हणून मला हटविलाच पाहिजे.

**नलिनी**:–आणि माझी वाट ?

**डॉ० कार्तिकेय**:–जी माझी तीच तुझी. चल, तुझी मर्जी असेल तर तूंही माझ्याबरोबर ये. तुझा फोटो मी नेणारच होतों. मग हा सजीव फोटो आहे, असं समजून तुला न्यायला माझी कांहीं हरकत नाहीं.

**नलिनी**:– मी केव्हांही तयारच आहें. आपण संसारावर लाथ मारून साधु होणार आहां, पण मी साध्वी झालेलीच आहे. मीही तुमच्याकरितां संसारावर लाथ मारतें. आम्हां स्त्रियांना हें बाळकडूच आहे, तसं पुरुषांना नाहीं.

( जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

( डॉ. करुणेश व पूर्णचंद्र बोलत बोलत येतात. )

**डॉ० करुणेशः**–याचं कारण, त्या मुलाला एकदम अंगावरून तोडलं आहे, आणि पिक्युलिअर मौज अशी कीं, नंतर त्याची फार हयगय झाली आहे.

**पूर्णचंद्रः**–आतां कांहीं आशा नाहीं ना ?

**डॉ० करुणेशः**–छेः होपलेस; लास्ट स्टेज. मी विलासिनीबाईंना वाईट वाटेल म्हणून बोललों नाहीं. शिवाय पतिवियोगाचा भयंकर शॉक बसल्यामुळें प्रेमाचा पान्हा आटून गेला, अशी त्यांची पूर्ण कनूव्हिक्शन असल्यामुळें त्यांना जें या दुःखांत स्वतःच्या निरपराधाचं समाधान आहे तें मी घालवूं इच्छित नाहीं.

**पूर्णचंद्रः**–सहवास सोडून गेलेल्या पतीवरील प्रेम, निकट सहवासांत स्तनपान करणाऱ्या पुत्रावरील प्रेमापेक्षां अधिक योग्यतेचं आहे असाच याचा अर्थ नाहीं का होत ? मीं असं ऐकलं आहे कीं सौंदर्य कायम राखण्यासाठीं सुंदर स्त्रिया मुलांना अंगावर घेत नाहींत. स्तनपानामुळें सौंदर्याची हानि होते.

**डॉ० करुणेशः**–आपली खात्री असूं द्या कीं, हें अगदीं नॉनूसेन्स, स्टुपिड आग्युमेंट आहे. पिक्युलिअर मौज अशी आहे कीं, त्या दुधाची विल्हेवाट लागलीच पाहिजे असा नेचरचा नियम असल्यामुळें बाळाच्या मृदु ओंठांना जरी निष्ठुर हातांनीं दूर लोटलं तरी त्यांना त्याचे पाट काढून देऊनच वाट लाविली पाहिजे. आणि या कामी औषधांना आश्रय देणं म्हणजे एखाद्या रोगालाच विन्हाड देण्यासारखं आहे.

**पूर्णचंद्रः**–(दुःखानें) तुम्ही पुन्हां एकवार तिकडे जा, आणि तुमच्या हातून कांहीं होणं शक्य असेल तर त्या–मा–बाळाला वांचवा. त्या घराण्याचे माझ्यावर फार उपकार आहेत त्यामुळें माझं अंतःकरण या वेळीं तिळतिळ तुटत आहे.

**डॉ० करुणेशः**–मी प्रयत्न करतों. पण त्याच्या आईला जरी माझ्या-

च्यानं सांगवलं नाहीं, तरी तुम्हांला सांगून ठेवतों कीं, तो फार थोड्या वेळाचा सोबती आहे. ( जातो. )

**पूर्णचंद्र**:–अरेरे ! माझा शशिकर आतां मरणार ना ! काय चमत्कार आहे पहा. प्रत्यक्ष पोटचा पोर मरणाच्या द्वारीं पडला असून त्याची आई त्याच्याजवळ सुद्धां जात नाहीं. कारण काय तर पोराला झालेल्या दुखण्याचा संसर्ग बाधेल हें ! मातृपदाच्या पवित्र सिंहासनावर बसून प्रजापालन करणारी राज्ञी किती उदार अंतःकरणाची असली पाहिजे ! आपल्या प्रजेचीं सर्व दुःखं नाहींशीं करण्याचा तिनं सारखा प्रयत्न केला पाहिजे. पण या ठिकाणीं साराच उलटा प्रकार. प्रजा मेली तरी हरकत नाहीं. आपली विषयवासना पूर्ण झाली म्हणजे झालं. माझा शशी त्या कृत्येच्या हयगयीनं मरणार. त्याला जगांतील कोणतंच सौख्य मिळालं नाहीं. मी जिवंत असतांना त्याला बरा करण्याचे उघड उपाय करणं माझ्या हातीं नाहीं, ही तरी दैवाची विचित्र गतीच समजली पाहिजे. मघाशीं, त्याला शेवटचं भेटतांना रडूं आंवरण्याच्या प्रयत्नांत तें अधिकच उसळल्यामुळें, या आरशीच्या भिंगावर पडून, आधींच भिंगांच्या रंगांमुळें अस्पष्ट दिसणारा त्याचा चेहरा, एकदम अदृश्य झाला. त्या वेळीं माझ्या देखत माझ्या बाळाला काळानं उचलून नेलं कीं काय असा भास होऊन, मी देहभान विसरलों. आणि तोंड बिछान्याजवळ नेलं, त्याबरोबर, ज्या चिमुकल्या हातांना मीं आरशी काढून घेण्याच्या कामांत आजपर्यंत फसवलं, त्यांनीं आरशी एकदम हस्तगत केली, आणि माझ्या सखेद प्रेमाश्रूंना वाट दिली. तों—तों काय—त्या बाळाचं तें निस्तेज तोंड माझ्या डोळ्यांत घुसलं, आणि त्यानं जिवंत असतांना माझ्या नेत्रदर्शनाबरोबर ‘ बा बा ’ चा जो धडा घेतला होता, जो पाठ म्हणवून घेण्यांत मला आनंद वाटत असे, त्याची परीक्षा देण्याकरितांच “ बाबा, बाबा ” असं म्हणत माझ्या अंतःकरणांत त्याचा ठाव घेत उडी टाकली. पण त्या वेळीं त्या ठिकाणीं आनंदाची एकही लाट न उसळतां, दुःखांच्या लाटांचा कल्लोळ मात्र उसळला. त्या कल्लोळाचा हा “ बाबा, बाबा ” असा प्रतिध्वनि माझ्या कानांत घुमत आहे ! छेः या वेळीं कांहीं तरी दुसरा विषय काढलाच पाहिजे. नाहीं तर माझं मन त्या पोराच्या ठिकाणीं घिरट्या घालीत राहील. पण काय तो माझाच मुलगा आहे का तिच्या व्यभिचाराचं तें कडू फळ आहे ! पण

तो माझ्यासारखा दिसतो ! नको. नको; हा आतां विचारच नको. कोण आहे तिकडे, पद्माकर, ( पद्माकर येतो. ) आजचा आंदोल आण.

**पद्माकरः**–अजून आला नाहीं सरकार.

**पूर्णचंद्रः**–दुसरं कांहीं वर्तमानपत्र.

**पद्माकरः**–कांहीं नाहीं. सरकार, आपल्याजवळ एक विनंति आहे.

**पूर्णचंद्रः**–एकच कां. तुझ्या मी हजारों विनंत्या मान्य करीन. बोल काय काम आहे.

**पद्माकरः**–मेनकाबाईंनीं आपली मुलगी पाठविली आहे. तिची भेट—

**पूर्णचंद्रः**–मीं त्यांना तुमची मुलगी पाहीन म्हणून सांगितलं होतं. जा, तिला घेऊन ये. ( जातो. ) हे लोक मला कां त्रास देतात समजत नाहीं. त्यांना माझ्याशीं वास्तविक कांहीं कर्तव्य नसून माझ्या संपत्तीवर यांचा डोळा आहे. बस्स, यापुढें एकही मुलगी पहावयाची नाहीं. भिडेकरितां आणि एका कार्याकरितां होय म्हणतों, पण त्यामुळें हा मुली पाहण्याचा माझा एक धंदाच झाला आहे. ( पद्माकर व कमला येतात. कमला नमस्कार करिते. ) पद्माकर, वर्तमानपत्र आलं म्हणजे आणून द्या. ( तो जातो. ) बैस मुली. तुझं नांव काय ?

**कमलाः**–कमला.

**पूर्णचंद्रः**–तूं आतां बरीच मोठी आहेस तेव्हां तुला सर्व कांहीं कळत आहे. तूं घरची गरीब आहेस ना ?

**कमलाः**–साधरण खाऊन पिऊन सुखी आहें.

**पूर्णचंद्रः**–मग तुला श्रीमंतीचं सौख्य उपभोगण्याची वारंवार इच्छा होत असेल नाहीं ?

**कमलाः**–केवळ श्रीमंतींतच सुख असतं अशी माझी समजूत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–मग कशांत सौख्य आहे ?

**कमलाः**–प्रेमांत.

**पूर्णचंद्रः**–काय प्रेमांत ?

**कमलाः**–होय महाराज, निष्कलंक आणि सात्विक प्रेमांत.

**पूर्णचंद्रः**–तुझं माझ्यावर प्रेम असूं शकेल का ?

**कमलाः**–हो, पण तें निराळ्या तऱ्हेचं. कारण, ज्या तऱ्हेच्या प्रेमाची आपण माझ्यापासून अपेक्षा करतां तें प्रेम मीं अगोदरच एकाला देऊन टाकलं आहे.

**पूर्णचंद्रः**–काय म्हणतेस ? माझ्याकरितां तें तुझ्याजवळ शिल्लक नाहीं• माझ्या संपत्तीनं तुझ्या तोंडाला पाणी सुटत नाहीं ? मी तुला हिऱ्यामोत्यांचे दागिने देईन. शेंकडों नोकरचाकर तुझ्या तैनातीला ठेवीन. तुझी वाटेल ती हौस पुरवीन. तुला स्वच्छंदपणानं वागूं देईन.

**कमलाः**–या सर्व गोष्टी स्त्रियांना भुरळ पाडणाऱ्या आहेत. पण त्याचा सरसकट प्रत्येक स्त्रीवर पगडा बसेल असं मला नाहीं वाटत. निदान माझ्यावर तरी तो खास बसणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–तुझे हे विचार ऐकून माझी तुझ्याबद्दलची जिज्ञासा कमी न होतां उलट वाढत चालली आहे.

**कमलाः**–( स्वगत ) हें प्रकरण कोणत्या थरावर जाणार कांहीं कळत नाहीं. पद्माकरांचा अनुभव चुकणार असं वाटतं. ( उघड ) महाराज, आपल्या वयाकडे पाहून मी आपल्याला वडिलांप्रमाणें पूज्य मानतें. आपण माझा अभिलाष धरूं नये.

**पूर्णचंद्रः**–कां बरं ! माझ्या संपत्तीला काय वश होणार नाहीं ?

**कमलाः**–सारं वश होईल, पण माझं मन नाहीं होणार.

**पूर्णचंद्रः**–तुझं मन कुणावर गुंतलं आहे ? त्याचं नांव सांगशील का ?

**कमलाः**–आपल्यासारख्या थोर वृद्ध मनुष्याजवळ सांगायला काय हरकत आहे ? त्यांचं नांव पद्माकर.

**पूर्णचंद्रः**–काय पद्माकर ! तो काय उद्योग करतो ?

**कमलाः**–ते आपल्याजवळच आतांशा आपले खासगी कारभारी आहेत.

**पूर्णचंद्रः**–त्याच्यावर तुझं प्रेम आहे. वः ! फार छान निवड केलीस. तूं माझा अंगिकार न करतां जर माझ्या नोकराशीं लग्न लावलंस तर सारे लोक तुला हंसतील.

**कमलाः**–लोकांशीं मला काय करायचं आहे!

**पूर्णचंद्रः**—पण तुझ्या आईची अशी इच्छा आहे कीं तुला श्रीमंत नवरा मिळावा.

**कमलाः**—या बाबतींत तिची निराशा होणार आहे. पण देवाच्या मनांत जर मी श्रीमंत नवऱ्याची बायको व्हावी असं असेल तर श्रीमंतीही घरीं चालून येईल.

**पूर्णचंद्रः**—जा, घरीं जा आतां. (ती नमस्कार करते.) परमेश्वर तुझी इच्छा पूर्ण करील. तुझे मनोरथ पूर्ण होतील. ( ती जाते. पद्माकर येतो. ) ( पद्माकर एक पत्र देतो तें पत्र स्वगत वाचतो. )

सा० न० वि० वि०

आपणास कळविण्यास फार वाईट वाटतें कीं, माझा शशिकर इहलोक सोडून गेला. माझी दुःखानं काय स्थिति झाली आहे ती प्रत्यक्ष पाहिल्या-शिवाय आपणांस समजणार नाहीं. तावडतोब येण्याचं करावं. तसदीची माफी असावी. अधिक लिहवत नाहीं.

आपली दासी,

**विलासिनी.**

**पूर्णचंद्रः**—पद्माकर, गाडी जोडायला सांग. ( तो जातो. ) बाळा शशिकरा, गेलासना शेवटीं ! छेः ! या वेळीं शोक आंवरून शोकपर्यवसायी नाटकांतील नायिका दुःखाचं कसं सोंग आणते, तें आधीं पाहिलं पाहिजे. आणखी हें पाहण्याची वेळही चांगली आली आहे. ती दवडतां कामा नये. ( जातो. )

---

# प्रवेश ७ वा.

**पूर्णचंद्रः**—शशिकर आणि मोत्या यांना एकदम मृत्यु आलेला पाहून माझं मन अगदीं उदास होऊन गेलेलं आहे. त्या चांडाळणीनं जाणूनबुजून हलगर्जी-पणानं पोर मारलं. तो मोत्या तिच्या अंगावर येऊन तिला चावला, म्हणून तावडतोब त्याला गोळी घालून मारलं. हायरे इमानी प्राण्या ! तुझा अशा रीतीनं अंत व्हावा ना ! पण तुझ्याकडे काय दोष ! दुष्कर्माला धोंपटमार्गानं

शासन करण्याचं तुझं काम तूं जाहीर रीतीनं बजावलंस, म्हणून तुला मृत्यु आला. मी तेंच काम गुप्त रीतीनं करीत आहें, म्हणून अद्याप जिवंत आहे. ठीक आहे. या दोन्ही मृत्यूंनीं माझ्या सुडाच्या कल्पनेचा जोर वाढत चालला आहे. एक वार तिच्या तोंडांतून तो शब्द बाहेर पडूं दे कीं त्याबरोबर तिचा प्राणच बाहेर खेंचून काढितों. त्या कृष्णकांताला माझ्या मुलाच्या मृत्यूनं आनंद वाटत आहे; पण त्याला ठाऊक—अरे पण हा कृष्णकांतच इकडे येत आहे. ( तो येतो. ) कां असं गडबडींत कां? काय काम आहे? शशिकरच्या मरणानं आपल्याला अतोनात दुःख झालं आहे म्हणून वेळ घालविण्याला आलांत कीं काय?

**कृष्णकांतः**—तो मेला फार छान झालं! मला त्याचा अतिशय राग येत असे. तो जगला असता तर मोठा त्रास व अडचण झाली असती. त्याला पाहिलं कीं त्या पूर्ण-चंद्राची नेहमीं आठवण व्हायची, आणि त्याच तर मला मनापासून तिटकारा. छे! मला मुळींच वाईट वाटत नाहीं. उलट आनंदच वाटतो. आपण जरा आपल्या आंतल्या खोलींत जाऊं.

**पूर्णचंद्रः**—( स्वगत ) कसा उलट्या काळजाचा प्राणी आहे. मला तर वाटतं याला काळीज नसेल. नाहीं तर असं बोलला नसता.

**कृष्णकांतः**—मला तुमच्याशीं एका नाजूक बाबतींत बोलायचं आहे.

**पूर्णचंद्रः**—कांहीं पैशांचा पेंचबीच आहे कीं काय? तुम्हीं तोंडांतून आंकडा काढायचा अवकाश कीं रुपये तुमच्या हातांत पडलेच समजा. हजार दोन हजार तीन हजार लागतील तितके देईन तुम्हांला. तुमच्यापेक्षां मला पैसा अधिक नाहीं!

**कृष्णकांतः**—नाहीं; त्यांपैकीं कांहीं प्रकार नाहीं. हें पहा, माझ्यावर मोठा आणीबाणीचा प्रसंग आला आहे.

**पूर्णचंद्रः**—पांखराला पंख फुटले वाटतं? विलासिनीनं फसविलं कीं काय? नाहीं तुमच्याशीं लग्न करीत ती?

**कृष्णकांतः**—( हंसत ) ती काय मला फसविते म्हणा, तसं करण्याची तिची छाती नाहीं.

**पूर्णचंद्रः**—छाती नाहीं! हे शब्द जरासे फाजील कडक होतात.

**कृष्णकांतः**–तसा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाहीं. अहो ती काय वाटेल तें करायला स्वतंत्र आहे. पण इतके दिवस प्रेम दाखवून आतां ऐन वेळीं माझं मन तिला मोडतां येणार नाहीं, असं मी म्हणतों. खरं कीं नाहीं ?

**पूर्णचंद्रः**–हें अगदीं बरोबर आहे. ती कसं तुमचं मन मोडील ! जर ती तुमचा अंगीकार न करील, तर मग ती अतिशय निंद्य विलास करणारी आहे, असं उघड होतं. परपुरुषांवर आसक्त होणाऱ्या स्त्रीला मी कवडीमोल समजतों. पण विलासिनीची खरी किंमत काय हें तुम्ही जाणतां. ती साध्वी आहे, पवित्र आहे, शुद्ध आहे, महान् पतिव्रता आहे. हें तुम्हांला माहीत असून तुम्ही कां भितां ? पण पैसा आणि प्रेम याशिवाय तिसरी कोणती गोष्ट तुमच्या मनाला डांचते आहे, हें कळणं फार कठीण आहे. बोला, बोला, तुम्हांला काळजींत पाहून माझं काळीज तिळतिळ तुटत आहे.

**कृष्णकांतः**–काळजीचं कारण एवढंच कीं, मला कांहीं दिवस कुसुमपूर सोडून दूर गेलं पाहिजे.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) हा दूर जातो. अहाहा ! किती नामी; समरांगणांतून शत्रूनं पळ काढला. आतां लढाई लवकर संपणार. माझा विजय होणार. ( उघड ) दूर जाणार, कां, कुठें, कशाला, काय काम ?

**कृष्णकांतः**–अशोकपुराला माझा काका मरणाच्या द्वारीं पडला आहे. त्याच्या इस्टेटींचा मी वारस आहें. तेव्हां लोकांत बरं दिसण्याकरितां तरी तिकडे मला गेलंच पाहिजे. शिवाय वकिलांचं असं म्हणणं पडलं आहे कीं, मी जवळ नसलों तर म्हातारा कांहीं भलतंच करील. आणि फुकट नुकसान होईल. मला कांहीं फार दिवस लागणार नाहींत. कमाल म्हणजे पंधरा दिवस. पण तोंपर्यंत इकडे विला—

**पूर्णचंद्रः**–बोला. असं अडखळतां काय ? तुमच्या पाठीमागें मी वाटेल तें काम करीन. तुमच्या हुकुमाचा अवकाश.

**कृष्णकांतः**–( खुर्चीजवळ येऊन ) ती माझी खात्री आहे. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे. तुम्ही केव्हांही मित्रद्रोह करणार नाहीं. ( हळूच ) तिच्यावर नजर ठेवा. ती अगदीं एकटी आहे, आणि शिवाय सुंदर असून भाबडी आहे. आलं ना ध्यानांत ? तुम्ही तिच्यावर सक्त पहारा करा. तुम्ही

वृद्ध आहांत. तुमची इभ्रत मोठी आहे. शिवाय तुम्ही शौर्यसागरांच्या घराण्याचे अभिमानी आहांत. तुम्हांला हें काम केलंच पाहिजे. तेव्हां कोणीही परकी पुरुष तिच्याशीं सलगी करणार नाहीं अशी खबरदारी तुम्हांला घ्यायलाच पाहिजे.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) हें खरंच माझं काम आहे. ( उघड ) अलबत् खबरदारी घेईन. ( रागाचें अवसान आणून ) कोणत्याही मनुष्याच्या तोंडून तिच्याविषयीं प्रेमाचे शब्द बाहेर निघूं देन कीं त्यांचा माझ्या कानापर्यंतचा प्रवास पुरा होतो न होतो तोंच त्याचाही इहलोकचा प्रवास पुरा करितों. तरच मी–( गंभीरपणानें ) पण छे. छे, हा विषय थट्टेवारी नेणं चांगलं नाहीं. मी विसरलोंच. कृष्णकांत, थट्टेबद्दल क्षमा करा. मी तिच्यावर सक्त नजर ठेवीन. अगदीं सख्ख्या वडील भावाप्रमाणें तिला जपेन. मी कबूल करितों कीं हें काम करायला माझ्याइतका योग्य दुसरा माणूसच नाहीं. पण मला तें मनापासून मुळींच आवडत नाहीं. बायकांच्या भानगडींत पडतं कोण ? पण केवळ माझ्या दोस्ताला खुष करण्याकरितां मी तें कबूल करितों. तुम्ही स्वस्थ चित्तानं इथून जा. ( हातांत हात घेऊन ) तुमचे मित्र पूर्णचंद्र जिवंत असतांना त्यांच्याशीं ज्या निष्ठेनं आणि विश्वासानं तुम्ही वागलां त्याचं हुबेहूब अनुकरण जर माझ्या वर्तनांत दिसलं नाहीं, तर नांव बदलून देईन. तुमचं चरित्र मीं आरशासारखं डोळ्यांपुढें ठेविलं आहे. मित्राशीं वागण्यांत मी थेट तुमचाच कित्ता गिरविणार. मित्रप्रेमाचं इतकं ढळढळीत उदाहरण इतिहासांत तरी आहे कुठें ?

**कृष्णकांतः**–( कावराबावरा होतो पण तसेंच दाबून ) तुमचे माझ्यावर हे मोठेच उपकार आहेत. पण तुमच्या या बोलण्यानं माझं मन साशंक होतं आहे. आपण मला माफी करा. मी आपल्या मोठेपणावर ठेवूं तर विश्वास ?

**पूर्णचंद्रः**–स्वतःच्या मोठेपणावर जितका तुम्ही विश्वास ठेवाल तितकाच माझ्या मोठेपणावर खुशाल ठेवा. ( दुःखाचा आव आणून ) पण आपल्या विरहाचं दुःख आम्हाला केव्हां सोसावं लागणार ?

**कृष्णकांतः**–उद्यां सकाळीं एक्स्प्रेसनं जाणार.

**पूर्णचंद्रः**–पत्रबित्र पाठवीत जा आणि यायच्या आधीं केव्हां येणार तें तारेनं कळवा. मी जी मेजवानी करणार होतों, ती तुम्ही परत येईपर्यंत तहकूब ठेवितों.

**कृष्णकांतः**–छे, असं कशाला करायला पाहिजे! तुम्ही आपला बेत कां मोडतां माझ्यासाठीं?

**पूर्णचंद्रः**–तें बोलूंसुद्धां नका. तुम्ही आल्याशिवाय आम्ही कांहींही करणार नाहीं. इतकंच काय पण तुम्हीं ज्या दिवशीं याल त्याच दिवशीं मी मेजवानीचा बेत करणार आहे. तुमच्या नवीन वैभवाचा तो एक उत्साहच आहे असं समजा. विलासिनीला भेटायला जायला त्यामुळें थोडा उशीर होईल. पण अशा वेळीं थोड्याशा दिरंगाईनं शृंगार रंगांत येतो. पण विलासिनीला अगदीं बंदींत ठेवलं तर तें तुम्हांला आवडेल ना?

**कृष्णकांतः**–छे, अशानं तिचं मन प्रसन्न राहणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–नाहीं नाहीं, त्याची मी काळजी घेईन. तिला नेहमीं खुषींत ठेवीन. थोडंसं गाडींतून फिरणं, केव्हां तरी एखादं फक्कडसं नाटक, कधीं घरींच गवयाचं गाणं, असं केलं म्हणजे झालं. तुम्ही माझ्यावर सोंपवा. मी तें सारं ठीक करितों.

**कृष्णकांतः**–किती हे तुमचे माझ्यावर उपकार आहेत. हे माझ्या हातून कसे फिटतील ते फिटोत. तम्ही उपकारांच्या ओझ्यानं माझी मान खास मोडणार.

**पूर्णचंद्रः**–असं होतं आहे खरंच; पण माझे हे उपकार फेडण्याची मी तुम्हांला एक दिवस संधि देईन. पण हें पहा, असे बोलत बसलों तर इथेंच उजाडेल.

**कृष्णकांतः**–हो मला गेलंच पाहिजे. सामानसुमान कांहीं तयार केलं नाहीं. एक पुस्तक एवढं विकत आणिलं आहे.

**पूर्णचंद्रः**–काय आहे? नवीनच दिसतं. "रति मदन" एक शृंगाररसप्रधान काव्य. हें तुम्हो वाचणार आहां वाटतं? फारच छान अभ्यास आहे बुवा.

**कृष्णकांतः**–( जातां जातां ) मी तुमच्यावर विश्वास टाकून चाललों आहे हें ध्यानांत असूं द्या. तुम्हीं तिला संभाळलीच पाहिजे.

**पूर्णचंद्रः**–तुम्ही इथून बिनघोर निघून जा. तुमच्या जागीं तुमच्या मागं मी हुबेहूब तुमच्यासारखा दक्ष राहून काम करीन. ( शेकहँड करून जातांना ) तार पाठवायला विसरूं नका. मी वाट पहात बसतों! स्टेशनावर माझी गाडी पाठवितों म्हणजे परस्पर इकडे यायला ठीक पडेल. ठरलं ना?

**कृष्णकांतः**—हें काय विचारतां ? आपला शब्द कोण मोडणार आहे ? आपल्या इच्छेबाहेर मी नाहीं. बरं, येतो तर मी आतां. ( जातो. )

**पूर्णचंद्रः**—ही स्वारी आतां घरीं कसची जाते ! विलासिनीकडे जाऊन तिच्याकडून आतां आणाशपथा घेईल ! प्रेमानं तिला कुरवाळील ! तिचीं चुंबनं घेईल ! घे, घे, आणखी घे. आज आपली मुक्याची हौस पुरवून घे. कारण यापुढें तुला त्या मोहक चेहेऱ्याचा मुका कायमचा मुकणार आहे. ती रमणीय दृष्टि भीतीनं अगर प्रेमानं पुन्हां तुझ्याकडे वळणार नाहीं. तें सुकुमार शरीर तुझ्या बाहुपाशांत पुन्हां सांपडणार नाहीं. तुझ्या चुंबनाचा परिणाम तिच्या गुलाबी गालांवर आतां फिरून होणार नाहीं. तुझी वेळ जवळ आली आहे. तुझ्या पापांचा घडा भरत आला आहे. आपली निंद्य कामवासनाही या वेळीं पुरवून घे. तुझ्या तोंडचा घास आतांच मी बाहेर कांढीत नाहीं. कारण हा शेवटचाच आहे. ही शृंगाराची शेवटचीच रात्र आहे. मांग, ढोंगी, घातकी, घे, या वेळीं दरवाजे घट्ट लावून घे. नाहीं तर तुमच्या शृंगारचेष्टा या निर्मल तारांगणाच्या नजरेस पडतील. तुला मोहांत पाडणारं अप्रतिम सौंदर्य दिव्याच्या कृत्रिम प्रकाशांत या वेळीं शेवटचंच पाहून घे. तिचा मंजुळ ध्वनि तुझ्या कानांत घुमूं दे. 'कृष्णकांत, मी कधींही तुमच्याशीं बेइमान होणार नाहीं' असं गोड गोड, पण साफ खोटं वचन ती तुला देईल. त्याची गोडी चाखीत तूं तिथून आपला हळू हळू बाहेर पाय काढ. असं करणं तुझ्या जिवावर येईल, पण तें तुला केलंच पाहिजे. आतां जी तुमची ताटातूट होईल ती कायमचीच.

अंक चौथा समाप्त.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

( विलासिनी एका नोकराबरोबर बोलत उभी आहे. )

**विलासिनीः**—कायरे, काय करीत होते शास्त्रीबुवा ? आज पुराण सांगायला कां नाहीं आले ? मीं बोलावलं आहे म्हणून सांगितलंस का त्यांना ?

**नोकरः**—सांगितलं वहिनीसाहेब. तेच इकडे येत आहेत, म्हणून दुसरी कांहीं चौकशी केली नाहीं.

**विलासिनीः**—ते आले म्हणजे त्यांना इकडेच पाठवून दे. (नोकर जातो.) माझा विचार कांहीं शास्त्रीबुवांना रुचणार नाहीं. पण त्यांचं मत तरी काय आहे हें तर पाहूं या. ते कांहीं अगदींच जुन्या मताचे नाहींत. ( पंडित दयानंदशास्त्री प्रवेश करतात. विलासिनी त्यांना नमस्कार करणार इतक्यांत )

**शास्त्रीबोवाः**—नको, नको, आज नमस्कार करूं नका.

**विलासिनीः**—कां बरं ?

**शास्त्रीबोवाः**—माझ्या वेषांतरावरून आपल्या लक्षांत आलंच असेल.

**विलासिनीः**—वेषांतर ! गंध लावलं नाहीं, म्हणून पांढरं दिसणारं कपाळ, आणि पांढऱ्या कपाळाकडे लक्ष जावं म्हणून डोक्यावर घातलेलं हें पांढरं पागोटं, एवढाच काय तो फरक दिसतो.

**शास्त्रीबोवाः**—आज गुंता आला आहे; म्हणूनच पुराणाचा अनाध्याय झाला. मी सूचना पाठविणारच होतों, तों आपलं निमंत्रण आलं.

**विलासिनीः**—( सुस्कारा टाकून ) हं !

**शास्त्रीबोवाः**—तशांतलं कांहीं नाहीं; दशांतलं देखील नव्हे. आहे लांबचंच, आजच्यानं संपेल. निमंत्रण आलं होतं, म्हणून स्वतःच आलों झालं. कांहीं विशेष काम नाहीं ना ?

**विलासिनीः**–काम विशेष नाहीं. आपल्याला माझी पत्रिका दाखवायची आहे. आपल्याला पत्रिका समजते, तेव्हां माझ्या भावी आयुष्याबद्दल कांहीं ठोकळ भविष्य वर्तवा.

**शास्त्रीबोवाः**–आज नको, उद्या पाहूं. कारण—

**विलासिनीः**–नाहीं आजच सांगा. ही घ्या पत्रिका. त्याला काय झालं ?

**शास्त्रीबोवाः**–तुमचा आग्रहच आहे म्हणूनच पहातों. ( पत्रिका पाहून ) ही पत्रिका तुमची नाहीं.

**विलासिनीः**–( आश्चर्यानें ) असं कसं होईल ! त्यांनीं फार रुपये खर्चून ही तयार करविली होती.

**शास्त्रीबोवाः**–बाईसाहेब, रुपयांच्या राशींचा ग्रहांच्या राशीशीं कांहीं संबंध नाहीं. ही पत्रिका खास तुमची नव्हे. कारण, या पत्रिकेंत वैधव्ययोग मुळींच नाहीं. इतकंच काय पण ही स्त्री आणि इचा पति यांच्या मृत्युकालांत इतकं थोडं अंतर आहे कीं, कुणाला आधीं मृत्यु येईल हें सांगतां येणं कठिण आहे. अशा वेळीं सतीचा योग जरी असता तरी या पत्रिकेंत वैधव्ययोगाची छाक तरी दिसली असती. हल्लींच्या कालमानाप्रमाणें आगगाडीची टक्कर किंवा जलप्रलय यांत पतिसमवेत मृत्यु येईल असं एखाद्या ज्योतिषानं सांगितलं असतं. पण तेंही या ठिकाणीं संभवत नाहीं. म्हणून म्हणतों कीं ही पत्रिकाच तुमची नाहीं.

**विलासिनीः**–शास्त्रीबोवा, आजपर्यंत नव्हतं असं कुणीं सांगितलं ? इतकंच काय पण इचे कित्येक ठोकताळेदेखील आले आहेत.

**शास्त्रीबोवाः**–आले असतील. पण ही पत्रिका तुमची कधींही होणार नाहीं. तुम्हांला खरं सांगूं का ? ही एका वाईट चालीच्या बाईची पत्रिका आहे. तुमच्या उज्ज्वल चारित्र्यांत असल्या संशयालादेखील जागा नाहीं. तेव्हां ही पत्रिका मी तुमची कशी म्हणूं ?

**विलासिनीः**–असं न म्हणायला आणखी काय तुमच्याजवळ आधार आहेत ?

**शास्त्रीबोवाः**–आहेत. या स्त्रीला दोनें अपत्यें आहेत. पहिलं स्वतःच्या मुळावर आणि दुसरं आईबापांच्या मुळावर आहे. तसंच या स्त्रीवर नवऱ्याचं

अत्यंत प्रेम व इचं वाईट वर्तन समजल्यावर अत्यंत क्रोध आहे. या दोन्ही गोष्टींत पहिला भाग खरा आणि दुसरा साफ खोटा आहे. मी जास्त चिकित्सा करीत नाहीं, पण ही पत्रिका तुमची नव्हे अशी माझी बालंबाल खात्री आहे.

**विलासिनीः**–बरं नसूं दे माझी. पण ह्या स्त्रीला पुनर्विवाहाचा योग आहे कीं नाहीं एवढं सांगा पाहूं ?

**शास्त्रीबोवाः**–तें एकून तुम्हांला काय कर्तव्य आहे ? या विषयाची आपल्यासारख्या स्त्रियांनीं बिलकुल चिकित्साच करूं नये. आपण आपली जन्मवेळ मला द्या; मी आपली पत्रिका करतों. असल्या खोट्या पत्रिकेंतील भविष्य ऐकून तुम्हांला काय करायचं आहे ?

**विलासिनीः**–पण तुम्ही सांगाना; मला त्यांत मौज वाटते.

**शास्त्रीबोवाः**–हा आहे अश्लील विषय; पण तुमचं कौतुक पाहून मी तुमचं मन मोडीत नाहीं. या पत्रिकेंत पुनर्विवाहाचा योग मानला तर आहे. कारण, बाईची वागणूक ठीक नाहीं. म्हणून पुनर्विवाह म्हणजे दोन पतींचा योग मानायला कांहीं हरकत नाहीं.

**विलासिनीः**–बायकांनीं पुनर्विवाह करणं, म्हणजे कांहीं वाईट वागणं होतं असं मला वाटत नाहीं.

**शास्त्रीबोवाः**–(स्वगत) आज यांच्या मनाची चलबिचल झालेली दिसते. (उघड) याबद्दल माझीं कांहीं मतं बनलेलीं आहेत, पण तीं आपल्याला ऐकून काय करायचं आहे ? आपला काल सध्यां सन्मार्गानं जातो आहे. असाच परोपकार चालू ठेवाल तर देहाचं सार्थक होईल.

**विलासिनीः**–तुमचीं मतं मला एकदां ऐकलेलीं असूं देत. पुराणांतील कथांपेक्षां ह्या मतांचा मला अधिक उपयोग होईल. म्हणून म्हणतं आपल्यासारख्यांच्या तोंडून हा विषय ऐकलेला बरा.

**शास्त्रीबोवाः**–असं असेल तर मी सांगतों. नीट लक्ष देऊन ऐका. दुर्दैवानं अनाथ झालेल्या विधवेचं दर्शन मी अशुभ मानीत नाहीं. इतकंच नव्हे तरी मी तिला स्वार्थत्यागाची जागती ज्योत, किंवा आत्मयज्ञाच्या होमशाळेंत सदैव तेवत रहाणारा मंद–प्रकाश नंदादीप समजतों. त्या ठिकाणीं पुरुषांनीं दिवे लावून कितीही रोषनाई केली तरी याची बरोबरी होणं कठिण आहे.

**विलासिनीः**—यावरून तुमचीं पुनर्विवाहाबद्दलचीं मतं उघडच दिसत आहेत !

**शास्त्रीबोवाः**—अशा अधीर होऊं नका. मीं माझीं मतं लिहून ठेविलीं आहेत तींच मी तुम्हांला वाचायला देईन. म्हणजे तुमच्या चित्तांत जी अस्वस्थता उत्पन्न झाली आहे, पुत्रशोकामुळें तुमच्या अंतःकरणांत विचारांची जी कालवाकालव झाली आहे, ती शांत करण्याकरितां तुम्हांला त्यांचा उपयोग होईल.

**विलासिनीः**—आपल्यासारख्यांच्या अधिकारयुक्त वाणीनं उच्चारलेल्या पवित्र शब्दांनीं त्यांतलं थोडंसं तात्पर्य मला सांगा. मग आपल्या आज्ञेप्रमाणें मी आपलीं मतं सवडीनं वाचीन.

**शास्त्रीबोवाः**—बरं आहे. पण आश्रिताचं नातं विसरून जर एखादा स्पष्ट शब्द मुखांतून निघून गेला तर राग मानूं नका.

**विलासिनीः**—आपल्या बोलण्याचा कोण राग मानील ?

**शास्त्रीबोवाः**—बाईसाहेब, कोणत्याही विषयाला दोन बाजू असतात. एक चांगली आणि दुसरी वाईट. पतिनिधनानंतर स्त्रीनं सक्तीचं वैधव्य पाळण्याची रूढि, चांगली तशीच वाईटही आहे. सहसा अशा कामीं नेहमीं अतिरेक वाईट असतो. सक्तीच्या वैधव्याचा अतिरेक हा विधवांतील दुराचारांचा जनक आहे. त्याला तोड म्हणून ही पुनर्विवाहाची चाल रूढ होऊं पहात आहे ती योग्य नाहीं असं कोण म्हणेल ? परंतु यापलीकडे जाऊन पुनर्विवाहाची चाल निरंकुशपणें समाजांत रूढ झाली तर त्यांतही समाजाची हानीच आहे. कारण, त्याला वाईट बाजू आहेच. एखादी तरुण बाला, पतिनिधनामुळें प्राप्त झालेल्या दीन स्थितींत, भावी आयुष्याबद्दल निराश न होतां, प्रचलित उपलब्ध साधनांचा उपयोग करून घेऊन विद्यासंपन्न झाली, आणि विद्या व वैद्यकी यांच्या साहाय्यानं चरितार्थ व परमार्थ साधून, शांत मनानं व संन्यस्त वृत्तीनं संसारांत राहून आपल्या वृद्ध मातेची सेवा करीत आहे, हें चित्र पहा; आणि वैधव्यदुःखानं गांजल्यामुळें एखादी तरुणी उघड उघड मातेच्या उपदेशाचा धिक्कार करून, ‘ या गोमाजीशीं मी पुनर्विवाह करणार ’ असं तिला बजावून सांगण्याइतकी धीट झाली, आणि पुनर्विवाहोत्तेजक मंडळीच्या कृपाछत्राखालीं

पुनश्च सौभाग्यवती होऊन कृतकृत्य होत्साती समाजांत मिरवत आहे, हेंही चित्र पहा. या दोन चित्रांत पहिलं खास उज्ज्वल आहे. पहिलं मुकाट्यानं स्वावलंबन शिकवील, तर दुसरं परावलंबनाचं शिंग फुंकील. पहिल्यांत स्वतंत्रतेचं तेज आहे, तर दुसऱ्यांत परवशतेची भेसूर छाया पसरली आहे. एक आत्मयज्ञ तर दुसरं आत्मघात. एकांत स्वार्थत्याग तर दुसऱ्यांत स्वार्थपरायणता—

**विलासिनीः**—पण हें सर्वांनाच कसं साधेल ? जितक्या व्यक्ति तितक्या प्रकृति.

**शास्त्रीबोवाः**—हें मलाही समजतं. म्हणूनच मी म्हणतों कीं ज्या स्त्रीला वैधव्याचं खडतर व्रत झेंपणार नाहीं तिनं खुशाल पुनर्विवाह करावा. ही पुनर्विवाहाची चाल श्रीमंत लोकांत प्रथम रूढ व्हावयास पाहिजे. कारण त्यांची रहाणीच अशी कांहीं चमत्कारिक असते, कीं त्यांत तरुण विधवांना मोहजालांत फसविणारे प्रसंग हटकून उत्पन्न होतात. शिवाय श्रीमंतांच्या मुलींची नीट ओज रहात असल्यामुळें, गरिबांच्या मुलीपेक्षां त्या नीटनेटक्या व चांगल्या दिसतात. वैधव्यदुःख कंठण्याच्या मार्गांत सौंदर्य हें एक विघ्नच आहे. वैधव्यदुःखाच्या वर्षावानं श्रीमंत तरुणींच्या सौंदर्यपुष्पांतील सुगंधपराग जरी धुपून गेले, तरी तें कोमेजत नाहीं, त्याच्या पाकळ्या गळून पडत नाहींत आणि म्हणूनच त्याच्याभोंवतीं मधुपानाच्या आशेनं भ्रमर गुंजारव करीत रहाणारच. अशा वेळीं फूल गळून पडेपर्यंत जरी त्याला भ्रमर शिवले देखील नाहींत, तरी हा विचित्र देखावा पहाणाराला त्या दोहांत किती अंतर आहे याचं अनुमान करतां येत नाहीं. अशा स्थितींत पुनर्विवाहानं प्राप्त झालेल्या कृत्रिम सौभाग्याच्या वासानं एक भ्रमर जवळ केला म्हणजे बाकीचे निराश होऊन आपोआपच नाहींसे होतील. आणि त्यांचं हिडिस प्रदर्शन खास बंद पडेल. या कामीं अजून पुष्कळ जागृति व्हायला पाहिजे- आणि म्हणूनच समाजाचे तीव्र कोरडे पाठीवर उडत असतांना देखील या कार्याच्या पुरस्कर्त्यांनीं अंगाला आळेपिळे देऊं नये. ( हें बोलत असतांना एक नोकर चिठ्ठी घेऊन येतो. ती चिठ्ठी शास्त्रीबोवांना दाखविण्याविषयीं विलासिनी खूण करते. शास्त्रीबोवा ती हातांत घेऊन ) बाईसाहेब, हे विधवाविवाहप्रतिबंधनिवारक संस्थेचे चिटणीस, व वैधव्यदुःख

पंकजरुकुठारधारापातसंतप्त समाजाचे अध्यक्ष बक्षीसाहेब वकील आले आहेत. त्यांनाच आपण या बाबतींत सल्ला विचारा. बरं मी आतां रजा घेतों.

**विलासिनीः**–मीं त्यांना कांहीं कोर्टांतील कामासंबंधीं बोलावलं आहे. या इस्टेटीची आतां कांहीं तरी निराळी व्यवस्था करायचं माझ्या मनांत आलं आहे. म्हणून त्यांचा सल्ला मी विचारणार आहें.

**शास्त्रीबोवाः**–असं, असं. हो, तेंही कांहीं वावगं नाहीं.

( पडदा पडतो. )

---

# प्रवेश २ रा.

**स्थळः**–पद्माकराची खोली.

( पद्माकर व कमला बोलत बोलत प्रवेश करतात. )

**पद्माकरः**–सध्यां तुला रोजच्या रोज इकडे यायला मिळतं आहे ही एक मोठी मौजच झाली; नाहीं ! यजमानांनीं मावशींना निरोप पाठविला आहे कीं, 'तुमची मुलगी हुषार असल्यामुळें तिच्याशीं बोलण्यांत आम्हांला आनंद वाटला. लग्नाचे मुहूर्त येईपर्यंत अजून अवकाश आहे. सध्यां या गोष्टीचा आम्ही विचार करीत नाहीं. परंतु तूर्त तुम्हांला इतकंच कळवितों कीं, तुम्हीं तिच्या लग्नाची काळजी करूं नये. तिच्या योग्यतेप्रमाणें सर्व कांहीं ठीक जुळून येईल.'

**कमलाः**–आईची मला इकडे येण्याबद्दल आडकाठी नाहीं, यावरून ती याचा काय बरं अर्थ करीत असेल ?

**पद्माकरः**–त्या सरळ अर्थ करणार. तूं श्रीमंताची बायको होणार.

**कमलाः**–मग तुम्ही काय अर्थ करतां ?

**पद्माकरः**–मीं तर तुझ्याशिवाय दुसऱ्या स्त्रीशीं लग्न करायचं नाहीं, असा निश्चय केला आहे. आणखी याला माझ्या यजमानांचा पूर्ण पाठिंबा आहे. यांत काय तें समज.

**कमला**:–अहाहा ! असं होईल कां ? आईला हें आवडेल का ?

**पद्माकर**:–पण तें जाऊं दे. अजून नलिनी कां नाहीं आली ? ती तिच्या फोटोच्या दिवशींची कांहीं महत्वाची हकीकत स्वतः सांगणार आहे. काय सांगणार आहे कोण जाणे ! आमचे यजमानसाहेब ती मौज पहायला गेले होते, पण ते कांहीं बोलले नाहींत.

( नलिनी प्रवेश करते. )

**नलिनी**:–ते काय बोलतील ! मी बोलतें त्यांच्याबद्दल ?

**पद्माकर**:–काय त्यांच्याबद्दल ?

**नलिनी**:–त्या कृष्णकांतावर तुमच्या यजमानांचं प्रेम आहे का ?

**पद्माकर**:–तो एकाएकीं निघून गेल्यामुळें मेजवानींचा बेत रहित झाला. तो आल्याशिवाय कांहीं एक करायचं नाहीं असं ठरलं आहे. यावरून प्रेम आहे असं वाटतं खरं, पण तें तसं नसावं. कारण, तो गेल्यापासून त्यांच्या चेहेऱ्यावर आनंद दिसतो आहे.

**कमला**:–त्यांच्यासारख्या सात्विक म्हाताऱ्याला त्या नटव्या बढाई-खोराचा सहवास कंटाळवाणा वाटत असेल म्हणून ते आनंदी दिसतात असं मला वाटतं.

**नलिनी**:–नाहीं, यापेक्षां त्यांत कांहीं तरी अधिक आहे. माझी हकीकत तुम्हांला मीं पत्रांत कळविलीच आहे. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट मी स्वतःच सांगायला आलें आहे, त्या दिवशींचे ते विक्षिप्त साक्षीदार तेच तुमचे यजमान. हल्लीं त्यांची प्रकृति फारच सुधारली आहे. पण डोळे मात्र बिघडलेले दिसतात. कारण, त्या वेळीं त्यांनीं आरशी लाविलेली नव्हती. मला पक्कं आठवतं.

**पद्माकर**:–काय म्हणतेस तूं हें ! अग, त्यांना परदेशाहून येऊन अजून चार दोन महिने दिखील झाले नाहींत. शिवाय त्यांच्यासारखा थोर श्रीमान् गृहस्थ भुकेनं व्याकुळ होऊन भटकत फिरेल हें खरं नाहीं. तो तुझा साक्षीदार कुणी तरी निराळाच मनुष्य असेल. पण तोही मनुष्य पूर्णचंद्र शौर्यसागरांच्या-सारखा दिसत होता असं डॉ० कार्तिकेय म्हणत होते नाहीं का ?

**नलिनी**:–हो म्हणत होते. मीं कांहीं पूर्णचंद्रांना पाहिलं नव्हतं तेव्हां त्यांच्या बोलण्याचा अर्थच मला कळला नाहीं.

**पद्माकरः**–माझे पूर्वीचे धनी, तुझा तो साक्षीदार, आणि हल्लींचे माझे यजमान या तीन निरनिराळ्या व्यक्ति नसून फक्त दोनच आहेत असाच तुझ्या म्हणण्याचा अर्थ झाला.—पण त्यांत काय अनर्थ भरला आहे ! ( स्वगत ) जीवा ! आतां कां व्यर्थ धडपडतोस ?

**नलिनी व कमलाः**–असं झालंयू तरी काय ?

**पद्माकरः**–सर्व कांहीं सांगतों.

**नलिनीः**–माझ्या बातमीनं तुम्हांला एवढं दुःख होईल हें जर मला ठाऊक असतं तर मी मुळींच बोललें नसतें तरी बरं झालं असतं.

**पद्माकरः**–छे छे ! तसं मुळींच नाहीं. पण ज्या वेळीं तूं पूर्णचंद्रांचं नांव घेतलंस त्या वेळीं आमचे यजमान रागावलेले दिसले का ?

**नलिनीः**–मी ज्या वेळीं बोलत होतें त्या वेळीं ते आनंद व दुःख दोन्ही दाबून धरीत असावं असं दिसलं. पण त्यांच्या सुस्काऱ्यावरून त्यांना दुःखच अधिक झालं असावं, असं मला वाटलं. शेवटीं आश्चर्याच्या वाटेनं आनंदाला मोकळं करून त्यांनीं गंभीरपणानं आमचा निरोप घेतला.

**पद्माकरः**–नलिनी, तुझी पहिल्या दिवशींची हकीकत ऐकल्यापासून पूर्णचंद्र व तो तुझा साक्षीदार या दोन्ही व्यक्ति एकच आहेत असा माझा दृढ समज झाला होता, आणि आज तुझा तो साक्षीदार आणि चंद्रगुप्त श्रीसागर या दोन्ही व्यक्ति एकच आहेत असं तूं खात्रीपूर्वक म्हणतेस. तेव्हां पूर्णचंद्र आणि चंद्रगुप्त हे दोन्ही एकच आहेत. हें उघड नाहीं का ?

**कमलाः**–पूर्णचंद्र इहलोक सोडून गेलेच नाहींत या कल्पनेनं तुम्हांला पछाडल्यामुळें तुम्ही त्याच दिशेनं विचार करतां म्हणून तुम्हांला असं वाटतं.

**पद्माकरः**–अशा वादानं याचा कांहींच निकाल लागणार नाहीं. ( आठवलेंसें करून ) पण नलिनी, तूं आमच्या यजमानांचे आभार मानायला येणार आहेस ना ?

**नलिनीः**–हो येणार आहे तर ! संसार बिघडला म्हणून काय झालं ? तिकडच्या सहवासाचं सुख तरी त्यांच्यामुळेंच मला मिळालं, तेव्हां आभार मानलेच पाहिजेत.

**पद्माकरः**–त्या वेळीं त्यांना त्या साक्षीची आठवण दे. आणि ते जर

तीं गोष्ट नाकबूल करतील तर तुम्ही पूर्णचंद्रच आहां किंवा नाहीं असा तें पत्र दाखवून मी त्यांना प्रत्यक्ष प्रश्नच विचारतों. म्हणजे कांहीं तरी खुलासा होईल. या बाबतींत माझ्या एकाच शंकेचं समाधान होत नाहीं.

**कमला**:–ती कोणती ?

**पद्माकर**:–तेच जर पूर्णचंद्र असतील तर आपल्या घरीं कां गेले नाहींत ? एवढीच शंका आली म्हणजे बाकीचे सर्व विचार जागच्याजागींच जिरतात. तरी पण मधांची युक्ति करून पहायचीच. ( जातात. )

---

# प्रवेश ३ रा.

**पूर्णचंद्र**:–अजून थोडा अवकाश आहे. कृष्णकांत गेल्यापासून विलासिनीच्या वृत्तींत बराच फरक पडला आहे. माझ्याशिवाय तिला आतां चैन पडत नाहीं. मीही हळुहळू कामीजनांप्रमाणें आपल्या मनावरचे पडदे दूर करून तिच्याबद्दल उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या विचारतरंगाचे देखावे तिला दाखवीत आहें. पण आज हें प्रकरण निकालाला लावलंच पाहिजे. पण हा विषय काढावा कसा ? ( विचार करून ) हें पत्र तिला दाखवावं का ? ती कृष्णकांताला आपला भाऊ म्हणते नाहीं का ? तेव्हां तिला हें पत्र झोंबणारच. कृष्णकांतानं मला ही गुप्त गोष्ट कळविली हें तिला बरं वाटणार नाहीं. ती त्याला खास शिव्या देईल. आणि त्यांचाच फायदा घेऊन आपला पुढचा कार्यभाग केला पाहिजे. असो. कितीही बेत केले तरी लग्नघटिका जवळ आली म्हणजे धांदल व्हायचीच. मग उगाच विचार तरी कशाला हवा ? ( जातो. )

( बागेंत विलासिनी आपल्याशीं बोलत हिंडत आहे असा पडदा उघडतो. )

**विलासिनी**:–कालचं नाटक पाहिल्यामुळें, माझ्या मनाला कां बरं अशी हुरहुर लागली आहे ! राणीनं खुषीनं पुनर्विवाह केला का तिच्या दिरानं तिला मोहिनी घातली, याचा त्यांत कांहींच उलगडा होत नाहीं. पण तिला तिच्या

स्थितीबद्दल वाईट मात्र वाटत नव्हतं खास. तिच्या बरोबरीचा मुलगा जिवंत असतांना देखील पुनर्विवाह करून तिला राजपदावर बसतां आलं—किंव राजपदावरून खालीं उतरावं लागलं नाहीं हें काय थोडं झालं! पण तिला दुसऱ्या कुणीं जरी उघड नावं ठेवलीं नाहींत, तरी तिच्या मुलानं 'थेरडीं माणसंच जर असं करूं लागलीं तर ज्यांचं तारुण्य मुसमुसतं आहे त्या तरुणींचा त्या ठिकाणीं काय पाड' वगैरे शब्दांनीं हिणवावं याचा अर्थच मला समजत नाहीं. ती कांहीं कामानं मोहित झाली नव्हती; आणि मीही झालें नाहीं. तिचं वय झालं होतं, तर मीं ज्यांची निवड केली आहे त्यांचंही वय झालं आहे. शिवाय ते खीद्वेष्टे आहेत. तेव्हां माझ्या बाबतींत नांव ठेवायला जागाच नाहीं. शिवाय, शास्त्रीबोवा व बक्षीसाहेब अनुकूल आहेतच. तेव्हां पुढल्या पायरीवर पाय ठेवायला कांहींच हरकत नाहीं. पण अजून चंद्रगुप्त कां बरं आले नाहींत? त्यांची नेहमींची वेळ झाली. कदाचित् काल नाटकाला आले होते म्हणून त्यांची प्रकृति तर बिघडली नसेल! पण त्यांची प्रकृति नाजूक नाहीं. त्या आरशीमुळें आणि पांढऱ्या केंसांमुळें ते वृद्ध दिसतात. पण त्यांच्या शरीरावर तरुणपणचं तेज कायम आहे. अजून एकदिखील खुरकुती तोंडावर दिसत नाहीं. (विचार करून) तरुणपणीं आपणांला वैधव्य आलं खरं. मग—पण, या कृष्णकांताचीं सारखीं पत्रावर पत्रं येत आहेत. तो तर अगदीं बेहोष होऊन गेला आहे. त्याच्यावर माझं प्रेम आहे. पण लौकिकाकरितां मला त्याच्याशीं पुनर्विवाह करितां येत नाहीं. कारण, अनोळखी पुरुषाशीं पुनर्विवाह न करितां जर ओळखीच्या पुरुषाशीं केला तर जुन्यापुराण्या संबंधाच्या कुकल्पनांचं पेव फुटलंच म्हणून समजावं. आज कांहींहि होवो ते आल्याबरोबर त्यांच्याजवळ ही गोष्ट काढायची. इतकंच नव्हे तर हरप्रयत्न करून त्यांना आपल्याशीं पुनर्विवाह करण्यास तयार करायचंच. पण हें करतांना अधीरपणा न दाखवितां केवळ निरुपाय म्हणून आपण कबूल आहों असं त्यांना भासलंच पाहिजे. पण हे पहा, चंद्रगुप्त इकडे येत आहेत. (तो येतो.) आज इकडे यायला उशीरसा केला? इतकं वय झालं तरी आपली काम करण्याची हास आपल्या चेहेऱ्यावरील तुकतुकीप्रमाणें कायम आहे. म्हातारपणापर्यंत सर्व शरीर मजबूत ठेवण्याची कला आपल्याला चांगलीच साधली आहे. पण गडे या डोळ्यांनीं आणि केंसांनीं आपल्याला चांगलंच फसविलं.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) तुला मात्र त्यांनीं चांगलंच चकवलं आहे, छान तोंडघशीं पाडलं आहे. ( उघड ) कामामुळें डोळे बिघडले आणि काळजीनं केंस पांढरे झाले. माझं शरीर सदृढ आहे असं दिसतं, पण तें वास्तविक तसं नाहीं. आज कृष्णकांताचं पत्र आलं आहे. एकदां वाच तर खरं. ( तिच्यापुढें पत्र करतो. )

**विलासिनीः**–( हंसत पण तिरस्कारानें ) मला काय करायचं त्यांचं पत्र वाचून ?

**पूर्णचंद्रः**–बरं, मी वाचतों; तूं ऐकशील तर खरं ?

**विलासिनीः**–आपण वाचतां म्हणूनच ऐकेन; नाहीं तर मी त्यांच्या पत्राकडे ढुंकूनसुद्धां पाहिलं नसतं.

**पूर्णचंद्रः**–हं, कां बरं तुझा त्याच्यावर एवढा राग ? त्यानं तर पत्रांत तुझ्याबद्दल किती प्रेमळ भाषा वापरली आहे. पहा तर खरी. ( पत्र वाचतो. ) प्रियमित्रा, माझा काका मरणाच्या द्वारीं पडला आहे. पण आंत शिरण्याला स्वारी अजून कां कूं करीत आहे. त्याच्या गमजा आतां एक दिवसापेक्षां जास्त वेळ चालायच्या नाहींत असं डॉक्टरचं मत आहे. पण न जाणों कांहीं तरी विपरीत कार होऊन तो अधिक दिवस जगला तर मग मी कुसुमपुरास तावडतोब निघून येईन. कारण, विलासिनी दूर असल्यामुळें मला इथें एक क्षणभर चैन पडत नाहीं. आपण तिची काळजी घेण्याला समर्थ आहां हें जरी मला माहीत आहे तरी माझ्या मनाची हुरहुर कांहीं केल्यानं थांबत नाहीं.

**विलासिनीः**–( हंसत व ऐटींत ) हें पत्र आपण मला दाखविलं हे आपले माझ्यावर फारच उपकार आहेत. या पत्रांत कृष्णकांत भाऊजींच्या शहाणपणाचा अगदीं कळस झाला आहे. त्यांची अक्कल इतकी कशी वहावली याचंच मला आश्चर्य वाटतं. ते मला आपली बहीण मानितात. आणि एखाद्या पशुतुल्य मनुष्याप्रमाणें बहिणीशीं–नकोग बाई–त्याचा उच्चार देखील नको. अंगावर कसे शहारे येतात. उगीच त्यांना फाजील सवलत दिली.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) डाव रंगांत तर आला, आतां लवकर मोहरीं सारलीं पाहिजेत. विलासिनी, कृष्णकांतांनीं अलीकडे बरेच दिवस बहिणीचं नातं सोडून निराळ्याच नात्याचे विचार चालविले आहेत.

**विलासिनीः**–( हंसून ) खरंच का हें ! मग ते साफ तोंडघशीं पडणार. ते अगदीं इतके अविचारी बनले अं ! फारच वाईट. काय म्हणावं त्यांना ! माझ्याशीं लग्न करण्याची हांव धरतात अं !

**पूर्णचंद्रः**–असं मला वाटतं. निदान ते माझ्याजवळ असं बोलले खरे.

**विलासिनीः**–बरं झालं, आपण मला सांगितलं. पण आपल्याला असं वाटतं, का मी त्यांच्याशीं लग्न करीन म्हणून ?

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) असत्य भाषणाचा प्रवाह कसा फों फों करीत चालला आहे. त्यांत कृष्णकांताचे मुके, मिठ्या, कुरवाळणं, लाड सर्व कांहीं वाहून चाललं आहे. यांपैकीं एकही माझ्यासमोर थांबणार नाहीं. इनं माझ्या हातावर तुरी दिल्या. आणि त्याच्या कपाळीं वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. शाबास, आम्हां दोघांस एकाच दावणींत बांधलंस. यांत कृष्णकांताचा मीं निम्मा अधिक सूड तर उगवलाच. सुडाचा पूर्वभाग तर संपलाच म्हणायचा. आतां लवकर उत्तरभाग आटोपून या अमंगल कार्याची मंगल कार्याच्या समारंभानं उत्तरक्रिया करावी. म्हणजे आपल्याला मरायला तरी मोकळीक होईल.

**विलासिनीः**–या प्रश्नाचं उत्तर द्यायला इतका का विचार करावा लागतो ? पण काय, खरंच आपल्याला वाटतं कीं मी त्यांच्या म्हणण्याला कबूल होईन म्हणून ?

**पूर्णचंद्रः**–होशील बुवा कबूल. असं वाटतं खरं ! आणि हें अगदीं स्वाभाविक नाहीं का ? तो तरुण आहे, सुंदर आहे. त्याच्या चुलत्याच्या मृत्यूनंतर त्याला संपत्ती मिळणार आहे. तुला तरी याहून अधिक काय पाहिजे. आणि त्यांतून तो तुझ्या नवऱ्याचा स्नेही. मग काय दुधांत साखर पडल्यासारखं झालं.

**विलासिनीः**–( जोरानें ) ह्याचसाठीं मी त्यांच्याशीं पुनर्विवाह करणार नाहीं. माझं जरी त्यांच्यावर प्रेम असलं–सध्यां तर तें मुळींच नाहीं म्हणा–समजा असतं तरी देखील मी ही गोष्ट करायला मुळींच कबूल होणार नाहीं. लोक काय म्हणतील ? जिकडे तिकडे कुचकुच सुरू होईल.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) खुनाळीं वाचा फुटली. ( उघड ) तें कसं काय बुवा ?

**विलासिनी**:–लोक म्हणतील,–माझी पक्की खात्री आहे,–अगदीं खास म्हणतील कीं, माझे पति होते त्या वेळेपासून माझा कृष्णकांताशीं कांहीं तरी संबंध होता, म्हणूनच हा पुनर्विवाह जमला, आणि असली साफ खोटी निंदा माझ्यासारख्या कुलीन स्त्रीला कशी सहन होईल ?

**पूर्णचंद्र**:–( स्वगत ) फाजील शहाणपणानं ही आपलं अंतःकरण उघड करून दाखवीत आहे. ( उघड ) शुद्ध आचरणाला लोकनिंदेची बाधा कधींच होणार नाहीं, त्याचा नेहमीं जयच व्हायचा. आणि त्यांतून मी जवळ असल्यावर कोण तुझी निंदा करील ? पण कृष्णकांतावर जर खरंच तुझं प्रेम नसेल तर—

**विलासिनी**:–खरोखर त्यांच्यावर माझं प्रेम नाहीं. ते अगदीं तिरसट, हिरवट, हलकट आहेत. ते अतिशय दारू पितात. मला तर त्यांची भीतच वाटते. आपण जवळ असलां म्हणजे मला कुणाचं भय नाहीं म्हणा ! पण आपण नेहमीं कसे माझ्या—

**पूर्णचंद्र**:–कां नाहीं राहणार ! तें केवळ तुझ्या मर्जीवर अवलंबून आहे.

**विलासिनी**:–( जवळ येऊन ) काय माझ्या मर्जीवर ! काय म्हणतां तुम्ही हें ? मी तर अगदीं गोंधळून गेलें आहे. बोला ! बोला ! काय तें.

**पूर्णचंद्र**:–माझं म्हणणं अगदीं सरळ आहे, पण अशी अधीर होऊं नको. तुला मी नेहमीं जवळ पाहिजे ना ? मग काय, तूं माझी पत्नी हो म्हणजे झालं.

**विलासिनी**:–चंद्रगुप्तमहाराज ! आपण काय—

**पूर्णचंद्र**:–मी समजलों तूं काय म्हणणार तें. आपल्या दोघांच्या वयांत फार अंतर आहे, मी बुढ्ढा आहें, माझी प्रकृति अशक्त आहे आणि माझा चेहराही चांगला नाहीं. पण त्याला माझा काय उपाय ? त्रास आणि तीव्र निराशा यांचा हा परिणाम आहे. तरी माझ्याजवळ अपार संपत्ति आहे, आणि माझा लौकिक चांगला आहे. तुझ्या सद्गुणांचं चीज व्हावं अशी माझी फार इच्छा आहे. तुला मी वाटेल तें देईन. पण तरुणपणचं प्रेम मात्र आतां मजजवळ नाहीं. माझ्या रक्तांत आतां गारठा शिरला आहे आणि माझी नाडी आतां थंड वाहते. पण जें माझ्या स्वाधीन आहे तें सारं तुझं आहे.

**विलासिनी**:–तुम्ही माझ्याबरोबर लग्न करायला कबूल आहांत पण

माझ्यावर तुमचं प्रेम नाहीं असंच तुमचं म्हणणं आहे ना ! ( जवळ जाऊन प्रेमानें ) पण माझं तुमच्यावर निष्कपट प्रेम आहे.

**पूर्णचंद्रः**–काय ! तुझं माझ्यावर प्रेम आहे ? मला हें मुळींच खरं वाटत नाहीं.

**विलासिनीः**–पण मी तें खरं आहे असं म्हणतें. आजपर्यंत तुमच्याशिवाय जगांतील कोणत्याही पुरुषावर मीं कधींही इतकं प्रेम केलं नाहीं.

**पूर्णचंद्रः**–तर मग तूं माझी अर्धांगी होशील ?

**विलासिनीः**–कां नाहीं होणार ? आणि आपली बायको होईन इतकंच नव्हे, तर मी आपल्याला माझ्यावर अतिशय प्रेम करायला लावीन. ( ती चंद्रगुप्ताला मिठी घालते व त्याच स्थितींत कोचावर बसून. )

**पूर्णचंद्रः**–तुझं माझ्यावर खरंच प्रेम आहे ना ?

**विलासिनीः**–अगदीं खरंच आहे.

**पूर्णचंद्रः**–आजपर्यंत माझ्याशिवाय सर्व पुरुष तुला बापासारखे वंद्य आहेत ?

**विलासिनीः**–होय, आहेत.

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांत तुला आवडत नव्हता ? त्याच्यावर तूं कधींही प्रेम केलं नाहींस ?

**विलासिनीः**–कधीं देखील नाहीं.

**पूर्णचंद्रः**–त्यानं माझ्याप्रमाणें तुला असं कधीं आलिंगन दिलं नाहीं ?

**विलासिनीः**–एकदां दिखील नाहीं; आणि तो कोण माझा ? (दचकून) तुम्ही कृष्णकांताना ही बातमी इतक्यांत नाहींना कळविणार ?

**पूर्णचंद्रः**–छे, ते इथें आल्याशिवाय कोण कळवितो ? नाहीं तर ती स्वारी एकदम इकडे निघून यायची. ( स्वगत ) आपला प्रत्यक्ष नवरा आपल्याजवळ आहे असं जर तिला कळलं तर अशी हंसेल कां ? असं मला आलिंगन देईल कां ?

**विलासिनीः**–माझी एक थोडीशी हौस पुरवायची होती !

**पूर्णचंद्रः**–बोल, तुझा हुकूम होऊं दे, कीं त्याची अम्मलबजावणी झालीच म्हणून समज.

**विलासिनीः**–ही आरशी तेवढी काढून टाकायची होती. मला आपले डोळे पहायचे आहेत.

**पूर्णचंद्रः**—काय पाहिजे तें दुसरं माग. पण याचं नांवसुद्धां काढूं नको. माझ्या डोळ्यांना प्रकाश मुळींच सहन होत नाहीं. मीं आरशी काढली तर पुढें कित्येक तासपर्यंत मला मरणप्राय वेदना होतील. सध्यां मी आहें असाच मला पत्कर, मी पुढें कधीं तरी तुझी हौस पुरवीन.

**विलासिनीः**—केव्हां बरं ?

**पूर्णचंद्रः**—आपल्या लग्नाच्या दिवशीं रात्रीं.

**विलासिनीः**—मग त्याला अजून फारच अवकाश आहे.

**पूर्णचंद्रः**—फार कसचा आलाय्. हें पहा, सध्यां डिसेंबर आहे. इंग्रजी पाडव्याच्या दिवशीं आपण लग्नाचा बेत ठरवूं. लोकांना त्या वेळीं सुट्टीही असते, आणि पुनर्विवाहाला तिथींच्यापेक्षां तारखेचे मुहूर्त चांगले. तुझी कांहीं हरकत नाहींना ?

**विलासिनीः**—पण, जाऊन अजून चार महिने दिखील झाले नाहींत. आणि शशी तर नुकाच गेला.

**पूर्णचंद्रः**—म्हणून तर या वेळीं तुला दुसरं कोणी तरी माणूस जवळ पाहिजे. लोकनिंदेला तोंड द्यायला मी खंबीर आहें.

**विलासिनीः**—मी कांहीं आपल्याबाहेर नाहीं. आपण स्त्रीद्वेष्टे म्हणून कुसुमपुरांत प्रसिद्ध आहांत. म्हणून तम्हींच जर कामीजनाप्रमाणें अधीर झालां आहां तर माझी कांहीं ना नाहीं.

**पूर्णचंद्रः**—पण तुला हें ठाऊक आहेच कीं, मी कांहीं कामानं मोहीत झालों नाहीं. पण लग्नाकरितां अधिर झालों आहें. इतकंच काय, पण या विचारानं अगदीं मूढ बनलों आहें. माझ्या मनोविकारांना काय नांव द्यावं हेंच मला कळत नाहीं. तुझ्यावर माझी पूर्ण सत्ता असावी असं मला वाटतं. याशिवाय मला दुसरं कांहीं एक नको.—पण विलासिनी, तूं नीट विचार कर, रोगांनीं ज्याचं शरिर आंतून पोखरलं आहे, मानसिक व्यथेमुळें ज्याचा स्वभाव तिरसट बनला आहे, अशा एका वृद्ध अरसिक मनुष्याला तूं आपला पति म्हणून कबूल करीत आहेस. सावध हो, अजून नीट परीक्षा कर. माझा अलीकडचा फोटो मजजवळ नाहीं. पण आरशीशिवाय तरुणपणीं काढलेला माझा फोटो

मीं तुला देण्याकरितां आणला आहे. त्यावरून माझ्या स्वरूपाची तुला नीट ओळख पडेल. हा घे फोटो. ( देतो. )

**विलासिनीः**–( दचकून घाबरत ) काय ! हा तुमचा फोटो ! नाहीं, त्यांचा आहे ! पण तुमच्याजवळ कसा आला !

**पूर्णचंद्रः**–नाहीं, नीट पहा. तो माझाच आहे. तुझ्या नवऱ्याच्या फोटोला तूं या चार सहा महिन्यांत खास विसरली असशील.

**विलासिनीः**–नाहीं, नाहीं. हा त्यांचा फोटो आहे. याच्याखालीं त्यांचं नांव दिखील आहे.

**पूर्णचंद्रः**–( नांव पाहून ) विलासिनी, तुला तुझ्या नवऱ्याची आठवण काढून दुःख दिलं याबद्दल मला वाईट वाटतं. पण माझ्या तरुणपणच्या फोटोंत आणि या फोटोंत इतकं विलक्षण साम्य आहे कीं, जो फरक भासतो, तो फक्त नांवाचा आहे. याला मी काय करूं ! घाईत माझ्याऐवजीं त्यांचा फोटो मी चुकून आणला याबद्दल मला क्षमा कर.

**विलासिनीः**–( घाबरत ) आणि हल्लींच्या स्थितींत जर तुमचा आरशी-शिवाय फोटो काढला आणि त्यांत तुमच्या केंसांची ओळख बुजविली. (स्वगत) आणि मग ! मग काय ! ते ! तुम्ही ! दोन्ही एकच ! हो, एकच ! ( भिते व तोंड झांकून घेते. )

**पूर्णचंद्रः**–अरेरे ! काय झालं ! तूं असं काय करतेस !

**विलासिनीः**–( धीटपणा धरून ) कांहीं नाहीं. डोळ्यापुढें अंधेरी आली. पण आपण शौर्यसागरांचे कोणी नातेवाईक आहांत का ! आतां मला तुम्ही थेट माझ्या पतीसारखे वाटलां आणि त्यामुळें त्यांचं भूत पाहि-ल्याचा मला भास झाला.

**पूर्णचंद्रः**–तूं आतां अगदीं थकली आहेस, विनाकारण कल्पनेच्या मागें कां धांवतेस ! माझं शौर्यसागराशीं कांहीं नातं नाहीं. पण त्यांचे कांहीं गुण माझ्या अंगीं आहेत. पुष्कळ माणसें अशीं सारखीं असतात. तूं अशा भल-त्याच कल्पना काढूं नकोस. तूं स्वस्थ नीज म्हणजे तुला बरं वाटेल.

**विलासिनीः**–मला आतां बरं वाटतं. मघांशीं खरंच तुमच्याकडे पाहून मी भ्यालें.

**पूर्णचंद्रः**–भावी नवऱ्याबद्दल भीति वाटणं कांहीं चांगलं चिन्ह नाहीं. अजून वेळ आहे, सावध हो.

**विलासिनीः**–हें काय भलतंच बोलावं बरं.

**पूर्णचंद्रः**–ठरलं तर मग हें कायम, अगदीं नक्की. मग मी तुला सांगतों, तूं असं कर. कृष्णकांत पुढें आपल्या पत्रांत काय म्हणतो कीं २।३ दिवसांत मी परत येईन.

**विलासिनीः**–मला काय त्यांच्या येण्याशीं करायचं आहे!

**पूर्णचंद्रः**–आहे तर. तो असं लिहितो कीं, मला पाहून विलासिनीला फार आनंद होईल. तूं माझी बायको होणार हें पाहून जर त्याला वाईट वाटेल, अशी तुझी जर खात्री असेल, आणि तो बेहोष होऊन तुला त्रास देईल अशी जर तुला भीति वाटत असेल, तर तूं दुसऱ्या एखाद्या गांवीं चार दिवस रहावयास गेलीस म्हणजे बरं होईल. तूं कांहीं त्याच्या प्रेमाची वाढ केली नाहींस, तूं होऊन कधींही त्याच्याशीं सलगी केली नाहींस. पण त्याचं ज्याअर्थीं तुझ्यावर प्रेम आहे त्याअर्थीं त्याला राग येईलच. कारण, तुझ्यासारख्या सुंदर तरुणीच्या कायमच्या वियोगाला पात्र होणे हें कांहीं लहानसहान दुःख नव्हे हें मी जाणतों. तेव्हां त्याचा राग शांत होईपर्यंत दूर रहावं हें बरं. तुला कसं काय वाटतं?

**विलासिनीः**–आपण म्हणतां तें खरं आहे. कृष्णकांत रागीट आणि माथेफिरू आहे. तेव्हां आपली परवानगी घेऊन मी आजोळीं जातें. तिथें आमच्या घरीं नेहमीं पूजाअर्चा चालते, त्यांत माझं मन तल्लीन होईल. मी परमेश्वराची रोज प्रार्थना करीत जाईन. पुनर्विवाह करून नव्या आयुष्याला सुरुवात करण्याच्या आधीं निवांत ठिकाणीं थोडासा एकांतवास मिळाला म्हणजे मनाला शांति मिळून देवाकडेही लक्ष लागेल, आणि त्यामुळें पूर्वीच्या आयुष्यांतील सर्व बरीं वाईट पापं क्षालन होतील. नव्या संसाराकरितां ही सारी तयारी बरी आहेना?

**पूर्णचंद्रः**–हो. हो. बरी म्हणजे काय विचारावं! याच्यापेक्षां उत्तम तयारी ती कोणती? पुढें आपल्यावर काय वेळ येणार आहे हें कोणालाच कळत नाहीं. तेव्हां बऱ्यावाईट सर्व प्रसंगाकरितां सर्व प्राणिमात्रांनीं

नेहमीं तयार राहणं हाच खरा शहाणपणाचा मार्ग आहे. अजाणपणानं आपल्या हातून घडलेल्या पापांचा मळ धुऊन मन स्वच्छ करण्याकरितां परमेश्वराची प्रार्थना उपयोगी पडते. पण आधीं पश्चात्तापानं मन जाळलं पाहिजे. या मनोभूमींत प्रार्थनेचा वृक्ष उगवून त्याला मधुर फळं येण्याकरितां तिला पापकर्मांनीं आलेला घट्टपणा निग्रहानं खणून काढला पाहिजे. निंद्य आचरणाबद्दल उत्पन्न झालेली चीड हेंच खत नेहमीं तींत घातलं पाहिजे; सुविचाराचं आळं करून एकनिष्ठेचं पाणी त्यांत नित्य ओतलं पाहिजे, असं केलं तरच प्रार्थना सफल होईल हें ध्यानांत ठेव. भक्तीचा जिव्हाळा तुझ्यांत आहे हें पाहून मला फार आनंद वाटतो. कृष्णकांताचा राग थंड झाल्यावर मी तुला येऊन भेटेन. तोंपर्यंत तूं आपल्या मृतपतीच्या आत्म्याला आणि भावी पतीच्या मनाला शांति देण्याविषयीं करुणा भाक. तुझ्यासारख्या सुकुमार, शुद्ध, सुंदर, सुशील, साध्वीची प्रार्थना परमेश्वराच्या दरबारांत आधीं रुजू होइल. कृष्णकांताची मुळींच तुला काळजी नको तें काम तूं माझ्यावर सोंपीव. तूं कांहीं त्याची आशा जागृत केली नाहींस, मग त्याला बोलायला काय तोंड आहे!

**विलासिनी**:–तें सारं खरं. पण म्हणतात ना, मनासारखा वैरी कोणी नाहीं. जायच्यापूर्वीं मला एकदां आपल्याला कडकडून भेटूं द्या. ( ती त्याला आलिंगन देते. )

**पूर्णचंद्र**:–( स्वगत ) या आलिंगनानं माझ्या अंगाची आग होत आहे. नाहीं. सोसत नाहीं. ( तिला ढकलून देतो. ती खुर्चीला धरते व हंसते. तो शुद्धीवर येतो. (उघड) मी चुकलों, मला क्षमा कर मी अगदींच विसरलों का–

**विलासिनी**:–( हंसत ) नको, कांहीं क्षमा मागायला नको. आणि माफीच हवी असली तर ती पूर्णपणें दिली आहे. झालंना आतां. ( हंसते ).

**पूर्णचंद्र**:–( तिच्याजवळ जाऊन ) हें पहा तूं अशी हंसत जाऊं नकोस, या हंसण्यानं माझ्या मेंदूला धक्का पोहोंचतो. तें माझ्या काळजाला झोंबतं. मी तरुण असतांना माझं एका स्त्रीवर प्रेम बसलं होतं. ती तुझ्यासारखी नव्हती. कारण, खोटं बोलणं हा तिच्या हातचा मळ होता. चुकून देखील ती खरं बोलत नसे. असत्य भाषणांचा जिवंत झराच तो! मी काय म्हणतों हें तुझ्या ध्यानांत आलं कां? तिच्यांत आणि तुझ्यांत कांहीं सारखेपणा नव्हता, पण ती अशींच तुझ्यासारखी माझ्याकडे पाहून हंसे. तिनं माझ्या आयुष्याची

नासाडी करून टाकिली. माझ्या काळजाचे तुकडे केले. झालं, गेलं, सरलं तें. त्याचं काय आतां ! मी तिचा विचार देखील करीत नाहीं. पण तुझ्या हंसण्यानं तिची मला आठवण झाली. तुला आपली पूर्वीची हकीकत सांगितली; ती तूं विसरून जा आणि मला क्षमा कर. तुला आतां लवकरच निघालं पाहिजे. तुझं कांहीं काम असेल तर मला हुकूम कर. मी तुझ्या सेवेला तयार आहें.

**विलासिनीः**–( त्याच्या पायां पडून ) मींच आपली सेवा करावी असा माझा खरा धर्म आहे. या चरणाची दासी त्यांना नमस्कार करीत आहे.

**पूर्णचंद्रः**–निष्पाप मन, जागृत सदसद्विवेकबुद्धि आणि पतिप्रेम हीं तुझ्याजवळ नेहमीं राहोत. परमेश्वर तुला सुखी राखो. जा आतां. ( ती जाते. ) या जन्मीं नव्हे पुढल्या, कारण या जन्मीं केलेल्या पापाचीं फळं याच जन्मीं तुला भोगायला लावण्याकरितां परमेश्वरानं माझी नेमणूक केली आहे. त्याच्या इच्छेच्या आड कोण येणार आहे ! सुडाच्या झाडावरचीं फळं पिकून त्यांचा घमघमाट चोहींकडे तर सुटला. आतां खालीं पडण्याचा अवकाश कीं खालींच म्हणून समजा.

---

## प्रवेश ४ था.

**स्थळः**– पूर्णचंद्राच्या घरचा दिवाणखाना.

( पूर्णचंद्र व कृष्णकांत हातांत हात घालून प्रवेश करतात. )

**कृष्णकांतः**–अहाहा मला किती आनंद होत आहे म्हणून सांगूं ! आपली प्रकृति ठीक आहेना ? तुमचा चेहरा आज मला अगदीं प्रफुल्लित दिसतो आहे.

**पूर्णचंद्रः**–प्रकृति ठीक आहेच. आणि तुम्ही माझ्या विनंतीला मान देऊन परस्पर इकडे आलां त्यामुळें मी कृतकृत्य झालों असं मला वाटतं आहे.

**कृष्णकांतः**–पण मी परस्पर इकडे आल्यानं माझ्या या पोषाखामुळें मी चार मंडळींत यायला अगदींच अयोग्य आहें. माझ्या ट्रंकमध्यें माझे कपडे आहेत. मी आधीं कपडे बदलतों.

**पूर्णचंद्रः**—बदलाल हो; पण आधीं श्रमपरिहारार्थ थोडेसें आनंदतीर्थ तर घ्याल. अजून पुष्कळ अवकाश आहे. दोस्त, आज तुमचं स्वागत करायला मला अतिशय आनंद वाटतो आहे. मीं तुमच्या आगमनाविषयीं अगदीं अधीर झालों होतों. जवळ जवळ—

**कृष्णकांतः**—विलासिनीइतके असंच कीं नाहीं! अहाहा, मी तिला केव्हां भेटेन असं मला झालं आहे. माझ्या मनाप्रमाणें वागलों असतों तर आधीं मी शौर्यसागरांच्या बंगल्यावर गेलों असतों. पण तुम्हांला वचन दिलं होतं. शिवाय दिवसापेक्षां रात्रीचा समय मला विलासिनीच्या भेटीला अधिक योग्य वाटला.

**पूर्णचंद्रः**—असं तर खरंच. बायका दिवसांपेक्षां रात्रींच तारकांप्रमाणें जास्त चमकतात. काय सांगूं तुम्हांला! ती आहे तशी आहे. तिचं रमणीय मुखकमल अगदीं टवटवीत आहे. शुद्ध आणि निष्कलंक आचरणाचं हें फल आहे. माझ्याशिवाय दुसरा कोणताही पुरुष तिला तुम्ही गेल्यापासून भेटला नाहीं हें ऐकून तुम्हांला बरं वाटेल नाहीं?

**कृष्णकांतः**—हें काय विचारतां? पण आज येणार तरी कोण कोण आहेत? खरंच सांगूं का तुम्हांला, या वेळीं प्रेमाच्या भाषणापेक्षां मला भोजनाचंच प्रेम अधिक आलं आहे.

**पूर्णचंद्रः**—चांगलीं माणसं बायकांच्या प्रेमापेक्षां भोजनालाच अधिक महत्व देतात. आज प्रो. ब्रह्मगिरी येणार आहेत.

**कृष्णकांतः**—असं का! त्यांची मोठेपणाची व्याख्या फार विचित्र आहे. त्यांनीं बरं कबूल केलं जेवायला यायचं.

**पूर्णचंद्रः**—शिवाय गोपाळदास गुजर, धरणीधर, डॉ. करुणेश, रणसिंग फौजदार.

**कृष्णकांतः**—हें धेंड कशाला हवं होतं?

**पूर्णचंद्रः**—वा! तुम्हींच तर यांची माझी ओळख करून दिली, हे तर तुमचे दोस्त. आणखी मि. गरूड, मि. गदाधर वगैरे मंडळी आहेत.

**कृष्णकांतः**—या गदाधराला कशाला बोलावलं! हा दारू पिऊन इतका बेहोष होतो कीं, त्या तारेंत एखाद्याचा खून करायला देखील प्रवृत्त होईल.

**पूर्णचंद्रः**—या कामांत तुम्हीच त्यांचे गुरु आहांत.

**कृष्णकांतः**–पण मी बेहोष होत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–आपले व्यवसायबंधु श्रीरंगनाथही यायचे आहेत.

**कृष्णकांतः**–हं, एक वेळ होती त्याचा हेवा करण्याची; आतां वाटेल त्यानं चितारी व्हावं. मीं तर कलमाला आणि रंगाच्या पेल्याला शेवटचा राम राम ठोकला आहे. बरं पण आणखी कोण येणार आहेत ?

**पूर्णचंद्रः**–आतां एक नांव सांगितलं म्हणजे सर्व संपलींच म्हणायचीं. तें नांव म्हणजे आमचे दिलदार दोस्त कृष्णकांत यांचं आहे.

**कृष्णकांतः**–वः ! अशी मंडळी, आणि तुमच्यासारखा आदरातिथ्य करणारा ! मग काय आज रंगच उडणार आहे. पण सरदारसाहेब, खरंच सांगा कीं केवळ माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्याला मेजवानी देण्याकरितां आपण हा योग जुळवून आणला ?

**पूर्णचंद्रः**–अगदीं केवळ एवढ्याचकरितां.

**कृष्णकांतः**–पण माझ्यावर आपली एवढी मर्जी कां म्हणून ?

**पूर्णचंद्रः**–मीच आपल्यावर प्रेम करतों असं नाहीं तर सारं जग आपल्यावर खुष आहे. आपणच नाहीं का सांगितलं कीं सरदार पूर्णचंद्रांचं आपल्यावर फार प्रेम होतं म्हणून. उगीच का आपली किंमत कमी करून घेतां !

**कृष्णकांतः**–पुन्हां पूर्णचंद्र आला ! त्याच्या आठवणीनं तर मला अगदीं भंडावून सोडलं आहे. मीं तुम्हाला सांगितलंना, कीं तो मूर्ख होता म्हणून. इतकंच नव्हे तर माझ्यावर प्रेम करणं हा एक त्याच्या मूर्खपणाचा प्रकार होता. पण कांहींही असो, अलीकडे त्याची मला फार फार आठवण होते !

**पूर्णचंद्रः**–कां बरं असं ?

**कृष्णकांतः**–काय असेल तें असो बुवा. मीं काकाला मरतांना पाहिलं. तो अगदीं म्हातारा होता. त्याच्या अंगांत लेशमात्रही शक्ति उरली नव्हती, तरी तो मृत्यूशीं झगडत होता. त्यानं हातापायाला आळेपिळे दिले. श्वासोच्छ्वासाकरितां धडपड केली. डोळे वटारून ठेवले, आ वासला, आणि सर्व शरीराला इतके कष्ट दिले कीं तें पाहून माझ्या मनाची चलबिचलच उडून गेली.

**पूर्णचंद्रः**–तुम्हांला त्याच्याबद्दल वाईट वाटलं एकूण ?

**कृष्णकांतः**–वाईट ! छेः छेः तो थेरडा म्हणजे निंद्य कर्म करणारांत

अग्रगण्य. लोकांच्या मुंड्या मुरगळून मिळविलेल्या संपत्तीवरचा दुष्ट नाग ! अनीतीची केवळ खाणच ! तो मेला म्हणून मला कसचं वाईट वाटतं आहे म्हणा. पण त्याच्या मरणकालच्या यातना पाहून मला पूर्णचंद्राची आठवण झाली; आणि त्याबरोबर तुमचीही झाली. कारण तुम्ही थेट पूर्णचंद्रासारखे दिसतां. इतकंच नव्हे तर तुम्हीं पूर्णचंद्रच आहांत असा मला नेहमीं भास होतो. बाकी तो मेला; आणि मृत्यु हा कोणालाच चुकला नाहीं म्हणा.

**पूर्णचंद्रः**–अशोकपूरच्या हवेनं तुमच्या वृत्तींत खास पालट पडला आहे. तुम्हीं काय म्हणतां याचा मला अर्थच कळत नाहीं.

**कृष्णकांतः**–आणि मलाही कळत नाहीं. परंतु अगदीं पिकून गेलेलं शरीर सोडून जातांना देखील जर जीवाला एवढे कष्ट होतात, तर पूर्णचंद्रासारख्या भरज्वानींत असलेल्या गड्याचं शरीर सोडून जातांना त्याला काय यातना झाल्या असतील. तो माझ्यापेक्षांही सशक्त होता. शाळेंत असतांना आम्हीं नेहमीं कुस्ती करीत असूं.

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) अरे, भागुबाई मरणाला भिते आहे ! ( उघड ) दोस्त, मेजवानीच्या प्रसंगीं असले विचार काढून मनाला त्रास देणं कांहीं चांगलं नाहीं.

**कृष्णकांतः**–आज मला असं कां होत आहे हेंच कळत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण तुम्हीं जो मृत्यूचा देखावा पाहून आलां आहां, त्याचा असाच मनावर परिणाम व्हायचा. जाऊंद्या ते विचारच. जोंपर्यंत जिवांत जीव आहे तोंपर्यंत चैन करावी म्हणजे झालं.

**कृष्णकांतः**–वा, फारच छान उपदेश आहे बुवा. आणि त्याप्रमाणें वागणंही कांहीं कठीण नाहीं. बरं तर मग मी ड्रेस बदलून येतों.

**पूर्णचंद्रः**–पद्माकर, यांच्या बरोबर जा आणि यांची नीट व्यवस्था कर. ( ते जातात. ) बालपणची आठवण जेव्हां कृष्णकांतानं काढली, त्या वेळीं माझ्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली होती. जर ती आमच्या दृष्टीस पडली नसती तर आमचं आयुष्य किती सुखानं गेलं असतं. तिच्या सौंदर्यानं मला वेडं केलं, आणि त्याला ढोंगी बनविलं. आमची मैत्री ताडकन् तोडून टाकली. ठीक आहे. तिला शासन देण्याची वेळ कांहीं दूर नाहीं. पण सध्यां तो विचार नको. आधीं कृष्णकांताची वाट लावली पाहिजे आणि मग तिची.

---

# प्रवेश ५ वा.

( कृष्णकांत एकटाच प्रवेश करतो. )

**कृष्णकांतः**–प्रिये, आतां तरी तुझी कांहीं हरकत राहिली नाहींना ? तुला संपत्ति पाहिजे ! घे आतां वाटेल तितकी संपत्ति. मीं अशोकपुरास जायच्या वेळींच माझं मृत्युपत्र तुझ्या हवालीं केलं आहे. त्यांत माझ्या सर्वस्वाची तुला स्वामिनी करून ठेविली आहे. प्रिये, एकवार तूं माझा उघडपणें स्वीकार केलास म्हणजे मी धन्य झालों. मला दुसरं कांहींएक नको. आपल्या दोघांच्या वैभवामधील अंतर माझ्या काकाच्या मरणानं दूर केलं आहे. काका, तुम्ही लोकांच्या माना मुरगळून मिळविलेला पैसा आतां खास सत्कारणीं लागणार. पोटाला चिमटा घेऊन कवडी कवडी करून सांठविलेली दौलत, आतां मोठ-मोठाल्या मेजवान्यांत खर्च होणार. ज्या संपत्तीला आजपर्यंत फक्त घाणेरड्या दिव्याचाच प्रकाश माहीत, तिला आतां रोज अत्तराचे दिवे दिसणार. विलासिनी, तुझ्या नांवाला शोभतील असले विलासाचे अनेक पदार्थ मीं अशोकपुरास खरेदी केले आहेत ते तुला केव्हां दाखवीन असं मला झालं आहे. आजपर्यंत तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत माझं मन रमूं नये म्हणून तर हा मी चितान्याचा धंदा शिकलों. त्यांत माझा हेतु इतकाच होता कीं, तूं जेव्हां प्रत्यक्ष माझ्याजवळ नसशील तेव्हां तुझं चित्र तरी माझ्या डोळ्यांसमोर असावं. तुझं कोमल शरीर अनेक अलंकारांनीं उघडपणें सुशोभित करायला जरी मला मिळालं नाहीं तरी तुझ्या चित्रावर चाहेल ते अलंकार मला घालतां यावे. मला आवडणारीं वस्त्रें जरी तूं अंगावर घेतलीं नाहींस तरी तुझ्या चित्रांत तीं मला काढतां यावीं. सारांश आंजपर्यंत तुझ्या प्रत्यक्ष सहवासाशिवाय राहिलेली वेळ तुझ्या चित्राशीं राजरोसपणें खेळण्यांत मीं घालविली आहे. आतां यापुढें तुझा सहवास मला कायमचा मिळणार असल्यामुळें मी माझ्या धंद्याला शेवटचा रामराम ठोकतों. पूर्णचंद्राच्या मृत्यूपासून आपण उघडपणानं बाहेर फिरलोंच नाहीं. तुला बरोबर घेऊन गाडींत बसून मी केव्हां बाहेर फिरायला जाईन असं मला झालं आहे.

**पूर्णचंद्रः**–( एकदम पुढें होऊन ) जाल हो बाहेर फिरायला. आतां उद्यांपासून दुसरा काय उद्योग आहे. मंडळी जमूं लागली म्हणून तुम्ही इतका

वेळ इकडे काय करतां हें पहायला आलों. आपला विचारभंग केला याबद्दल मला फार वाईट वाटतं, मला आपण माफी करा.

**कृष्णकांतः**–छेः छेः, हें काय हें ! आपण आलां म्हणून बरं झालं, नाहीं तर मी या मनोराज्यांत गर्क झाल्यामुळें इथें किती वेळ राहिलों असतों याचा कांहीं नेमच नव्हता. त्यामुळें मंडळींचा खोळंबा होऊन मला विलासिनीकडे जायला मात्र उशीर झाला असता. चला. ( दोघे जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

( सर्व मंडळी एकामागून एक दिवाणखान्यांत येतात. आणि गाणें चालू असतें. )

**कृष्णकांतः**–काय! हें सर्व माझ्याकरितां ! छे बुवा ! आपली कांहीं एवढी योग्यता नाहीं. या सर्व गोष्टी एखाद्या राजाच्या सन्मानाच्या वेळीं अधिक शोभल्या असत्या.

**पूर्णचंद्रः**–प्रामाणिक मनुष्यांची योग्यता राजापेक्षां कांहीं कमी नाहीं. आपण प्रामाणिकपणानें परस्परांचा विश्वास संपादन करून आदराला पात्र आहांत असं दाखविलं म्हणजे झालं.

**डॉ० करुणेशः**–सरदार साहेब, आपण यूरोपमधें फिरलां आहांत असं परवां म्हणत होतां. आज त्याबद्दल कन्व्हिन्स झालों. आजचा बेत पाहून मला लंडनची आठवण होते.

**गदाधरः**–मला तर नंदनवनांतील वनभोजनाची आठवण होते.

**पूर्णचंद्रः**–पुरे तुमचं नंदनवन. या पृथ्वीवर काय कमी रमणीय स्थलं आहेत ? मला तर कल्पनेंतील नंदनवनापेक्षां खऱ्या रमणीय गोष्टींत जास्त आनंद वाटतो.

**प्रोफेसरः**–आपलं म्हणणं बरोबर आहे. परलोकाची शुष्क कल्पना जर काढून टाकिली, तर मनुष्यांत आणि इतर सृष्टींत इतकं सौंदर्य भरलं आहे कीं, इहलोकांतच सर्व सौख्य सांठविलं आहे, असं प्रत्येक जीवाला वाटूं लागेल. आणि त्याच्या ठिकाणीं जास्त समाधान दिसूं लागेल.

**गदाधरः**–आपण नाहीं बुवा कधीं समाधान पावणार. आपल्याला कोणतीच गोष्ट थोडी पुरत नाहीं, हा माझा स्वभावच आहे. जर मीं एखादें चांगलं फूल पाहिलं तर तसलीं फुलं मला पुष्कळ पाहिजेत. एखादी चांदणी रात्र जर रमणीय वाटली, तर नेहमीं चांदणी रात्रच असावी असं मला वाटेल. एखादी सुंदर स्त्री जर माझ्या दृष्टीस पडली तर—

**डॉ० करुणेशः**–आपल्याला पुष्कळ सुंदर स्त्रिया पाहिजेत अं ! आपण मोठे सुलतान बादशहा लागून गेलां कीं नाहीं !

**गदाधरः**– वः ! त्यांची झनान्याची चाल मला फार आवडते आणि म्हणूनच मला मुसलमान बादशहा व्हावंसं वाटतं. झनाना म्हणजे निरनिराळ्या फुलांच्या झाडांचा बगीचा ! आज जाईजुई तर उद्यां शेवंतीचमेली. कधीं मोगरा तर कधीं चंपक. एखादे वेळीं नुसता गुलाबच वासाला घ्यावा.

**डॉ० करुणेशः**–पण त्याचे कांटे बोंचले म्हणजे !

**प्रोफेसरः**–ज्याला गुलाब पाहिजे त्यानं कांट्यांची आगही सोसलीच पाहिजे. ( सर्व हंसतात. )

**गदाधरः**–अलबत् ! अलबत् ! कोणीही सोशिल. मोठ्या खुशीनें सोशील. पण मी सांगतों, या लग्नाच्या चालीनं मनुष्यजातीचं सुख पार नाहींसं केलं आहे.

**कृष्णकांतः**–म्हणून तुम्ही अविवाहित राहिलां वाटतं—

**गदाधरः**–असं तर खरंच, मुद्दाम आपण होऊन कायदेशीर रीतीनं एकाच स्त्रीचं मी चुंबन घेईन असं काय म्हणून बांधून घ्यावं ? सध्यांच्या स्थितींत मी वाटेल त्या स्त्रीचं चुंबन घेईन. ( हंशा. )

**डॉ० करुणेशः**–वः ! वः ! खाशी महाराज—

**कृष्णकांतः**–काय म्हणतां ? वाटेल त्या म्हणजे अविवाहित तेवढ्याचना ?

**गदाधरः**–मी वाटेल त्या म्हटलं ना ? मग त्यांत विशेषतः विवाहितच आल्या. कारण त्यांच्या नवऱ्यांच्या अजागळपणामुळें त्या सहज वश हृ शकतात.

**पूर्णचंद्रः**–मिस्टर गदाधर, तुमचं म्हणणं अगदीं खरं आहे. आपल्या बायकोचीं निंद्य कृत्यं समजल्यानंतरही जर नवऱ्याचा अजागळपणा कायम राहिला तर त्याला ही होणारी शिक्षा योग्यच आहे, असं म्हटलं पाहिजे.

जाऊं द्या ! कृष्णकांत ! तुमचेही विचार याच नमुन्याचे आहेत. तुम्ही माझ्याजवळ ते बोलून दाखविले आहेत. आतां कां विनाकारण वाद करतां !

**कृष्णकांतः**–गदाधर ! जाऊं द्या ! हा विषय आपण सोडून देऊं. ( त्याच्या कानांत कांहीं बोलतो. ) ( दोघे मोठमोठ्यानें हंसतात. )

**पूर्णचंद्रः**–( उठून ) मित्रहो, आपल्या या आनंदांत मी क्षणमात्र व्यत्यय आणीत आहें. पण त्याचा हेतु इतकाच आहे कीं, माझं बोलणं संपल्याबरोबर तुमचा आनंद द्विगुणित व्हावा. आपण या ठिकाणीं आपले मित्र कृष्णकांत यांचं स्वागत करण्याकरितां जमलों आहों हें आपण जाणतच आहां. आपणां सर्वांच्या वतीनं मी त्यांचं या वेळीं स्वागत करितों. (टाळ्या.) कृष्णकांत हे तरुण असून चांगले सुशिक्षित आहेत. यांच्या गोड स्वभावामुळें यांना एकही शत्रू नाहीं. कांहीं घरगुती कामाकरितां यांना अशोकपुरास जावं लागल्यामुळें आपण त्यांच्या सुसंगतीला थोडे दिवस मुकलों होतों, हें खरं; परंतु आपणांस कळविण्यास मला अत्यंत आनंद वाटतो कीं, हे आपलं काम फत्ते करून वैभवाच्या शिखरावर बसून इकडे परत आले आहेत. त्यांना मिळालेली अपार संपत्ति ही त्यांच्या अंगीं वास करणाऱ्या अलौकिक गुणांबद्दल बक्षीस मिळाली आहे, असं मला वाटतं. तिचा उपभोग घेण्यास परमेश्वर त्यांना चिरायु करो, असं मी मनापासून इच्छितों. (हिअर, हिअर, टाळ्या, दारू पिणें वगैरे.) मित्रहो ! कृष्णकांतांचं स्वागत करणं हेंच आजच्या समारंभांत एक काम होतं, असं नसून दुसरंही एक काम आपल्याला करायचं आहे, त्याबद्दल आपणां सर्वांची मला सहानुभूति मिळेल, अशी आशा आहे. मी जें कांहीं सांगणार आहें तें ऐकून तुम्हांला आश्चर्य वाटेल. कारण मी मोकळ्या मनाचा मनुष्य नसून, मूखदुर्बळ आहें, अशी माझी या शहरीं प्रख्याति आहे. ( नो नो ! वः वः ! छेः छेः ! ) तरी पण एवढं खरं कीं, माझ्याबद्दल एखाद्या स्त्रीच्या मनांत प्रेमांकुर उत्पन्न होतील अशी माझी वागणूक नाहीं. ( कृष्णकांत कावराबावरा होतो. ) मी वृद्ध आहें, आजारी, पंगू आहें, आंधळा आहें. एखादी स्त्री माझ्यावर भाळेल अशी मला कधींही कल्पना आली नाहीं; परंतु माझ्या सुदैवानं मला माझ्यावर प्रेम करणारी एक स्त्री भेटली आहे आणि थोडक्यांत सांगायचं म्हणजे मी तिच्याबरोबर लग्नही करणार आहें.

**सर्वजणः**–अत्यंत आनंदाची वार्ता आहे. सरदारसाहेब, आम्ही तुमचं अभिनंदन करितों. वः ! छान ! शाबास ! ( हंशा. )

**गदाधरः**—आपल्या गळ्यांत बायकोचा पाश पडला म्हणजे आमच्या मेजवानीवर पाणीच आलं म्हणायचं. लग्न करून तुम्ही पारतंत्र्यांत अडकून पडाल असं मला केव्हांही वाटलं नाहीं. सरदारसाहेब ! स्वतंत्रपणानं तुम्हांला वाटेल ती चैन करतां आली असती.

**डॉ० करुणेशः**—पण एक अस्सल रत्न जर मिळालं—

**गदाधरः**—अहो कुसुमपूरचे कृष्ण, बस्स करा तुमचं एकपत्नीव्रत ! आज जरा अधिक झाली आहे वाटतं ?

**पूर्णचंद्रः**—डॉक्टर म्हणतात तेंच खरं आहे. या कुसुमपुरांत सौंदर्याची खाण म्हणून नांवाजलेली स्त्री जर स्वतः आपण होऊन मला आत्मार्पण करीत आहे, तर मी चालत आलेली लक्ष्मी लाथाडून देईन असं कसं होईल ? परमेश्वराच्या घरीं माझ्यावर कृतघ्नपणाचा दोष नाहीं का येणार ? ज्या सुंदरीनं माझं मन आकर्षण करून आपलंसं करून घेतलं आहे, तिचा मीं आनंदानं स्वीकार केला आहे. माझ्या भावी पत्नीचं आपण अभीष्ट चिंतन कराल अशी मला आशा आहे.

**गदाधरः**—पण सरदारसाहेब, आपल्या भावी कुटुंबाचं नांव सांगण्याची जर कृपा कराल तर फार बहार होईल !

**कृष्णकांतः**—मी तरी तेंच विचारणार होतों. कारण बहुतेक ती स्त्री या कुसुमपुरांत तरी नवीन आलेली असावी.

**पूर्णचंद्रः**—नाहीं. ती या कुसुमपूरची कायमची रहिवाशी आहे. तिचं नांव आपणा सर्वांच्या परिचयांतलं आहे. ती फार मोठ्या घराण्यांतली आहे. ती तरुण असून वैधव्यपंकांत रुतली आहे. तिचं नांव श्रीमती विलासिनीबाई शौर्यसागर !

**कृष्णकांतः**—अरे हरामखोरा ! पाजी मनुष्या, माझी बायको काढून नेणार होय ! अरे विश्वासघातक्या, तूं इतका हलकट गळेकापू कसाब असशील असं मला ठाऊक असतं तर तिची आणि तुझी भेट दिखील होऊं दिली नसती. अरे बेरडा, अशा रीतीनं दुसऱ्याच्या प्रेमाचा विध्वंस केल्याबद्दल तुझी चामडीच लोळवितों. सोडा मला. त्याच्या नरडीचा घोंट घेऊं दे. त्याशिवाय माझ्या अंगाची आग शांत होणार नाहीं.

**गदाधरः**—कृष्णकांत, अरे हें काय मांडलं आहेस ! तूं दारूच्या धुंदींत हें काय बडबडतो आहेस, त्याची कांहीं तुला कल्पना आहे का ? जरा शांत हो !

**प्रोफेसरः**–आपण काय एकमेकांचा खून करायला या ठिकाणीं जमलों आहोंत ! त्या सरदारसाहेबांना तूं काय म्हणून शिव्या देतो आहेस !

**कृष्णकांतः**–त्यालाच विचारा ! त्या दुष्ट सर्पाला सर्व कांहीं माहीत आहे.

**बक्षीसाहेबः**–सरदारसाहेब, आपण आपल्या म्हणण्याचं समर्थन करण्याचं कांहीं कारण नाहीं.

**पूर्णचंद्रः**–मित्र हो ! कृष्णकांतांना एवढा राग कां आला, हे कांहीं मला माहीत नाहीं. मला एवढंच ठाऊक आहे कीं, ज्या स्त्रीचं नांव मीं आतां आपल्याला सांगितलं तिचं यांच्यावर प्रेम आहे असं यांना वाटतं.

**कृष्णकांतः**–असं वाटतं काय ! अरे मांगा !

**गदाधरः**–कृष्णकांत, शांत हो. अशा थोर पुरुषाबरोबर एखाद्या स्त्रीबद्दल भांडण करणं कांहीं चांगलं नाहीं. अरे बायका हजारों मिळतील, पण असला दोस्त एक सुद्धां मिळणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांताना जर कृतकर्माचा पश्चात्ताप वाटत असेल तर त्यांनीं माफी मागितल्याबरोबर सर्व विसरून मी क्षमा करायला तयार आहें. कारण त्यांची जी निराशा झाली आहे, त्याचा परिणाम असा होणें साहजिक आहे.

**बक्षीसाहेबः**–मला तेंही खरं वाटत नाहीं. कारण विलासिनीबाईंनीं त्यांचा मुलगा गेला तेव्हां मला दत्तकाबद्दल सल्लामसलत विचारण्याकरितां बोलावलं होतं. त्या वेळीं मी त्यांना, दत्तकानं इस्टेटीला जरी वारस मिळाला तरी दत्तक आईची त्यामुळें रया जाऊन तिची वाताहात झाल्याशिवाय रहात नाहीं, असं जेव्हां सांगितलं तेव्हां त्या अगदीं कावऱ्याबावऱ्या झाल्या. त्याचं शांतवन करण्याकरितां मी सहज त्यांच्याजवळ पुनर्विवाहाची गोष्ट काढली. त्यापूर्वीं त्यांच्या मनांत ती कल्पना देखील नव्हती. त्या वेळीं हे राजेश्री अशोकपुरास गेले होते. विलासिनीबाईसारख्या साध्वी स्त्रीच्या मनांत यांच्याबद्दल यत्किंचितही प्रेम असेल असं मला वाटत नाहीं.

**कृष्णकांतः**–अहो विधवांचे कैवारी, बस्स करा तुमची अक्कल. तुमच्यासारखे दिवसाढवळ्या दरवडे घालणारे कायदेवाले मीं पुष्कळ पाहिले आहेत.

**बक्षीसाहेबः**–पहा चारचौघांदेखत तूं माझी अब्रूनुकसान करितो आहेस. अजून आय. पी. सी. चा हिसका माहीत नाहीं म्हणून गमजा चालविल्या आहेत!

**गदाधरः**–फौजदार, तुमच्या ओळखीच्या जोरावर शेंफारून हा जो एवढा

उन्मत्त झाला आहे, त्याला जरा चवदावें रत्न दाखवा, म्हणजे शुद्धीवर येईल. लकडीशिवाय मकडी नाहीं वळायची. याला खेटराचीच पूजा पाहिजे.

**कृष्णकांतः**–अरे जाबे खर्डेघांश्या, कुत्र्या !

**फौजदारः**–चुप चुप. शिवीगाळ करूं नको. तुला कांहीं अक्कल आहे ! अरे आय. पी. सी. चीं कलमं एकदां पाठीस लागलीं म्हणजे पाठीची चामडी लोळवितील. गप्प बैस. मी सर्व आपसांत मिटवितों.

**कृष्णकांतः**–अरे मूर्खांनो, सोडा मला. तुम्हांला काय ठाऊक आहे ? या वेळीं तुम्ही कोणीही माझ्या बाजूचे नाहीं, हें मी जाणून आहें. अरे, भामट्या, तूं तिला चोरणार होय ? मला असा तोंडघशीं पाडणार ? नीचा, याबद्दल तुला आपल्या प्राणाचा दंड द्यावा लागेल.

**पूर्णचंद्रः**– मी मोठ्या खुषीनं देईन. कृष्णकांत, ज्या स्त्रीबरोबर मी लग्न करणार आहें तिचं तुमच्यावर काडीइतकंही प्रेम नव्हतं. तिनंच मला हें सांगितलं. तिचं तुमच्यावर अगदीं थोडेसं जरी प्रेम असतं तरी मीं या कामीं माघार घेऊन तिचा नाद सोडला असता. पण हल्लींच्या स्थितींत मीं तुमचा कांहीं एक अपराध केलेला नाहीं.

**सर्वजणः**–अहाहा ! काय सभ्यपणा हा, किती तरी उदार अंतःकरण आहे !

**कृष्णकांतः**–तिचं माझ्यावर प्रेम नव्हतं—असं तूं म्हणतोस ! आणि तुझी मी क्षमा मागूं ! घे ही क्षमा ! ( तोंडांत मारतो. )

**पूर्णचंद्रः**–( त्याचा हात धरून ) सभ्य गृहस्थ हो, याला एक उपाय आहे. आणि आपली जर मला मदत असेल तर मी कृष्णकांतांना शांत करितों. त्यांच्या कांहीं खासगी गोष्टी मला माहीत आहेत. त्या जर मीं एकांतांत सांगितल्या, तर त्यांचा राग ताबडतोब नाहींसा होईल, अशी माझी खात्री आहे. तेव्हां कृपा करून आपण दुसऱ्या दिवाणखान्यांत थोडा वेळ बसाल, तर सर्व ठीक होईल.

**सर्वजणः**–असं जर असेल तर आम्ही मोठ्या आनंदानं दूर जाऊं. पण हा दुष्ट लांडगा आपणापाशीं दांडगाई करूं लागला तर ?

**पूर्णचंद्रः**–त्याची तुम्ही काळजी करूं नका ! तें सर्व माझ्याकडे सोंपवा. मी तुम्हांला लवकरच हांका मारीन. ( जातात. ) कृष्णकांत, तूं हें काय मांडलं

आहेस ! मी कोण याची तुला ओळख नसल्यामुळें तुझे हे ढंग चालले आहेत. मी दिसतों तसा नाहीं, याची साक्ष देणारे माझे डोळे मीं आजपर्यंत झांकून ठेविले होते, ते मी उघडे करितों. तूं आपले डोळे उघडून माझ्याकडे नीट पहा. ( तो भितो. ) असा भिऊं नको. मी तुझा बालपणचा जुना दोस्त पूर्णचंद्र शौर्यसागर आहें. माझं तारुण्य या शुभ्र केशांनीं आच्छादित आहे. पण या वेळीं तुझ्या मनगटाला माझ्या तारुण्याचा अनुभव येत असेल. विलासिनीबद्दल तुझ्या काय वल्गना आहेत त्याचा पुन्हां एकवार उच्चार कर.

**कृष्णकांतः**—काय तूं पूर्णचंद्र ! नाहीं, तो मेला आहे ! त्याला गाडून टाकला आहे.

**पूर्णचंद्रः**—त्याला पुरण्यांत घाई झाली. तो जिवंतपणींच पुरला गेला होता.

**कृष्णकांतः**—मग काय तूं जिवंत होऊन परत आला आहेस !

**पूर्णचंद्रः**—असं तर खरंच. मी जिवंत होऊन परत आलों त्या वेळीं तूं आणि माझी बायको माझ्या बागेंत गळ्यांत हात घालून हिंडत होतां. हा भ्रष्टतेचा प्रकार पाहून मी संतापानं वेडा झालों होतों. आणि सूड घेण्याकरितां हा एवढा व्यूह रचला आहे. विलासिनीनं मला फसवलं त्याचप्रमाणें तुलाही फसवलं आहे. ती माझ्यावर फिदा आहे हें ऐकून तुझ्या मनाला या वेळीं वेदना होतील तेवढीच शिक्षा तुला बस्स आहे. आतां माझ्या मनाला समाधान वाटलं. या वेळीं तूं मुकाट्यानं आपलं तोंड काळं करून एकदम अशोकपुरास निघून जा ! मीं तुझा जीव घेतला तरी देखील ईश्वराच्या घरीं अपराधी ठरणार नाहीं. पण मी तुला जीवदान देतों. कारण तुझा प्राण घेऊन तुझ्या मनाच्या यातना लवकरच संपल्या तर माझा सूड कडू होईल. बोल, माझी सूचना तुला पसंत आहे कीं नाहीं ? मी त्या अवदसेचा सूड उगवीपर्यंत तूं यांतील एक अक्षर देखील बाहेर फोडणार नाहींस अशाबद्दल मला वचन दे, यांत तुझंही कार्य होणार आहे. कारण तझ्याशीं ती बेइमान झाली, म्हणून तिचा सूड तुलाही उगवायचा आहेच.

**कृष्णकांतः**—तूं पूर्णचंद्र आहेस याबद्दल मला संशय येत होताच. तो अनायासं दूर झाला. ठीकच झालं. तूं पूर्वीं अर्धवट मेलास म्हणून परत आलास ! पण आतां तुला मी पूर्णपणें ठार मारितों. म्हणजे माझ्या लाडकीची निंदा करण्याला तूं जिवंत होऊन परत येणार नाहींस. तिची आणि माझी भेट झाली म्हणजे तिला मी सर्व हकीकत सांगेन.

**पूर्णचंद्रः**–आतां तिची भेट स्वर्गांत.

**कृष्णकांतः**–काय म्हणतोस स्वर्गांत ! तर तुलाच आधीं तिकडे धाडतों. ( त्याच्या अंगावर येतो. )

**पूर्णचंद्रः**–( शस्त्र दाखवून ) फुकट प्राणाला कां मुकतोस ! माझ्या म्हणण्याला कबूल हो, त्यांत दोघांचाही फायदाच आहे.

**कृष्णकांतः**–अरे जा ! माकडा ! तुला एक पोरगी संभाळतां आली नाहीं, आणि मोठ्या शौर्याच्या गोष्टी सांगतो आहेस ! ( त्याच्याशीं कुस्ती करतो व वर्मीं वार लागून पडतो. ) अरेरे वर्मीं वार लागला ! आतां मी कसचा जगतों ! एका स्त्रीच्या पायीं माझ्या मित्राच्या हातून मला मृत्यु येईल, असं माझ्या जन्मकाळीं भविष्य केलं होतं, तें आज खरं ठरू पहात आहे. ( स्वगत ) हा पूर्णचंद्र खास आहे. ( उघड ) कायरे खरंच का विलासिनी माझ्यावर प्रेम करीत नाहीं ?

**पूर्णचंद्रः**–खरोखर करीत नाहीं. ( त्याची जखम बांधतो. )

**कृष्णकांतः**–पण हीं तिचीं पत्रं पहा !

**पूर्णचंद्रः**–आणि तूंही हीं पत्रं पहा !

**कृष्णकांतः**–अरेरे ज्या स्त्रीनं प्रत्यक्ष नवऱ्याला फसवलं, तिच्यावर मी विश्वास ठेवून असा तोंडघशीं पडलों ! तिच्या नीचपणाबद्दल आतां माझे डोळे उघडले आहेत. मित्रा—पण तुला मी आतां मित्र, असं कोणत्या तोंडानं म्हणूं !

**पूर्णचंद्रः**–तूं असा कष्टी होऊं नकोस. तूं जिवंत राहून मी तिचा कसा काय सूड उगवितों हें आपल्या डोळ्यांनीं पहावंस अशी माझी इच्छा आहे. तिच्यावर माझा खरा राग आहे, तुझ्यावर नाहीं.

**कृष्णकांतः**–तर मग मला क्षमा केली आहे असं म्हण, म्हणजे मी सुखानं मरेन, तूं कोण हें त्या चांडाळणीला ठाऊक नाहींना ?

**पूर्णचंद्रः**–नाहीं, पण या ठिकाणीं जमलेल्या मंडळीला तूं हें सांगूं नकोस. कारण, तूं कांहीं जरी सांगितलंस तरी कोणाला तें खरं वाटणार नाहीं. मी त्यांना हांका मारतों म्हणजे डॉ० करुणेश येऊन तुझ्या जखमेला कांहीं तरी उपाय करितील. तूं माझ्या घरीं स्वस्थ पडून रहा.

**कृष्णकांतः**–पण तूं तिचा सूड कसा उगवणार ?

**पूर्णचंद्रः**–मी तिच्याशीं लग्न करीत आहें यावरून एकांतांतील सुडाची सर्व कल्पना कर.

**कृष्णकांतः**–आलें ध्यानांत; ठीक आहे. बोलाव मंडळींना. मी नाहीं त्यांना कांहीं सांगत. मला आतां पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. पण मला जगण्याची आशा दिसत नाहीं.

**पूर्णचंद्रः**–पद्माकर, पद्माकर, ( तो येतो. ) मंडळींना बोलाव.

**सर्वजणः**–( प्रवेश करून ) अरे काय प्रकार झाला हा !

**डॉ० करुणेशः**–कृष्णकांत, असे विवळतां कां ?

**कृष्णकांतः**–डॉक्टर काय सांगूं तुम्हांला ! आज मीं एका चांगल्या आणि सुशील मनुष्याशीं विश्वासघात केला. त्याच्या तोंडावर बेहोष होऊन त्याची निंदा केली. त्यानं नानातऱ्हेनं मीं शांत व्हावं म्हणून माझी विनवणी केली. त्यानं मला शस्त्राची भीति दाखविली पण संतापानं मी वेडा झालों होतों, म्हणून तें कांहीं एक न जुमानतां मी त्याच्याशीं झगडलों. त्यांत शस्त्र दूर फेंकून देतांना माझ्या वर्मी लागलं. माझा दोस्त पूर्ण—-चंद्रगुप्त पूर्णपणें निर्दोषी आहे. मला त्याच्या हातून मृत्यु आल्यामुळें मी आपल्याला धन्य मानून घेत आहें. मी बरा झालों तर, त्याच्या लग्नाचा सोहाळा पाहीन, पण—पण मी जगत नाहीं—नाहीं—मी—मा—माझे अपराध फार भयंकर आहेत. त्या मानानं मला झालेली शिक्षा फार थोडी आहे, पण तुला—तुम्हांला–ये–या–मला कडकडून भेट–भेटा–माझ्या अपराधाची मला क्षमा कर–करा–मी आतां देवा–मी–मी–आतां देवाच्या घरीं जातों–मंडळी–मंडळी–माझा शेवटचा राम राम घ्या. मीं परस्त्रीचा अभिलाष धरून या माझ्या मित्राला संसारसुखांतून बाहेर खेंचण्याचा प्रयत्न केला, त्याचं हें फळ, या यातनांच्यारूपानं मी भोगीत आहें. हें उदाहरण आपल्या डोळ्यांपुढें ठेवून परस्त्रीचा हात आपल्या हातांत घेण्याची पापी इच्छा इतःपर कोणीही धरूं नका ! एवढीच माझी तुम्हांला विनंति आहे. मित्रा, क्षमा कर. येतों आतां. ( विवळतो. )

**फौजदारः**–सरदारसाहेब, मीं सर्व ऐकलं आहे. आपण स्वस्थ असा. मी सर्व व्यवस्था करितों. डॉक्टर, यांना खोलींत नेऊन यांची जखम बांधूं या.

**अंक पांचवा समाप्त.**

# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला.

( पूर्णचंद्र बसला असतांना विलासिनी मागाहून येते. )

**विलासिनीः**–( स्वगत ) यांना पाठमोरं पाहिलं म्हणजे हे थेट तिकडल्या-सारखे दिसतात.—या बाजूनं–तसेच ! या बाजूनं अगदीं हुबेहूब तसेच. यांची पोषाख करण्याची तऱ्हा दिखील अगदीं तश्शी आहे. गेलेल्या माणसांची आठवण यांच्या सहवासांत कांहीं केल्या बुजायची नाहीं. उलट ती नेहमीं जागृतच रहायची ! मग–मी घेऊं का माघार ? कां नको ? हे तसे दिसतात, एवढं कारण पुरें होईल का ? यांनीं बजावून सांगितलं असतांना दिखील मीं होच म्हटलं आहे, मग आतां माघार घेणं बरं नव्हे. हे असेनात त्यांच्यासारखे. त्यांना अकालीं मरण आलं हें खरं नसून अकालीं म्हातारपण आलं हें खरं आहे. अशी आपल्या मनाची समजूत केली म्हणजे झालं. तिकडच्याप्रमाणें यांची कृष्णकांताशीं मैत्री आहेच. तेव्हां त्यांनाही माझ्याशीं उघडपणें बोलतां चालतां येईल. त्यांचा मृत्यु व यांच्याशीं पुनर्विवाह यांच्यामधला वैधव्याचा काल एकदां आठवणीच्या आटोक्याबाहेर गेला म्हणजे आपल्या सौभाग्यांत खिंड पडलीच नाहीं असं आपल्याला वाटूं लागेल. अशा रीतीनं मनाचं समाधान केलं म्हणजे सारं ठीक होईल. ही संधि वायां नाहींच घालवायची. बस्स झाला तोच निश्चय कायम. ( पुढें होते, तो उठून उभा रहातो. ) ( उघड ) आपण कशाला उठायला हवं !

**पूर्णचंद्रः**–विलासिनी, तुला एक अत्यंत वाईट बातमी सांगायची आहे.

**विलासिनीः**–काय ! आपली भेट झाल्याबरोबर मला वाईट बातमी ऐकावी लागणार ! कृष्णकांत परत आले कीं काय ? त्यांना मी पुनर्विवाह-करणार हें कळलं कीं काय ? त्यांची आणि तुमची कांहीं बोलाचाली झाली नाहीं ना ?

**पूर्णचंद्रः**-तो मला नुकताच भेटून गेला आणि त्यानं ही आंगठी तुला देण्याकरितां दिली आहे.

**विलासिनीः**-यावरून काय तरी समजायचं बाई! तिकडचा आणि त्यांचा स्नेह होता, म्हणून ही आंगठी मीं त्यांना दिली होती. ती त्यांनीं कां बरं परत दिली? आपण असे स्तब्ध झालां म्हणजे मला बाई भीति वाटते. मला बरं वाटेल असेच नेहमीं आपण वागाल अशी मला मोठी आशा आहे.

**पूर्णचंद्रः**-मी तसाच वागतों आहें. कृष्णकांतांना मी शांत करीन असं तुला सांगितलं होतं. मीं माझं म्हणणं खरं केलं आहे. ते आतां कायमचे शांत झाले आहेत.

**विलासिनीः**-काय? कायमचे म्हणजे!

**पूर्णचंद्रः**-म्हणजे ते मेले.

**विलासिनीः**-मेले! नाहीं, खरं नाहीं वाटत! तुम्हीं त्यांना मारलंत कीं काय?

**पूर्णचंद्रः**-तो आला त्या दिवशीं त्यानं माझा अत्यंत अपमान केला. इतकंच नव्हे तर माझ्याशीं दांडगाई केली. मीं शस्त्राची भीति दाखविली तरी तो भ्याला नाहीं. आणि शेवटीं माझ्या हातून मेला. मरतांना त्यानं माझी क्षमा मागितली. आणि मींही त्याला क्षमा केली आहे.

**विलासिनीः**-त्यांनीं काय तरी बाई आपला अपमान केला?

**पूर्णचंद्रः**-मी तुझ्याशीं लग्न करणार हें सांगितल्याबरोबर त्यानं मला एक ठोसा दिला, आणि नाना तऱ्हेच्या शिव्या दिल्या. दगलबाज, भामटा, पाजी, हरामखोर—कांहीं पुसूं नको. तुलाही तो अवदसा, बेइमान असं म्हणत होता.

**विलासिनीः**-मी त्यांच्याशीं चांगलेपणानं वागत असें त्याचं हें योग्य बक्षिस मिळालं, दुसरं काय! चांगलं—चांगलं!—

**पूर्णचंद्रः**-तुला त्यांच्याबद्दल वाईट नाहीं वाटत?

**विलासिनीः**-वाईट! कां म्हणून? ते होते तोंपर्यंत भाऊजी कसे अगदीं गरीबासारखे वागत; पण त्यांच्या पाठीमागें—अलीकडे अगदींच त्यांनीं ताळ सोडला होता!

**पूर्णचंद्रः**-मग माझा अंदाज चुकला एकूण! मला वाटलं होतं कीं ही

बातमी ऐकून तुझं काळीज फाटून जाईल. म्हणून मी भीतीनं अगदीं स्तब्ध झालों होतों. माझं हें अघोर कृत्य तुला आवडलं तर मग !

**विलासिनीः**–अग बाई, हें अघोर का झालं कृत्य ! मला तर मोठं शूरासारखं दिसतं. त्यांनीं तुमचा अपमान केला–तुम्हीं त्यांना योग्य शासन केलं. झालं. हात्तिच्या ! म्हणून कां असे स्तब्ध होतां ? मग आतां एकदां माझ्याकडे पाहून हंसायचं होतं. ( तो हंसतो. ) आपण दिलेल्या देणग्यांच्या पासंगाला दिखील पुरणार नाहीं, असली ही एक माझी देणगी आहे. ( अंगठी देते. ) ही मूळ माझ्या मामंजींची. त्यांच्यापासून तिकडे आली. माझ्याकरितां इचा आपण स्वीकार करावा.

**पूर्णचंद्रः**–तूंच देत आहेस म्हणून घेतों. बाकी इच्याकडे पाहून मला कृष्णकांताच्या मृत्यूची आठवण होते. त्यानं मरतांना तुला देण्याकरितां ही हातांतून काढून दिली.

**विलासिनीः**–तें जाऊं द्या–पण कुसुमपुराला केव्हां जायचं ?

**पूर्णचंद्रः**–कां, एवढी घाई कां ?

**विलासिनीः**–कृष्णकांत भाऊजींच्या मृत्यूपत्राची व्यवस्था करायची आहे. ते अशोकपुरास गेले त्या वेळीं त्यांनीं त्यांचं मृत्युपत्र माझ्या स्वाधीन केलं आहे. त्यांच्या सर्व इस्टेटीची मीच मालकीण आहें. त्यांचे कागदपत्र माझ्या हातीं येतील ना ?

**पूर्णचंद्रः**–कृष्णकांताचं तुझ्यावर प्रेम होतं एकूण.

**विलासिनीः**–हो. माझ्या सरळ स्वभावामुळं मला कोणीच शत्रु नाहीं. मला सर्व माणसं प्रेमानं वागवीत. भाऊजींच्या ताब्यांत माझी इस्टेट होती, म्हणून तिचा मला विश्वास पटण्याकरितां त्यांनीं माझ्या नांवाचं आपलं मृत्युपत्र केलं.

**पूर्णचंद्रः**–असं काय ! पण त्यामुळें तुझी इस्टेट कायम राहून त्यांची संपत्ति तुला आज मिळते आहे. मला फार आनंद वाटतो आहे. तें मृत्युपत्र मला पहावंसं वाटतं. दाखवाल का ?

**विलासिनीः**–हो. ( ती पेटींतून काढून देते. ) फोडा, फोडा, मला वाचून न दाखवितांच त्यांनीं बंद केलं. आपण वाचायचं होतं काय लिहिलं आहे तें.

**पूर्णचंद्रः**–कुसुमपूर येथील सागर मोहल्यांत राहणार श्रीमती विलासिनीबाई शौर्यसागर ह्या माझ्या इस्टेटीच्या पूर्णपणें कायदेशीर स्वामिनी आहेत.

**विलासिनीः**–पूर्णपणें म्हणजे त्यांत सारा पत्रव्यवहार आलाच.

**पूर्णचंद्रः**–हो ! हो ! ( मृत्युपत्र परत देऊन ) बरं मी येतों आतां !

**विलासिनीः**–आंगठी घातलेला आपला हात पुन्हां मला एकदां पाहूंदे.

**पूर्णचंद्रः**–कां बरं ?

**विलासिनीः**–आपला हात थेट मला तिकडच्या हातासारखा दिसला. हें असं असेल का ? ( वेड्यासारखें करून मूर्च्छित होते व किंकाळी फोडते. )

**पूर्णचंद्रः**–विलासिनी ! सावध हो ! सावध हो !

( एक म्हातारी बाई प्रवेश करते. )

**म्हातारीः**–काय झालं ! धांवाग धांवा ! पाणी आणा. काय झालं इला ?

**पूर्णचंद्रः**–मीं इला इच्या एका जिवलग स्नेही माणसाच्या मृत्यूची बातमी सांगितली. तिनं ती माठ्या धैर्यानं ऐकून घेतली खरी, पण तिचं चित्त त्यामुळें अगदीं कावरंबावरं झालेलं दिसत होतं. शिवाय माझा हात तिला आपल्या नवऱ्याच्या हातासारखा दिसला म्हणूनही ती भ्याली असावी. पण एवढ्यानं कांहीं मूर्च्छा येऊं नये. त्यांतून नाजूक बायकांच्या प्रकृतीचं मान कोणीं सांगावं !

**विलासिनीः**–( सावध होऊन ) मला किनई या गोष्टीबद्दल भारी वाईट–

**पूर्णचंद्रः**–तूं अगदीं बोलूं नको. मीच तुझ्या नवऱ्यासारखा दिसतों हेंच माझं दुर्दैव आहे. त्याबद्दल माझी मलाच अतिशय खंती वाटते. पण मी तरी काय करूं !

**विलासिनीः**–मी आतां थोडा वेळ झोंप घेतें.

**पूर्णचंद्रः**–बरं घे. मीही जातों. लवकरच पत्र पाठवीन त्याप्रमाणें तजवीज कर ! ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

( पद्माकर व कमला बोलत येतात. )

**कमलाः**–असं कारण तरी काय झालं ?

**पद्माकरः**–अग कारण कसचं आलं आहे! तो कृष्णकांत मेल्यापासून आमचे यजमान अगदीं आनंदी झाले आहेत. मग ते काय विला–

सिनीच्या प्राप्तीचा मार्ग निष्कटंक झाला म्हणून असो, कीं कांहीं असो. त्या आनंदांत मला लग्नाचं बक्षीस म्हणून हें बंद केलेलं पत्र दिलं. आणि आजच्या आज लक्ष्मी बँकेंतील पैशाची व्यवस्था करण्याकरितां आनंदपुरास जायला सांगितलं. पण मला निरोप देतांना त्यांचा कंठ अगदीं भरून आला आणि मलाही रडूं कोसळलं.

**कमला**:—आपण हा पुनर्विवाह होईतोंपर्यंत राहतों असं नाहीं का म्हटलंत ?

**पद्माकर**:—मी तसं बोललों. पण ते म्हणाले कीं, सर्व व्यवस्था झालेली आहे. आणि विवाहाच्या दिवशीं रात्रींच मेजवानी झाल्याबरोबर मी विलासिनीसह दूर फिरायला जाणार आहें. आणि खरंच, प्रवासाची तयारी अगदीं जय्यत आहे.

**कमला**:—ते परत येणार केव्हां ?

**पद्माकर**:—परत येण्याविषयीं मीं विचारलं तेव्हा ते किंचित् हंसले. आणि म्हणाले, परत येण्याचा दिवस अजून ठरला नाहीं. मी परत यायच्या वेळीं तुला अगोदर कळवीन. पण तें जाऊंदे. आई त्यांना भेटून आली का ? त्यानीं तिला बोलावलं होतं.

**कमला**:—तिकडेच गेली आहे. आतां येईल.

( मेनकाबाई प्रवेश करतात. )

**मेनकाबाई**:—बाळा पद्माकरा, मी तुला टाकून बोललें याचं मला फार वाईट वाटतं. तुझ्या यजमानांनीं माझी समजूत करून तुमच्या प्रेमाची खरी किंमत मला पटविली. आतां माझं समाधान झालं आहे. तुम्ही सुखानं नांदा. पण हो, पद्माकर, ही तुला काय चिठ्ठी दिली आहे पहा.

**पद्माकर**:—( चिठ्ठी घेऊन वाचतो ) " मीं मेनकाबाईची समजूत केली आहे. तेव्हां माझ्या विवाहाचा आनंदोत्सव साजरा करण्याकरितां कमलेला आनंदपुरास नेण्यास त्या आतां अडथळा करणार नाहींत. त्यांच्या परवानगीनं तिला घेऊन जाण्याची तजवीज कर. " मग कसं काय ? ( कमला लाजते. )

**मेनकाबाई**:—जा, जा, खुशाल घेऊन जा. माझी कांहीं आडकाठी नाहीं. ही मी तिची आई, तिचा हात तुझ्या हातांत देतें. आतां तर झालं ना ?

( पद्माकर व कमला पायां पडत असतांना पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

( विलासिनी व पूर्णचंद्र लग्नाकरितां तयार केलेल्या हॉलमध्यें येतात. )

**विलासिनी**:—ही सर्व तयारी पाहून या ठिकाणीं एखाद्या सार्वभौम-राजाचं लग्न होणार आहे असं वाटतं !

**पूर्णचंद्र**:—हें सारं तुझ्याकरितां.

**विलासिनी**:—हें सर्व ऐश्वर्य पाहून स्वर्गातील अप्सरांना दिखील माझा हेवा वाटेल !

**पूर्णचंद्र**:—पण विलासिनी याच्या मोबदला तूं माझ्यावर प्रेम करशील ना ? तुझ्या पूर्वीच्या नवऱ्यावर जसं तुझं प्रेम होतं, त्याचप्रमाणें किंवा त्याच्यापेक्षां अधिक तूं माझ्यावर प्रेम करशील अशी मला आशा आहे. बोल—बोल—तुझ्या ताडून मला एकदां ऐकूं दे.

**विलासिनी**:—हें काय विचारावं बरं ! पण आपण त्यांच्याबद्दल इतकं उत्सुकतेनं नेहमीं नेहमीं कां बोलतां बरं ! गेलेल्या माणसांची आठवण काढणं कांहीं चांगलं नाहीं. मीं आपणांला अनेकदां सांगितलं आहे; पुन्हां एकदां सांगतें, कीं माझं कांहीं त्यांच्यावर फारसं प्रेम नव्हतं. पण आपणावर मात्र खरं—खरं प्रेम आहे.

**पूर्णचंद्र**:—हें खरंच का ? अगदीं खरं—खरं—खरं.

**विलासिनी**:—खरं—खरं—खरं—किती वेळां तरी आपण मला हाच प्रश्न विचारिला असेल ! मीं काय केलं म्हणजे आपल्याला माझं बोलणं खरं वाटेल.

**पूर्णचंद्र**:—पण तुझं प्रेम माझ्यावर आहे कां माझ्या पैशावर ?

**विलासिनी**:—अर्थात् तुमच्यावर. नुसत्या पैशावर भुलून जाणारी मी बायको नव्हे. मी केवळ तुमच्यावर प्रेम करतें. तुमच्या गुणांनीं मला वेड लावलं आहे !

**पूर्णचंद्र**:—या तुझ्या मधुर भाषणाबद्दल तुला योग्य बक्षीस द्यावं असं माझ्या मनांत आहे. मीं दिलेलीं रत्नं तुला आवडलीं ना ?

**विलासिनी**:—अग बाई, ते तर माझे सर्वांत आवडते दागिने ! ते एखाद्या महाराणीच्या अंगावर दिखील शोभतील.

**पूर्णचंद्रः**–प्रत्यक्ष सौंदर्याची देवताच ते अंगावर घालते आहे मग काय विचारायचं आहे ! पण माझ्याजवळ आणखीही रत्नं आहेत, त्याच्यापुढें हीं अगदीं कवडीमोल आहेत.

**विलासिनीः**–मग मला दाखवायचीं होतीं तीं ? पण तीं सारीं माझ्याच-करितां आहेत ना ?

**पूर्णचंद्रः**–सारीं केवळ तुझ्याकरितां—या माझ्या अर्धांगीकरितां. त्यांत हिरे आहेत, ते खंजिराच्या पात्याप्रमाणें चकाकतात ! इंद्रनीलमणी विजेप्रमाणें डोळेच दिपवितात ! मोतीं तर इतके गोळीबंद आणि शुभ्र आहेत कीं, जणूं काय मृत अर्भकाच्या चिमुकल्या बोटांचे तुकडेच तोडले आहेत ! त्यांत माणकं आहेत त्यांची लाली पाहून रक्तबिंदूंची आठवण होते. हा पहा त्यांचा कंठा केला आहे. त्यांतील एखादा सर जर गळ्यांत घातला, तर फांशीच्या वेळीं गळ्याला आंवळीत जाणारी तात त्याचं चामडं फाडून नुकतीच रक्तांत भिजत आहे असा भास होतो. हा तुझ्या गळ्यांत पडणारा कंठा, माझ्या मृत्यूची बातमी ऐकल्याबरोबर, मंगलसूत्र तोडतांना जर तुझ्या हातीं लागला, आणि दुःखाच्या आवेगांत त्यालाही तोडून, तसाच तो हात तूं कपा-ळावर मारून घेतलास, तर पहाणाराला असं वाटेल, कीं खरोखरच तुझं कपाळ फुटून त्यांतून रक्ताच्या धारा बाहेर पडत आहेत. त्याचप्रमाणें तो हात तसाच नुसता अश्रू पुसण्याच्या मिषानं डोळ्यांकडे नेलास, तर त्या वेळीं या कंठ्यां-तील टपटप खालीं गळणारीं माणकं पाहून तुझ्याच डोळ्यांतून जणूं रक्तबिंदूच पडत आहेत, असा भास होईल ! कंठ्यासहित वळलेल्या मुठीनं, तूं आपली छाती बडवलीस, तर अनावर झालेल्या दुःखाला वाट देण्याकरितां, तूं आपलं काळीज फाडून त्यांतून आपलीं आंतडीं बाहेर काढीत आहेस असं वाटेल ! त्या गडबडींत आपल्या कपाळावरील सौभाग्यचिन्ह पुसून टाकण्यास जरी तुझे हात विसरले, तरी या लालभडक माणकांचं तेज पाहणाराच्या डोळ्यांत भरल्यामुळें, त्यांतून तुझ्या कुंकुमतिलकाची लाली फिकी पडून तुझं कपाळ पांढरं फटफटीत दिसेल ! श्रेष्ठ ठिकाणीं, भालप्रदेशावर राजरोस झळकणाऱ्या, सौभाग्याच्या निशाणाच्या कृत्रिम लाल रंगाची ही दशा, त्या ठिकाणीं झिरझिरीत ओल्या कातड्याच्या आभ्र्यांत गुंडाळलं म्हणून तांबूस दिसणारं तुझं अधरबिंब, तसेच किंचित् जाड कोरड्या कातड्याच्या पड्यांत दडवले म्हणून गुलाबी

दिसणारे तुझे कोमल कपोल, यांची त्रेधाच उडून जाईल. प्रसंगांशिवाय गुणांची खरी पारख होत नाहीं. ( विलासिनी रडूं लागते. ) छेः, हे काय हें ! तूं रडूं नको, आतांही रडूं नको, आणि नंतरही रडूं नको. कारण, रडून रडून तं डोळे कितीही लाल केलेस तरी ते त्यांच्या खांचेंत कोंडून रहाणारे—पापण्यांच्या चिकाच्या पडद्यांत दडून रडणारे; ते लोकांच्या नजरेस कसे पडणार ! आणि जरी लोकांना आपण किती रडलों याचं प्रदर्शन करण्याकरितां ते चिकाचे पडदे तूं बाजूला सारलेस तरी तुझे गुंजेसारखे लाल झालेले डोळे या माणकांच्या समोर कवडीसारखे सफेत दिसतील. याउप्पर जरी तूं खरोखर रडलीस तरी या लालांचें प्रतिबिंब अश्रूंत पडून, या कंठ्यांतील मणीच ओघळत आहे असाच भास होईल; आणि मंगलसूत्राबरोबर कंठा तोडून डोळ्यांतून एकही अश्रू न काढतां, अनिवार दुःख झाल्याचा तूं फक्त अभिनय करते आहेस, असंच लोक म्हणतील. दुःखानं निस्तेज झालेल्या पांढऱ्या फटफटीत गालांवर, चमकण्याकरितां जरी तुझे अश्रू त्यांच्यावर पसरले, तरी या रत्नाचं लाल प्रतिबिंब तुझ्या गालांची लालीच वृद्धिंगत करून तुझ्या दुःखाला झांकून टाकील. या मंगलप्रसंगीं अशी रडूं नको. आणि त्या घोर प्रसंगींही अशी रडूं नको. कारण हा कंठा जवळ असला म्हणजे न रडून रडण्याचं, आणि रडून न रडण्याचं, यांपैकीं तुला कोणतंही सोंग आणतां येईल. ( विलासिनी रागानं ओंठ चावते तिकडे पाहून ) त्या लालांचं वर्णन केलं म्हणून तुला राग आला होय ? नको त्या ओंठांना त्रास देऊं; नको त्यांना चावूं. कारण, चावा घेतल्यामुळें राग येऊन ते कितीही लाल झाले तरी ते पोंवळ्यासारखेच दिसणार, माझ्या लालांची बरोबरी त्यांच्याच्यानं होणार नाहीं; त्याकरितां रागानं ओंठ चावून त्यांतून प्रत्यक्ष रक्तच बाहेर यायला पाहिजे. घे, घे, याला आपल्या हातांत घे. आणि हाताला लाली आणून, कमलाप्रमाणें भासविण्याकरितां मुद्दाम लावलेल्या त्या मेंदीच्या रंगाशीं—पुनर्विवाहानं पुन्हां हातीं आलेल्या या एका सौभाग्यचिन्हाशीं—त्याला कांहीं वेळ झगडूं दे, म्हणजे त्याच्या पराक्रमाची तुला आतांच थोडीशी कल्पना येईल. घे. घे. कां, याला मी तुझ्या चरणकमलीं अर्पण करूं, म्हणजे तुझ्या सौंदर्यांतील लाल रंगांशीं स्पर्धा करणाऱ्या या नीचाला लाथाडून देणं तुला सोईचं पडेल ? असं करतांना सहज तुझे पदतलही लोकांच्या दृष्टीस पडतील; पण त्या वेळीं पायांचं सौंदर्य

वाढविण्याकरितां तूं पायाला कसलाही लाल रंग लाविला असलास तरी एखाद्या महान् कवीला देखील त्यांच्या दर्शनानं नूतन संध्यारागाचा भास होणार नाहीं. कारण, लाथाडल्यानंतर तुझ्या पायांचा आश्रय सोडण्याचं जिवावर येऊन क्षणभर तेथेंच रहाण्याकरितां तो कंठा जेव्हां धडपडत असेल, तेव्हां प्रथम तुझं पाऊल तुटल्याचा भास होऊन, नंतर तेथून तो निसटल्यावर त्यांतील माणकांची लाली नजरेवर आदळ्यामुळं त्यांतून तुझे पाय पांढरेच भासतील ! आणि मग, बुचकळून जाऊन भांबावलेल्या स्थितींत, तुझा गौरवर्ण आठवून तो तुला पांढऱ्या पायाची म्हणेल ! घे, हा सुंदर कंठा तुझाच आहे.

**विलासिनीः**–काय हें अभद्र बोलणं बरं !

**पूर्णचंद्रः**–मी कांहीं कवि नाहीं. मला जशीं तीं दिसतात, तसं त्यांचं मीं वर्णन केलं. तीं अशुभच असतील तर मी तरी काय करणार !

**विलासिनीः**–द्या तो कंठा इकडे, आणि दाखवा मला तीं सारीं रत्नं म्हणजे मी त्यांना माझ्या स्पर्शानं शुभ करून टाकीन. दाखवा मला आतां.

**पूर्णचंद्रः**–नाहीं, आज रात्रीं. आपलं लग्न लागल्यावर. तूं माझी झाल्या-वर तुला माझे डोळेही दाखवायचे आहेत. त्याबरोबर तींही दाखवीन.

**विलासिनीः**–हो ! आपलं एकदां खरं स्वरूप मला पहायचंच आहे.

**पूर्णचंद्रः**–मला पाहिल्याबरोबर तूं भिशीलच. माझे डोळे फारच वाईट आहेत.

**विलासिनीः**–अहाहा ! किती हा आपला प्रेमळ स्वभाव ! किती हें थोर मन ! त्यांच्यांत आणि तुमच्यांत किती जमीनअस्मानाचं अंतर ! फक्त एक गोष्ट–शरीराचा सारखेपणा !

**पूर्णचंद्रः**–पुन्हां तुला तें वेड आलं का ? असं मन अस्वस्थ होऊं देऊं नको. मीच तर तुझा पूर्वीचा नवरा नव्हेना ? ( हंसतो. )

**विलासिनीः**–असं काय बरं भलतंच बोलावं ! पण खरंच सांगत का शेवटीं आपण माझ्यावर प्रेम करायला लागलां !

**पूर्णचंद्रः**–माझं तुझ्यावर जर पहिल्यापासून प्रेम नसतं तर आज मी तुझ्याबरोबर पुनर्विवाह करायला तयारच झालों नसतों.

**विलासिनीः**–इतके दिवस आपण अगदीं उदास होतां. पण माझी खात्री होती कीं, मी आपल्याला आनंदित करून माझ्यावर प्रेम करायला

लावीन. माझ्याकरितां आतां आपण काय वाटेल तें कराल. जिवाकडे दिखी पहाणार नाहीं.

**पूर्णचंद्रः**–नाहींच पाहिलं. खरंच मी तुझ्याकरितां मेलों आहें. मी आत पूर्वींचा नाहीं.

**विलासिनीः**–म्हणजे ?—

**पूर्णचंद्रः**–माझा पूर्वींचा स्वभाव पार बदलला आहे.–तूं पार बदल टाकिला आहेस. मी वृद्ध अरसिक–पण तुझ्याकरितां आज तरुण आ रंगेल बनलों आहें. आज माझ्या रक्तांतला गारठा पार नाहींसा झाला अ माझ्या नाड्यांतून त्याचा प्रवाह पहा कसा जोरानं उसळत आहे. इतका करणारा नवरा आजपर्यंत कोणत्याही स्त्रीला मिळाला नसेल. अरे पण मंडळी यायला लागलीच. चला, आपण त्यांची व्यवस्था पाहूं या. माझ बरोबर दागिने पहायला यायचं आहे हें विसरूं नको हो ।

**विलासिनीः**–छे, तें कसं विसरेन ! शिवाय अशोकपुरास पहाटेच्या गा जायचं आहे, त्याची सुद्धां माझी जय्यत तयारी आहे. आपली आहेना ?

**पूर्णचंद्रः**–त्याची तूं मुळींच काळजी करूं नको. जा ! जा ! त्या व बायका आल्या पहा. ( विलासिनी जाते. )

या. या. बसावं. ( मंडळी येतात व बसतात. गाणें सुरू होतें. इतक उपाध्याय पूर्णचंद्रांना बोलावणें येतात. तो जातो. गाणें चालूंच असतें. द्यांत शुभमंगल सावधान होतें. वाजंत्रीं वाजतात. विलासिनी व पूर्णचंद्र हात हात घालून येतात. आणि मंडळी त्यांना मॅरेज प्रेझेंट्स देतात. मंडव निरोप घेतात. पानसुपारी, हारतुरे वगैरे वगैरे. मंडळी जाते. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळः**–छत्रीकडे जाण्याचा रस्ता.

( पूर्णचंद्र व विलासिनी हातांत हात घालून अंगावर गुरफुटून पांघरुणें घेऊन येतात. )

**विलासिनीः**–अंमळ सावकाश चालायचं होतं गडे. आपल्या अ आज खरंच तारुण्य संचारलं आहे. हा लग्नाचा महिमा बरं ! पण मी

अगदीं थकलें. आणखी किती लांब जायचं आहे ? ती गाडी कां बरं नाहीं ठेवून घेतली ?

**पूर्णचंद्रः**–गाडींतून जाण्यायेण्यांत वेळ कमी लागतो खरा, पण तुझ्या-सारख्या तरुणीचा सहवासही तितका कमी होतोना ? आपल्या या प्रवासाचा शेवट गोड होणार असल्यामुळें मीं मुद्दाम पायीं चालून तो लांबविला आहे. शिवाय गाडींत प्रेमाच्या विषयाला मुक्याचं व्रत घ्यावं लागतं. पण अशा रीतीनं सहल करण्यांत त्याला वाचा फुटते. हें पहा आलंच आपलं घर जवळ. ( तिचा हात धरून तिला चालवितो. )

**विलासिनीः**–आपण कुठें आलों ?

**पूर्णचंद्रः**–माझा सर्व खजिना मीं या ठिकाणीं ठेविला आहे. माझा को-णावर विश्वास नसल्यामुळें मला असं करणं भाग पडलं. तुला थंडी का वाजते आहे ? मी आपला अंगरखा देऊं का तुला ? तूं थकलीस होय ? पण माझी खात्री आहे कीं ते दागिने पाहिल्याबरोबर तुझा सारा शीण जाईल. शिवाय त्या ठिकाणीं तूं वाटेल तितका विसांवा घे, मी तुला जवळच्या वाटेनं घरीं नेईन. तूं कांहीं काळजी करूं नको.

**विलासिनीः**–मला बाई फार भीति वाटते.

**पूर्णचंद्रः**–मी आहेंना जवळ. अशी भिऊं नको. ( तिला हातीं धरून चालवितो. ) ओहो ! हें पहा आपलं आलं मकाण ! ( जातात. )

( जिन्यावरून उतरतांना )

**विलासिनी**–आपण कुठें जातां ? मीं नाहीं जा येत. मला भीति वाटते. आपणच ते दागिने घेऊन यावे.

**पूर्णचंद्र**–( हंसतो. ) छे ! छे ! तूंच त्यांतले निवडून घ्यायला पाहिजेस. या ठिकाणीं अंधार आहे, पण मी दिवे लावतों; ही जागा माझ्या ओळखीची आहे. तूं भिऊं नको. ( कुलूप लावन मोठ्यानें हंसतो. )

**विलासिनीः**–आपण असे हंसतां कां ? या हंसण्याची भीति वाटते.

**पूर्णचंद्रः**–अग, मला तुझ्या भिण्याचं हंसूं येतं. शिवाय तुझ्यासारखं रत्न माझ्या रत्नांच्या खजिन्यांत कायमचं ठेवायला मिळाल्यामुळ मला जो आनंद झाला आहे, त्यानं मला हें हंसूं येत आहे. तो आनंद आतां माझ्या मनांत मावत

नाहीं, म्हणून या हंसण्याच्या वाटेनं असा बाहेर उसळत आहे. या पायऱ्या जरा अवघड आहेत. तुझ्या नाजूक पायाला त्रास होत असेल तर मी तुला कडेवर घेतों. ये. ( तिला उचलून नेतो व ठेवतो. )

**विलासिनीः**–या इथें दिवे कुठें आहेत ? हेंच का तें घर ? बोला ! बोला ! कां, बोलत कां नाहीं ? कुठें आहांत तुम्ही ? अहो गेलां तरी कुठें ? ( दिवे लावतो व तिच्याजवळ येऊन स्तब्ध उभा रहातो. ती त्याला येऊन मिठी मारते. ) मला बाहेर घेऊन चला ! चला मला बाहेर घेऊन ! अग बाई ! हें स्मशान आहे. या ठिकाणीं मेलेल्या माणसांचीं हाडं पुरलीं आहेत. चला आपण घरीं जाऊं; चला हो चला ! चंद्रगुप्तमहाराज, अहो श्रीसागरमहाराज; बोला, बोला तुम्हांला काय झालं ? मला इथें कां आणलं ? कां तुम्ही इथें चुकून आलां ? बोला, एक तरी शब्द बोला. असं काय करतां ! अग बाई ! आतां मी काय करूं ! बोला, नाहीं का तुम्ही बोलत ? बोला, बोला. आतां माझं कसं होईल ! आतां माझ्याकडे पहा हो. बोला, एकदां तरी बोला ! ( रडते. )

**पूर्णचंद्रः**–या ठिकाणीं रडायचं कांहीं एक काम नाहीं. तूं म्हणतेस त्याप्रमाणें हें खरोखरच स्मशान आहे. तुझ्या नवऱ्याच्या कुळांतील पूर्वजांच्या अस्थी या ठिकाणीं आस्थेनं पुरून ठेविल्या आहेत. तुझ्या नवऱ्याच्या बापाचीही समाधि पहा ! आणि या ठिकाणीं जो खड्डा दिसतो आहे त्यांत दहा महिन्यांपूर्वी तुझा नवरा पूर्णचंद्र शौर्यसागर याला पुरलं होतं.

**विलासिनीः**–( लाडांत पण रागांत ) काय तुम्हांला वेडबिड तर नाहीं लागलं ? अहो, असे बहकतां काय ? चला ! इथून आधीं बाहेर चला कसे ! या असल्या घाणेरड्या ठिकाणीं जर तुम्हीं आपले दागिने ठेविले असतीलं तर ते मला मुळींच नकोत.

**पूर्णचंद्रः**–नकोत ना ? ठीक आहे. पण हें काय आहे ? ही पेटी कसली ? हे नांव कुणाचं ? अशी दचकूं नकोस. हें तुझ्या नवऱ्याचं नांव आहे. या पेटींत घालून त्याला पुरलं होतं. मग ही उघडली कुणीं आणि तो कुठें आहे ?

**विलासिनीः**–कुठें आहे ! कुठें आहे ! कुठें आहे ! (त्याच्या अंगावर पडते.)

**पूर्णचंद्रः**–कुठें आहे ? तो मूर्ख, बेअकली, मिजासखोर, नंदी बैल, बावळट कुठें आहे तो ? स्वतःच्या निंद्य वर्तनानं विश्वासघात करून सर्व संसारावर अंगार ठेवून ज्याच्या बायकोनं निर्मळ प्रेमाची राखरांगोळी केली,

तो पूर्णचंद्र शौर्यसागर कुठें आहे ? ऊठ, ऊठ–हा पहा–या ठिकाणीं तुझ्या-समोर उभा आहे. माझं खरं स्वरूप तुला आज दाखविणार होतों. मी आज तुझ्याकरितां तरुण होणार होतों. मीं माझं वचन पाळिलं आहे. विला-सिनी, तुझ्याशीं दोन वेळां लग्न केलेल्या या तुझ्या नवऱ्याला तूं ओळ-खत नाहींस ?

**विलासिनीः**–नाहीं–नाहीं ! पूर्णचंद्र शौर्यसागर वारले–वारले–वारले–मेले –मेले, गेले–तुम्ही खास ते नाहींत. तुम्हांला वेड लागलं. मला भय दाखविण्या-करितां कांहीं तरी चेष्टा करतां आहां. ( तोंड झांकून रडूं लागते. ) हे जर ते असतील तर काय तरी हा विपरीत भयंकर प्रकार !

**पूर्णचंद्रः**–तूं मला ओळखलंस ! ठीक आहे. ऐक, मी मेलों असं समजून तूं जीं बदकर्मं केलींस तीं सर्व मीं या डोळ्यांनीं पाहिलीं आहेत. तुझी काम-वासना इतकी प्रखर आहे कीं, लग्न झाल्याबरोबर तीन महिन्यांचे आंतच दुसरा नवरा केलास, इतकंच नव्हे तर मी मेल्यावर कृष्णकांताशीं बेइमान होऊन तिसरा चंद्रगुप्त हुडकून काढिलास. तुझीं पापं इतकीं उदंड आहेत कीं, तीं धुतलीं जाण्याकरितां तुला कोट्यावधि जन्म नरकांत कुजत पडावं लागेल !

**विलासिनीः**–सोडा मला. हें साफ खोटं आहे; तुम्हांला वेडाची लहर आली आहे.

**पूर्णचंद्रः**–मी वेडा नाहीं. पण तूं मात्र वेड पांघरते आहेस. तुझ्या ललाटीं लिहिलेलीं आमरण साभाग्याचीं अक्षरें, दयानंदशास्त्र्यांनीं तुझ्यापुढें धरलेल्या तुझ्या विचित्र चरित्राच्या आरशांत तुला उलटीं दिसत होतीं; पण विचार करून तीं तुला वाचतां आलीं असतीं. पण तुझ्या धुंद झालेल्या डो-ळ्यांनीं त्याच्याकडे त्या वेळीं कानाडोळा करून पहाण्याचंत्र नाकारलं. पण या वेळीं त्या आरशाच्या भिंगाचं पारदर्शकत्व हिरावून नेणारा मोहाचा पारा मीं खरवडून टाकल्यामुळें त्यांत तुझं फुटकं कपाळ आणि त्यावर लावलेली अखंड सौभाग्याची जाहिरात उलटी न दिसतां त्यांतून तुझं मूर्तिमंत सौभाग्य तुझ्यापुढें उभं राहिलेलं तुला दिसेल. माझं बोलणं तुला खरं वाटत नाहीं. ( रागानं ) बोल तूं माझ्याशीं बेइमान झालीस कीं नाहीं ? मी पूर्णचंद्र शौर्यसागर, तुझा नवरा जिवंत आहे, या गोष्टीवर तुझा विश्वास आहे कीं नाहीं ? बोल. का मारूं ठार ?

**विलासिनीः**–महाराज, मी सर्वस्वी अपराधी आहें. माझ्यावर दया करा! मला ठार मारूं नका! तुम्ही पूर्णचंद्र शौर्यसागर आहांत. खचित आहां हें मीं ओळखलं. आज लग्नाच्या वेळीं माझ्यावर तुमचं प्रेम आहे, असं तुम्ही बोलला होतां, मग असे निष्ठुर कां होतां? पण तुम्हीं माझ्याशीं पुनर्विवाह कां केला? मी तुमची पत्नी होतेंच. अग बाई, काय भयंकर पुनर्विवाह हा! आतां माझ्या टाळक्यांत उजेड पडला. पण प्राणनाथ, माझे प्राण घेऊं नका हो! मला मरणाची भीति वाटते.

**पूर्णचंद्रः**–भिऊं नको–मी कांहीं मारेकरी–खुनी नव्हें. सरदाराचा बच्चा आहें. पण सूड घेण्यांत काडीची कसूर करणार नाहीं. ऊठ. मी कोण आहें हें दाखविण्याकरितांच तुला इथें आणलं आहे. काय, नाहीं उठत? माझ्याशीं–आपल्या नवऱ्याशीं–एक गोड शब्द नाहीं बोलत? मला कडकडून आलिंगन नाहीं देत? तूं मला ओळखलंस ना! माझ्या मृत्यूच्या दुःखानं तूं मरत होतीस. मग आतां आनंद कां नाहीं दाखवीत! आतां तूं माझी झाली आहेस. मृत्यू-शिवाय कुणीही आपली ताटातूट करणार नाहीं.

**विलासिनीः**–( वेडांत ) चल उघड तो दरवाजा. माझा तुला हुकूम आहे. चल बोल उघडतोस कीं नाहीं! मला बाहेर जाऊं दे. माझा हुकूम अमान्य करण्याची तुझी छाती नाहीं. आणि शिवाय मला मारण्याचा तुला काय अधिकार आहे?

**पूर्णचंद्रः**–अधिकार नाहीं! मला नाहीं असं वाटत. पुरुषानं लग्न केल्या-बरोबर बायकोवर त्याची सत्ता असते. मीं तर तुझ्याशीं दोनदां लग्न केलं आहे. मग मला तर दुप्पट अधिकार आहे. आणि छातीबद्दल विचारशील तर आज रात्रीं मी काय पाहिजे तें करीन.

**विलासिनीः**–( शुद्धींत ) महाराज, अहो पूर्णचंद्र शौर्यसागरमहाराज, मला क्षमा करा. मी चुकलें. मला बाहेर घेऊन चला. साऱ्या कुसुमपुरांतून माझी धिंड काढा. माझ्या तोंडाला काळं फांसा. माझी छीः थूः करा! पण मला ठार मारूं नका. मी तरुण आहें, सुंदर आहें, पण इतकी का वाईट चालीची आहें! माझ्यापेक्षां निंद्य बायका किती तरी असतील. मग मींच काय म्हणून मरावं!

**पूर्णचंद्रः**–तूं सर्व निंद्य स्त्रियांत अग्रगण्य म्हणून, ज्या दिवशीं माझ्याशीं–

चंद्रगुप्त श्रीसागराशीं—पुनर्विवाह करण्याचे कबूल केलंस त्या दिवशीं रात्रीं आपल्या गुलजार प्रियकराला प्रेमपत्र पाठविलींस ! तीं हीं घे, आणि भर आपल्या पापाचा घडा. आणि त्यांत सडून सडून मर. माझ्यासारखे सूड घेणारे जितके अधिक जन्मास येतील, तितकी तुझ्यासारख्या दुष्ट स्त्रियांची पैदास तरी कमी होईल. तुला दागिने पाहिजेत नाहीं का ? घे, घे, ही चोरांची लूट आणि घाल जारिणीच्या अंगावर.

**विलासिनीः**–( वेड्याप्रमाणें दागिने भलभलत्या ठिकाणीं अंगावर घालते. कृष्णकांताचें भूत तिला दिसतें, त्याकडे पाहून ) अहो गप्प बसा. ते ऐकतील ना. अहो ते जिवंत आहेत. त्यांना ठार मारून मग तुम्हांला सारी हकीकत सांगेन. ( शुद्धीवर येऊन ) खरंच पण मी या दागिन्यांच्या नादांत तुम्हांला विसरलें. असे दूर नका उभे राहूं. मला कड-कडून भेटा. ( मिठी मारते व नकळत जम्बिया काढून घेते. ) मग, मला केलीना क्षमा ?

**पूर्णचंद्रः**–आतां क्षमेला फार उशीर झाला. तुझ्यापायीं माझ्या एका मित्राचा आणि माझ्या मुलाचा मुडदा पडला.

**विलासिनीः**–क्षमेला उशीर झाला ? आणि तुझ्या मित्राचा आणि मुलाचा मुडदा पडला ? मर तर मग मेल्या ! तुझाही मुडदा पडूं दे. ( त्याच्या अंगावर खंजीर उगारते. तो तिच्या हातांतून खंजीर काढून घेतो व तिला ढकलून देतो. ती भुताकडे पाहून ) अहो, मारा त्याला. करा, ठार करा. पाहतां काय ! यानंच तुमचा खून केला. ( भूत 'नाहीं' म्हणून मान हालवितें. ) काय !, नाहीं मारीत !–अहो, मला कांहीं दिवस गेले आहेत त्याची तरी लाज धरा.–( ऐक-लेंसें करून ) काय म्हणतां, " भोग आपल्या निंद्य कर्मांचीं फळें. " अस्सं अस्सं. तुम्हीं उलटलांत ?–पण तुम्हीं जिवंत नाहीं !–अग बाई, हें भूत आहे !

**पूर्णचंद्रः**–( स्वगत ) तरीच या दुर्लभ अवदसेची ही सुलभ प्राप्ति मनाला डांचतच होती ! ठीक आहे ! पाणी मुरत होतं अं ! लग्नाचे डोहाळे !

**विलासिनीः**–( पूर्णचंद्राकडे पाहून ) आणि तुम्ही !

**पूर्णचंद्रः**–मी जिवंत समंध आहें. पण तो तुझ्या कल्पनासृष्टींतला नव्हे. ( विलासिनी दचकते. ) अशी दचकूं नको ! मी कोण आहें तें नीट समजून घे. मी तुझा नवरा पूर्णचंद्र, तुझ्या गर्भस्थ अर्भकाचा सातां महि-

न्यांनीं होणारा, खरा भासणारा, पण दत्तक बाप, सवत्स कन्यादान घेणारा नूतन नवरदेव—

**विलासिनीः**—अगबाई ! हेंही कळलं का ? पण यांना कसं कळलं ? कुणीं सांगितलं ?

**पूर्णचंद्रः**—कसं कळलं ! कुणीं सांगितलं ! जन्माला येण्याच्या अगोदरच बापाला मृत्युमुखीं लोटून आईच्या प्राणांशीं गांठ आणण्याचं अंतस्थ कारस्थान करणाऱ्या त्या तुझ्या निर्दय कार्स्यानं ! —नव्हे, तुझ्यापायीं माझ्या हातून झालेल्या बापाच्या खुनाबद्दल धिक्कार दाखविण्याकरितां माझंही मुखावलोकन टाळून, माझ्याहीपेक्षां अधिक गुप्तपणें, आपल्या बापाच्या मरणाचा भयंकर सूड घेण्याच्या ईर्ष्येनं तुझ्या उदरांत दडून बसलेल्या, आणि स्त्रीहत्येच्या पातकानं भ्रष्ट करणारा तुझ्या नरडीचा गार घोंट माझ्या तोंडावर फेंकून देऊन, स्वतः त्या रक्ताचा कढत घोंट घेण्याकरितां तुझ्या काळजाला बिलगलेल्या त्या तेजस्वी बाल वैऱ्यानं !—

**विलासिनीः**—( रागानें ) नाहीं ! साफ खोटं आहे हें ! निवळ कुभांड आहे हें. ( रडते. ) पण कुणीं सांगितलं ? कुणीं सांगितलं ? कुणीं—कुणीं सांगितलं ?

**पूर्णचंद्रः**—तुझ्यासारखी मानी मैना माझ्या जाळ्यांत अडकवून या असह्य होत चाललेल्या माझ्या कपटनाटकाचा शेवट लवकर जवळ आणणाऱ्या या कुशल सूत्रधारानं ! आपण दूर असतांना तूं बेइमान होऊं नयेस म्हणून कृष्णकांतानं तुझ्यावर पाळत ठेवण्याकरितां, मलाही नकळत, तुझ्या रात्रंदिवस जवळ ठेवलेल्या गुप्त हेरानं तूं बेइमान झाल्याबरोबर तुझ्या पोटांत शिरून ही बातमी फोडली—शाबास, कृष्णकांत, शाबास ! अपत्यरूपानं या ठिकाणीं येऊन मला मदत केलीस, आणि मीं कसा सूड घेतला हें तूं फक्त ऐकावंस अशी माझी इच्छा होती ती तुझ्या मरणानं विफल झाली म्हणून तें कृत्य प्रत्यक्ष पहाण्याकरितां अशा रीतीनं या ठिकाणीं येण्याचं धाडस केलंस ! शाबास ! पहा, पहा, कृष्णकांत, डोळे भरून इची स्थिति पहा—आणि—नंतर—पुन्हां एकदां—पण नको.

**विलासिनीः**—तुम्ही दोघेजण मिळून माझा जीव घेणार होय ? सोडा

मला ! नाहीं सोडीत ! ( दूर होऊन ) मीच तुमच्यापुढें डोकं फोडून जीव देतें.

**पूर्णचंद्रः**–नको, नको, तूं जीव देऊं नकोस! तूं आत्महत्या करूं नकोस आजपर्यंत केलेल्या बदकर्मांच्या ओझ्यानं तुझ्या चरित्राचा गाडा ठेंचून भरल आहे ! त्यांवर आत्महत्येच्या पातकाचं सूप बांध ! पण आत्महत्येमुळें होणा ऱ्या बालहत्येच्या पातकाला त्याजवर जागा नाहीं ! त्या ठिकाणीं तें कोंबूं नको ! तूं फार थोर पतीची स्त्री म्हणून, भावी पिढीच्या वाढीकरितां तुझ्याजवळ ठेवलेली ती मुदतीची ठेव, मुदतीच्या पूर्वी आपल्या चरित्राचं असं दिवाळं काढून गिळंकृत करूं नको ! मातेच्या उदरीं उदय पावून, मातापितरांच्या परस्परांवरील प्रेमाची गांठ बांधण्यांत नाहक फसलेल्या, त्या तुझ्या अभागी तान्हुल्याची मान अशी मुरगाळूं नको ! ( ती रडूं लागते. ) रड, रड ! अशीच कांहीं वेळ रड ! तुझ्या अश्रूंच्या वाटेनं पापाला असंच कांही वेळ वाहूं दे. पापाचा घडा भरून काळ जवळ येऊं नये म्हणून मी आपला हात त्या घड्याच्या तोंडावर धरतों ! त्याच्या अधःपाताला अडथळा केल्यामुळें, बाहेर उसळतांना ज्वालाग्राही बनलेले ते पापाचे तुषार माझ्या अंतःकरणांत शिरून त्या ठिकाणीं तुझी आहुति घेण्याकरितां पेटलेला भडाग्नि भडकून जाऊन माझ्या अंगाची आग आग होऊं दे ! नको,–नको आत्महत्या करूं ! माझा वंशवृक्ष मूळ ठिकाण सोडून आपल्या कायम वाढीच्या जागीं नुकताच मूळ धरीत होता ! तो माझ्या मृत्यूनं उघडा पडून प्रेमाच्या अभावीं करपून जात आहे हें माहीत असून, त्याच्यावर कृपेचं छत्रही धरलं नाहींस ! दयेचा पाझर अंतःकरणांत निष्ठुरपणानं दाबून धरून,–प्रेमाचा पान्हा आंतल्या आंत गोठून टाकून,–तो वृक्ष वठल्यानंतर लौकिकासाठीं माझ्यासमक्ष त्याच्या-वर मायावी नक्राश्रूंचं निर्दयतेनं सळसळणारं आधण ओतलंस, तें माझ्यावर तुझं त्या वेळीं प्रेम नव्हतं म्हणून ते साहजिक आहे असं समजून मीं सोसलं; पण या वेळीं वंशवृक्षाचं हें कोवळं रोप,–तीन घराण्यांचं नुकतंच नाजूक रीतीनं केलेलं हें अजब कलम–अजून कांहीं दिवस असंच बांधून ठेवून झांकलं पाहिजे. त्याला अजून स्थलांतर करायचं आहे. नको ! असं त्याला उघडं करूं नको ! हल्लीं माझ्यावर तुझं प्रेम आहे–चंद्रगुप्तावर तुझं प्रेम आहे, कृष्णकांतावर तुझं प्रेम आहे म्हणून प्रेमाच्या या त्रिवेणी संगमाचा तुझ्या नेत्रावाटे वाहणारा पूर असाच त्या रोपावर वाहूं दे ! नको ! नको निष्ठुर होऊं ! नको हें रोप उपटून टाकूं !

**विलासिनी**:–निष्ठुर होऊन उपटून नको टाकूं तर काय करूं तरी काय ! हा सल मला सहन होत नाहीं ! हा अंतर्यामींचा काच मला सोसत नाहीं. मला मेलंच पाहिजे !

**पूर्णचंद्र**:–तूं मर, तूं खुशाल मर, तूं मेल्यानं कांहीं एक नुकसान होणार नाहीं. पण अनेकजणांच्या प्रेमाच्या गुंतागुंतींत अडकलेले या बाळाचे प्राण तुझ्या प्राणांशीं गुंतले आहेत, म्हणून आत्महत्या करून ते ताडकन् तोडूं नको. हळूच सोडवून घेण्याची कांहीं युक्ति काढ. बालहत्येच्या पापाची थोडीशी भीति धर ! स्वस्थपणानं या निवांत ठिकाणीं एकांतांत विचार करीत बैस. येतों आतां.

**विलासिनी**:–(रागांत) चाललां कुठें ? आता कसला एकांत घेऊन बसलां आहांत ! आतां कशाची युक्ति, अन् कसली पापांची भीति ! अंतःकरणाला पीळ देऊन काढलेल्यां,–उपदेशाच्या धाग्यांनीं विणलेल्या–या जाळ्यांत मी आतां कसची सांपडतें ! या भयंकर वेळीं, या भयानक जागीं, आजपर्यंत केलेल्या कर्मांनीं भारावलेला माझ्या चरित्राचा गाडा या खातेरड्यांत सांठविलेल्या चिखलांत रुतला आहे; तो तिथून बाहेर काढणं आतां शक्य नाहीं ! तो वर काढून खिळखिळा करण्याकरितां त्याला बांधलेलं हें प्रेमाचं चऱ्हाट माझ्या काळजाला करकचून आंवळून हिसडे देण्याचे हे तुमचे प्रयत्न व्यर्थ आहेत ! कारण, माझ्या काळजानं केव्हांच ठाव सोडला आहे. तुमची इच्छाच असेल तर या चऱ्हाटाला असंच घट्ट धरून बसां ! माझ्यामुळें नरकांत पडण्याच्या भीतीनं ते पहा, तुमचे बेचाळीस पिढ्यांतील पूर्वज कसे थरथर कांपताहेत ! त्यांनाही आपल्या मदतीला बोलवा ! तुमच्या मदतीला गुप्त हेर पाठविणारा तुमचा पाठीराखा इथेंच आहे ! त्यालाही ह्या वेळीं त्याच्या बेचाळीस पिढ्यांतील पूर्वजांसह तुमच्या मदतीला घ्या. त्यांच्या कुळदीपकानं परस्त्रीहरणाचं पाप केलं आहे, म्हणून नरकाच्या भीतीनं ते तुम्हांला मोठ्या हौसेनं मदत करितील ! पण हें सर्व खास वायां जाईल ! कारण, ही ओढाताण मला आतां सहन होणार नाहीं. भावी पिढ्यांची आशा तुम्ही मुळींच धरूं नका. कारण, मीं त्यांचं केव्हांच तळपट केलं आहे ! याउप्पर जर तुमचे प्रयत्न चालूं ठेवाल, तर ते चालूं असतांना माझ्याजवळ जय्यत तयार असलेल्या या पापाच्या जोड

गोळीचा मीं एकदम त्याच्यावर आघात केल्याबरोबर, माझ्या अंतःकरणाच्या दगडावर त्याचा चक्काचूर होईल, आणि त्याच्या हिसक्याबरोबर तुमच्या सर्वांचा अधःपात होईल. बस्स. सोडा मला ! माझं अघोर कर्म मला आतां लवकर करूं द्या.

**पूर्णचंद्रः**–( सोडून देऊन ) तूं खास आत्महत्या करणार नाहींस. तूं भित्री आहेस. आणि मेलीस तर काय जग ओस पडेल ! तूं खास मरत नाहींस.

**विलासिनीः**–नाहीं ? अरे मांगा ! हें पहा मीं आपलं डोकं फोडलं ! ( डोकें आपटते आणि शुद्धीवर येते. ) हें मीं काय केलं ? हायरे दैवा ! काय माझी ही अवस्था झाली ! ( कपाळाला हात लावून रक्ताकडे पाहून ) अगबाई, माझं कपाळ फुटलं. आता मीं खास मरणार, मग–मग काय ! मरतांना यांच्या पायां पडूं का ! हे मला क्षमा करतील का ! पहातें प्रयत्न करून. अहो पूर्णचंद्र-महाराज !

**पूर्णचंद्रः**–काय म्हणतेस ?

**विलासिनीः**–मी या वेळीं चांगली शुद्धीवर आलें आहें. मला या वेदना सोसत नाहींत. आजपर्यंत, मीं तुमच्याशीं अतिशय वाईट रीतीनं वागलें त्याचा मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. मला प्रखर शासन होत आहे. त्याच्या आगीनं माझ्या पापानं आतां पेट घेतली आहे. माझे प्राण आणि पाप एकदम नाहींशीं व्हावींत अशी माझी इच्छा आहे. आपली जर तशीच असेल तर मला आपण क्षमा करा. आणि आपल्या मांडीवर डोकं ठेवून मला प्राण सोडूं द्या. माझ्यावर एवढे उपकार करा. ही माझी शेवटची इच्छा आहे.

**पूर्णचंद्रः**–मी तुला क्षमा करतों पण आधीं तूं या कृष्णकांताची क्षमा मागल्याचाही तूं घोर अपराध केला आहेस !

**विलासिनीः**–कुठें आहेत ते ? मला नाहीं दिसत. ते गेले.

**पूर्णचंद्रः**–पहा, डोळे उघडून पहा. पुन्हां एकवार नजर उरफाटी कर.

**विलासिनीः**–( दचकून ) त्यांच्या रागानं लाल झालेल्या चेहेऱ्याकडे माझ्याच्यानं पाहवणार नाहीं. त्यांच्याकडे पहायला मला शरम वाटते. महाराज, आपण घेतलेला हा सूड जर गोड व्हावा अशी आपली इच्छा असेल, तर तो जगजाहीर करून माझ्या आर्यभगिनींना माझा शेवटचा निरोप सांगा

कीं, संपत्तीमुळें धुंद होऊन सुखाला लांचावलेल्या शरीराचे फाजील चोज पुरविण्याकरितां, गुप्तपणें व्यभिचार करण्याचं भयंकर पाप करून, पातिव्रत्याची ऐट मिरविण्यांत सपशेल तोंडघशीं पडाल. अंधारांत केलेलीं बदकर्में कोणाच्या नजरेस येत नाहींत, या सुखमय कल्पनेंत वावरत असतांना, परमेश्वर आपल्या पतीच्या कोणत्या तरी रूपानं तीं पाहिल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी आठवण ठेवून तुम्हा पापापासून परावृत्त व्हा. महाराज, या जन्मीं तुमची पत्नी होऊन कुलांगार ठरलें पण पुढल्या जन्मीं पुन्हां आपली पत्नी होऊन कुलभूषण होईन तरच या सुडाचा शेवट गोड होईल. तुम्ही मात्र तोंपर्यंत अविवाहित रहाण्याचं वचन द्या. येतें आतां. ( तडफडत पडते. )

**पूर्णचंद्रः**–या थरावर हें प्रकरण आलं काय! ठीक आहे. माझ्या मनांत असं नव्हतं. इच्या प्राणांच्या पायांवर रचलेली इमारत इच्या मृत्यूबरोबर ढांसळेल; पण ज्या अर्थी परमेश्वराला हें आवडलं आहे त्या अर्थीं तेंच चांगलं असलं पाहिजे. विलासिनी, मर आतां! सुखानं मर. पण तुझं भ्रष्ट शिर मांडीवर घेऊन मी आपलं शरीर विटाळूं इच्छित नाहीं. पश्चात्तापाच्या तुरळक लागलेल्या धगीनं नुकतंच होरपळलेलं हें मडकं स्मशानांत दगडावरच फुटूं दे. पण मला तरी आतां पृथ्वीवर राहून काय करायचं आहे! ईश्वराच्या घरीं न्यायाच्या दरबारांत ज्या वेळीं यांची चौकशी होईल, तेव्हां इच्या कबुली जबाबाबद्दल आणि पश्चात्तापाबद्दल न्यायाधिशांना माझ्या साक्षीची जरूरी लागेल. तिथें आपणच होऊन हजर रहावं हाच उत्तम मार्ग. माझ्या एकनिष्ठ पद्माकराची व्यवस्था केलीच आहे. त्याच्या सुशील भार्येची आंदण देऊन तरतूद लावलीच आहे. बाकी उरलेल्या बेवारस संपत्तीला सरकारची तिजोरी वारस आहेच. बस्स. ठरला हाच बेत. बा, खंजिरा, ये. माझ्या वज्राप्रमाणें घट्ट झालेल्या हृदयांतून माझे प्राण बाहेर पडूं शकत नाहींत, त्यांना दे वाट करून, आणि हा माझा देह या माझ्या पूर्वजांच्या छत्रींत दे फेंकून. आटप आतां, उशीर करूं नको. (पडद्यांत "पूर्णचंद्र, पूर्णचंद्रमहाराज.") हे पहा मला परमेश्वराचे दूत पुकारीत आहेत–(पडद्यांत "या पद्माकराला दर्शन दिल्याशिवाय हा लोक सोडून जाऊं नका." ) ( घड्याळ पाहून ) हा देवदूत नव्हे! माझा इहलोकचा इमानी दूत आहे. अहाहा! पत्र पोहोंचल्याबरोबर या भयंकर वेळीं स्मशानांत देखील धांवत आला आहे. माझ्या धर्माप्रमाणें आतां माझा अग्निमुखांत अंत्यविधि होईल. माझा देह आतां कुजत पडणार

नाहीं. त्याचा खरा वारस हजर झाला आहे. ये, पद्माकरा, ये, आणि खिशांत लिहून ठेवलेली माझी हृदयद्रावक हकीकत, तुझ्याकरितांच जरी आहे तरी तुझ्या सुरक्षिततेसाठीं ती खुशाल कोणालाही दाखीव. माझ्या मृत्यूबरोबर नामशेष होणाऱ्या घराण्याचा त्यांत दुर्लौकिक झाला तरी हरकत नाहीं. कारण अंतःकरणाला होणाऱ्या वेदनांचा असह्य कोंडमारा अज्ञातवासांत सोशीत असतांना डोळ्यांतून निघणाऱ्या अश्रुजलांत, त्या घराण्याच्या नांवाला बद्माषांनीं फांसलेलं काजळ, खंजिराच्या तीव्र पात्यानं खरवडून घालून तयार केलेली शाई—होरपळलेल्या संसाराची राख घालून सुडाचा मनाशीं खल करण्यांत घोटली गेलेली काळीकुट्ट शाई—ती हकीकत लिहिण्याकरितां वापरली आहे. निरनिराळ्या व्यक्तींची महत्वाची हकीकत नजरेवर येण्याकरितां त्यांच्याच अंगांतून काढलेल्या रक्ताच्या लालभडक शाईनं ती रेखांकित केली आहे. तेव्हां मला त्याची भीति वाटत नाहीं. ( खिशांतून दुसरें पत्र काढून ) ही जिवंत राहिली असती तर पुढें काय करावयाचं याचा खुलासा करणारं हें पत्र मी तुला देणार होतों, पण त्याचा आतां उपयोग नाहीं म्हणून जाळून टाकतों. ( जाळून ) हे तीक्ष्ण शस्त्रा, पहातोस काय ! शीर माझ्या काळजांत, आणि त्या इमानी प्राण्याच्या पुण्यदायक दर्शनाचा मोह पडण्याच्या आधीं, रक्ताच्या लोटाबरोबर माझ्या प्राणांना बाहेर खेंचून काढ. ( खंजीर खुपसून घेतो व पडतो. एक आवाज होऊन भिंत कोसळते. पद्माकर त्यांतून आंत घुसतो; व पूर्णचंद्राच्या गळ्याला मिठी मारतो, व " महाराज, हे काय केलंत " म्हणून विलाप करतो. दुसरे आवाज होऊन सर्व छत्री कोसळते. पद्माकराचा "महाराज" एवढाच खोल आवाज डिगांतन एकें येत असतांना पडदा पडतो. )